गीतामृतदुहे श्रीकृष्णाय नमः ।

# श्रीमद्भगवद्गीता ।

श्रीविद्याधिराजभट्टोपाध्यायविरचित
श्रीमध्वमतानुवर्तिनी व्याख्या संवलिता
तथा
श्रीगोकर्णमठाधीश श्रीमदिन्दिराकान्ततीर्थ
श्रीपादविरचितमहाराष्ट्रभाषार्थयुता च ।

पांग्रीकरोपाव्ह विद्वद्वर समीरणाचार्यैः
परिष्कृता च ।

खानापुराख्यनगरे
सडेकरोपाव्ह दत्तात्रेय गोविंद शर्मणा
'धनञ्जयाख्ये' स्वीये मुद्रणालये
संमुद्र्य प्रकाशिता ।

शाकः १८३७ सन १९१५

# प्रकाशकाचें हृद्गत.

प्रस्तुत **श्रीमद्भगवद्गीता** ग्रंथाचें बहुतेक प्रास्ताविक वर्णन पुढें उपोद्घातांत आलेंच आहे, तथापि ग्रंथ प्रकाशनाच्या कामीं ज्या ज्या सद्गृहस्थांनीं आपला अमोलिक वेळ खर्च करून आह्मांस साह्य केलें आहे त्यांच्या उपकृतीबद्दल दोन शब्द लिहून गौरव करणें हें आमचें कर्तव्य होय. श्रीमत्पूज्यपाद **गोकर्णमठाधीश श्रीमदिंदिराकांततीर्थ श्रीपादवडेर स्वामीमहाराज** यांच्या प्राथमिक भेटींत शके १८२४ सालीं ह्या ग्रंथाची मूळ हस्तलिखित प्रत आह्मांस मिळाली. आणि ही द्वैतसिद्धांत विवरणात्मक मराठी भाषेंत भाषांतर केलेली **श्रीमद्भगवद्गीता** योग्य रीतीनें छापून प्रसिद्ध व्हावी असा श्रीमत्पूज्यपाद स्वामीमहाराजांचा उद्देश होता. त्यास आमचेकडून अनुमोदन मिळाल्यानंतर श्रींनीं हें गीता प्रसिद्धीचें काम आह्मांकडे सोंपविलें.

सदरहु ग्रंथाची मूळ हस्तलिखित प्रत उत्तम प्रकारें सुबक अक्षरांनीं लिहविण्याची योग्य काळजी श्रींनीं घेतली होती, तथापि मूळश्लोक, संस्कृत टीका व अर्थ हें सर्व एक-सारखें कागदाच्या दोन्हीं बाजूस लिहिलें गेल्यामुळें छापखान्याच्या नियमाप्रमाणें काम करण्यास जड जाईल असें दिसून आल्यावरून सदर प्रत जशाची तशी पुनः लिहून काढावी लागली व हें महत्प्रयासाचें काम आमचे मित्र श्री. **विष्णु बळवंत थोरात** यांनीं मोठ्या आनंदानें पतकरून चांगल्या तऱ्हेनें करून दिलें. तसेंच हलशी येथील सुप्रसिद्ध विद्वान् माध्वसांप्रदायी वे. शा. सं. **समीरणाचार्य पांग्रीकर** यांनीं शुद्धाशुद्ध तपासून देऊन नंतर प्रुफ तपासण्याचे कामीही बरीच मदत केली व ही २ री आवृत्ती छापण्यापूर्वी पहिल्या आवृत्तीची छापी प्रतही सदर आचार्यांनीं तपासून दिली होती. ह्मणून ह्या उभयतांचे आह्मांवर व एकंदर गीताभक्तांवर फार आभार झाले आहेत. मात्र खेदाची गोष्ट इतकीच कीं, ही दुसरी आवृत्ति प्रसिद्ध झालेली पाहण्यास सदर समीरणाचार्य पांग्रीकर हे जिवंत राहिले नाहींत ! कालपरिवर्तनामुळें ते गेल्या सालीं वैकुंठवासी झाले हें येथें नमूद करण्यास आह्मांस फार वाईट वाटत आहे. असो.

अशा तऱ्हेनें पुनः ग्रंथ लिहून काढवावा लागल्यामुळें वगैरे अडचणीमुळें मध्यं-तरीं ४ वर्षे ग्रंथ प्रसिद्धीचें काम आमचेकडून झालें नाहीं परंतु मुख्यत्वें श्रीगुरुकृपेच्या विशेष पाठबळानें एकंदर अडचणींतून पार पडून सदर ग्रंथ छापून त्याची पहिली आवृत्ति शके १८२८ मध्यें संवत्सर प्रतिपदेच्या [illegible]र्तानें प्रसिद्ध केली. त्यानंतर ९ वर्षांनीं ही दुसरी आवृत्ति प्रसिद्ध करण्याचा सुयोग [illegible]च्या सुदैवानें व श्रीस्वामीमहाराजांचे कृपेनें आज लाभला आहे याबद्दल आह्मांस अत्यंत समाधान वाटत आहे.

ही दुसरी आवृत्ति छापतांना प्रुफ तपासण्याचे व मराठी भाषा शुद्धीचे वगैरे कामीं येथील वे० **मठस्थ गणेश रामचंद्र शर्मा** यांनी आपला अमूल्य वेळ खर्चून आरंभा-पासून ग्रंथ समाप्तीपर्यंत निरपेक्षपणें आह्मांस मदत केली आहे याबद्दल आह्मीं त्यांचे फार फार आभारी आहों.

पहिली आवृत्ति थोड्याच मुदतींत संपून गेल्यामुळें ६।७ वर्षें सदरहु ग्रंथाबद्दल अनेक सद्गृहस्थांच्या मागण्या येऊं लागल्या, परंतु तशाच प्रकारच्या अनिवार्य अडचणी-मुळें प्रिय आश्रयदात्यांना ग्रंथ देऊन त्यांची गीतामृतपानविषयक तृष्णा पूर्ण करण्यास आजवर आह्मीं समर्थ झालों नाहीं याबद्दल आह्मीं अत्यंत दिलगीर आहों ! हा जो इतका अवकाश मध्यंतरीं लागला आहे याचें मुख्य व विशेष कारण ह्मणजे हल्लींची कालमान-स्थिति हेंच होय. यांतच चाणाक्ष वाचकांनीं समजून घ्यावें, यापेक्षां आह्मांस जास्त खुलासा करितां येत नाहीं.

अलीकडे या उपयुक्त ग्रंथाचीं अनेक भाषांत भाषांतरें झालीं आहेत, होत आहेत व पुढेंही होतील; पण प्रस्तुतच्या ग्रंथांत जर कांहीं विशेष असेल तर तें द्वैतत्व हेंच होय. आजवर अद्वैतमतानुरोधें मराठी भाषेंत गीतार्थ प्रसिद्ध झालेले पाहण्यांत येतात; पण त्यायोगें मतांतराची माहिती होणें कठीण पडत होतें. तेव्हां प्रस्तुतच्या या ग्रंथानें ती उणीव थोडी तरी भरून येऊन द्वैतसिद्धांतभूत गीतार्थ समजण्यास सुलभ साधन होईल अशी खात्री आहे, आणि एवढ्याचकरितां जरी सदर ग्रंथ प्रकाशनार्थ बराच खर्च आला आहे तरी किंमत बेताचीच ठेविली आहे हें ही सूज्ञ वाचकांस दिसून येईलच. असो.

शेवटीं ज्या सर्वज्ञ **श्रीनारायणा**च्या कृपेनें व श्री**स्वामीमहाराजां**च्या आशीर्वादानें हातीं घेतलेलें गीता प्रकाशनाचें काम तडीस गेलें याजबद्दल त्यांच्या चरणीं अनन्यभावें लीन होऊन व प्रस्तुत ग्रंथांत नजरचुकीनें कांहीं दोषस्थलें राहिलीं असल्यास तीं पुनरावृत्तीच्या वेळीं सुधारण्याविषयीं अभिवचन देऊन हें हृद्गत पुरें करितों.

**खानापूर,**
चैत्र शु० १ दा शके १८३७.
मार्च ता. १६।३।१९१५ इसवी.

सर्वांचा नम्र,
**दत्तात्रेय गोविंद सडेकर.**

# उपोद्घात.

मुमुक्षू जनांना भगवत्प्राप्तिरूप मोक्ष मिळण्यास मुख्य साधन ' ज्ञान ' होय, अर्थात् हें ज्ञान निष्काम स्वधर्माचरणानेंच प्राप्त होत असतें, ही धर्माचरण व्यवस्था कृतयुगांत उत्तम प्रकारची होती. त्याप्रमाणें लोकही त्या काळीं वर्णाश्रमाप्रमाणें निष्काम स्वधर्मानें वागत असत, पुढें कांहीं कालानंतर कालमाहात्म्यानें लोकप्रवृत्ति बदलून धर्माचरण व ज्ञान नष्ट झालें व त्यांबरोबर भगवत्प्राप्तिरूप मोक्षसाधनही नाहींसें झालें, संसारापासून मुक्त होण्यास मार्गच उरला नाहीं. असा अनिष्ट प्रकार पाहून ब्रह्मादि सकल देव श्रीनारायणास शरण जाऊन मोक्षसाधनभूत ज्ञानमार्गप्रवृत्तिविषयीं प्रार्थना करूं लागले; त्याप्रमाणें सृष्टिनियामक परमात्मा नारायणांनीं देवताप्रार्थनोद्देश, लक्षांत आणून वेदव्यासरूपानें सत्यवतीचे उदरीं अवतार घेऊन हेतू पूर्ण करण्याचें अभिवचन दिलें व स्वतः भक्तकार्यकल्पद्रुम नारायण व्यासरूपांनीं जगतावर अवतीर्ण होऊन त्यांनीं वेदाचा ऋग्वेदादि रूपानें विभाग केला व त्याच्याही शाखा प्रशाखा इत्यादि भेद करून वेदार्थमार्ग सुलभ केला, इतकें करूनही यच्चयावत् सर्व योग्य मुमुक्षु लोकांनां यापासून बोध होणार नाहीं असें जाणून व वेदानधिकारी अशा स्त्रीशूद्रादिकांनां सुद्धां ज्ञानद्वारां भगवत्प्राप्तिरूप मोक्ष मिळण्यासाठीं **महाभारत** रचिलें. सांप्रत ज्यास पंचम वेद अशी संज्ञा आहे. या ग्रंथांत संपूर्ण वेदार्थ असून वेदांत नाहीं असाही अर्थ यांत आहे. यामुळें ह्या व्यासोक्त **महाभारत** ग्रंथाची योग्यता आज पृथ्वीवरील एकंदर राष्ट्रांत अपूर्व समजली जात आहे.

या भारताच्या ज्ञानानें जगांतील बहुतेक गोष्टींचें यथार्थ ज्ञान होतें. यांत नसलेलें ज्ञान पृथ्वीवर कोठेंही गेलें तरी मिळणें अशक्य आहे. अर्थतः शब्दतः याचें महत्व असल्यानें याला **महाभारत** असें नांव मिळालें.
**" महत्वात् भारवत्वाच्च महाभारतमुच्यते "**

अशा या श्रेष्ठ ग्रंथांत वेदव्यासांनीं श्रीकृष्णार्जुनसंवादरूप **भगवद्गीता** समाविष्ट करून तिच्याद्वारां अखिल जिवांना ज्ञानमार्ग दाखविला.

हा कृष्णार्जुन संवाद गीतारूपानें भारतांत प्रथित होण्याचें कारण बहुतेकांना माहित असणारच ! तथापि प्रसंगानें या प्रास्ताविक लेखांतही थोडें दिग्दर्शन केल्यास विसंगततादि दोष लागू होतील असें वाटत नाहीं.

जेव्हां परंपरागत चालत आलेल्या हस्तिनापुरच्या राज्यवैभवासंबंधानें कौरव, पांडव या उभयतांमध्यें भाऊबंदी कलह उत्पन्न झाला, तेव्हां त्याचें पर्यवसान युद्धापर्यंत येऊन ठेपलें. हा युद्धप्रसंग न यावा ह्मणून पांडवांनीं शक्य तितक्या सामोपचारांनीं कौरवांचें मन वळविण्याचा प्रयत्न केला, पण व्यर्थ ! एका अर्थीं कौरव पांडवांचें युद्ध अखिल जगाच्या कल्याणासच कारण झालें ह्मणण्यास हरकत नाहीं. नाहींपेक्षां यांचा भाऊबंदी कलह आपसांत निभावला असता तर कृष्णार्जुनसंवादरूपानें गीतेचा उद्भव झालाच नसता ! आणि जगतामध्यें ज्ञानद्वारां भगवत्प्राप्तिरूप मुक्तिसाधनही दुर्मिळ झालें असतें ! असो.

या कौरव, पांडव युद्धांत अखेरपर्यंत पांडवांकडे न्यायाची व सत्याची बाजू होती, इतकेंच नाहीं तर जीवावर उदार होऊन पांडवनाशार्थ समरांगणांत उभे असलेले प्रत्यक्ष शत्रु महायोद्धा रणधुरंधर अर्जुन यास आप्तइष्टांप्रमाणें दिसूं लागले. सेनापती पितामह भीष्माचार्य यांच्या संमतीनें उभयतांचीं सैन्यें समरभूमीवर युद्धार्थ व्यूह रचनेनें सज्ज झाल्यावर रथाधिष्ठ असलेला अर्जुन एकदम स्फुरण चढून श्रीकृष्णास ह्मणाला:—

सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ।
यावदेतान्निरीक्षेऽहं योध्दुकामानवस्थितान् ॥

याप्रमाणें पार्थाभिप्राय समजून भगवंतांनीं उभय सैन्यामध्यें रथ उभा केल्यावर केवळ क्षणिक सुखाकारितां मरणासाठीं उभा असलेला ( चुलते, आजे, गुरु, मामा, भाऊ, पुत्र, नातू, मित्र, सासरे, आप्त इत्यादि ) गोतावळा आपल्या चर्मचक्षूनें अर्जुनानें नीट न्याहाळून पाहिला, त्याबरोबर त्याच्या कोमलांतःकरणास दयेचा पाझर फुटून तो श्रीकृष्णास ह्मणतोः—

दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ।
सीदंति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ॥
वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ।

अशा रीतीनें अर्जुन युद्धपराङ्मुख झालेला पाहून त्याचा मोह नाश करण्यासाठीं भगवंतांनीं गीतेचा उपक्रम केला. त्यांत क्रमप्राप्त शंका समाधान रूपानें कर्म, ज्ञान, योग, भक्ति इत्यादि अनेक उपयुक्त मार्गांचें उद्‌घाटन केलें व शेवटीं अर्जुनाला दिव्यदृष्टि देऊन त्याचें मन क्षात्रकर्म जें युद्ध त्याकडे वळविलें.

अर्जुन हा तरी सामान्य मनुष्य नव्हता, साक्षात् इंद्राचा अवतार असून अपरोक्षज्ञानी व उत्तम अधिकारी होता. तरी या युद्धांतला मुख्य विचार, ह्मणजे भगवद्विरोध करणारे, दुष्ट व तदनुयायी जन यांचा निग्रह करणें हाच क्षात्रधर्म होय. पण 'आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन्' असें स्मृतिवाक्य अर्जुनाच्या एकाएकीं लक्षांत आलें नाहीं. केवळ प्रारब्धकर्मामुळेंच त्यास या वेळीं मोहानें गांठलें, तथापि गीता उपदेशानें विपरीत बुद्धि नष्ट होऊन तो स्वकर्तव्य करण्याविषयीं मोठ्या उत्सुकतेनें तत्पर झाला.

या एकंदर विचारावरून इतकें निष्पन्न होतें कीं, वर्णाश्रमाप्रमाणें स्वधर्माचरण हेंच ज्ञानद्वारा उत्कृष्ट मोक्षसाधन असल्याचें भगवंतांनीं अर्जुनास सिद्धांतरूपानें कथन केलें आहे. आणि हाच गीतेचा मुख्य विषय आहे.

अशा रीतीची अपूर्व गीता वेदव्यासांनीं आपल्या भारतांत ग्रथित केली यामुळें तिला संपूर्ण शास्त्रांमध्यें श्रेष्ठत्व आहे:—

**'भारतं सर्व शास्त्रेषु भारते गीतिका वरा'**

भारतामध्यें पुष्कळ गीता आहेत, पण त्या सर्वांत **श्रीमद्भगवद्गीता** ही अति श्रेष्ठ होय:—

**'गीता सुगीताकर्तव्या किमन्यैःशास्त्रसंग्रहैः'** असें ह्मटलें आहे.

आलीकडे या कलिकालांत तर अनेक पंडितांनीं, आचार्यांनीं, आपल्या मताभिमानांनीं व युक्त्याभासादिकांनीं या गीतेचे बरेच अर्थ संस्कृत, मराठी वगैरे भाषेंत केले; पण ते सर्व भिन्न भिन्न मार्गप्रदर्शक असल्यामुळें उभय कृष्णांचा हृद्गताभिप्राय वैष्णवभक्तांस समजण्याकरितां **श्रीमदाचार्यांनीं** गीता भाष्य केलें, तें समजण्यास गहन आहे ह्मणून **श्री जयतीर्थांनीं प्रमेयदीपिका** नामक संस्कृत टीका केली, **राघवेंद्रतीर्थ** श्रीपादांनीं **गीताविवृत्ति**

लिहिली, याचप्रमाणें इतर विद्वानांनींही गीतेवर पुष्कळ व्याख्यानें केलीं; परंतु संस्कृतानभिज्ञ प्राकृत मुमुक्षु वैष्णवभक्तांस पूर्वोक्त **गीता** ग्रंथाचें रहस्य कळणें कठीण आहे असें जाणून श्री गोकर्णमठाधीश पूज्यपाद **श्रीमदिन्दिराक्रान्त तीर्थ** श्रीपादस्वामी यांनीं सुलभ रीतीनें मराठी भाषेंत विवेचन करून हा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. याचें मुख्य तात्पर्य एवढेंच आहे कीं, ईश्वरास परमस्वातंत्र्य, सर्वोत्तमत्व, सर्वज्ञत्व आणि जीवांना पारतंत्र्य, अल्पज्ञत्व, मोक्षसाधनज्ञान, परंपरासाधन व वर्णाश्रमविहित कर्माचरण; इत्यादि विषयांचा ऊहापोह प्रस्तुत ग्रंथांत झालेला आहे. व श्रीस्वामींनीं मराठी अर्थ करतांना तो दुराग्रहानें किंवा स्वमतानें मुळींच केला नसून, मूळ, भाष्य, टीका, टिप्पणी, श्रुतिस्मृति यांना अनुकूल असाच स्पष्टार्थ केला आहे. आतां कदाचित् कचित्स्थलीं दोष दिसून आल्यास, हंसक्षीरन्यायानें गुणलेशाचेंच ग्रहण व्हावें अशी सूज्ञांस सूचना करून त्यांची रजा घेतों.

मु० हलसी,<br>
मिति माघ वद्य १४<br>
शके १८२७.

**समीरणाचार्य पांग्रीकर.**

---

# श्रीमद्भगवद्गीताध्याय विषयानुक्रमणिका.

" १० वा.–( श्लोक ४२ ) सहाव्या व नवव्या अध्यायांत सूचित ध्यानार्थ भगवद्विभूतिरूप सांगितलें आहे.

" ११ वा.–( श्लोक ५५ ) विभूतिरूप ध्यानाकरितां विश्वरूप-स्थितिकथन.

" १२ वा.–( श्लोक २० ) भगवदुपासना व अव्यक्तोपासना यांमध्यें भगवदुपासनेचें श्रेष्ठत्व कथन.

" १३ वा.–( श्लोक ३४ ) सर्व पूर्वाध्यायांत भिन्नभिन्न स्थळीं सांगितलेलें ज्ञानसाधन भगवत्स्वरूप, जीवस्वरूप, व क्षेत्रस्वरूप हें सर्व एकत्र करून क्षेत्रक्षेत्रज्ञ यांचें निरूपण केलें आहे.

" १४ वा.–( श्लोक २७ ) त्रिगुणात्मक त्रिगुणविकार, गुणत्रयबंध व कर्मबंधापासून मुक्त होण्याचा उपाय कथन.

" १५ वा.–( श्लोक २० ) सकळ संसाराचें स्वरूप व त्यापासून मुक्त होण्याचा उपाय सांगितला आहे.

" १६ वा.–( श्लोक २४ ) देवस्वभाव व दैत्यस्वभाव निरूपण.

" १७ वा.–( श्लोक २८ ) सत्वादिगुणनिमित्तक श्रद्धा, आहार, यज्ञ व तपदानादिकांचें विवरण.

" १८ वा.–( श्लोक ७८ ) पूर्वींच्या सर्व अध्यायांत तेथें तेथें सांगितलेलें मोक्षसाधन व पूर्वी सांगितलेलें त्रैगुण्य व संन्यासयोगस्वरूप संक्षेप करून यांत सांगतात.

( एकंदर मूळ श्लोक ७०० आहेत. )

॥ श्री ॥



वैष्णवसिद्धांतप्रतिष्ठापनाचार्य

श्रीमदिन्दिराकान्ततीर्थ श्रीपाद वडेर

श्रीमठ गोकर्ण.

पट्टाभिषेक शक १८१४, नंदननाम संवत्सर.

श्रीमध्वमतानुवर्ति व्याख्योपेता
महाराष्ट्र तात्पर्यसमेता

# श्रीमद्भगवद्गीता.

## अथ प्रथमोऽध्यायः ।

श्रीगुरुभ्यो नमः ॥ श्रीवेदव्यासाय नमः ॥ रमापतिं पूर्णगुणं मुकुन्दं व्यासं च विज्ञानसहस्रभानुम् ॥ पूर्णप्रबोधं च सुतत्त्वदीपं क्रमाद्गुरूंश्च प्रणमामि मूर्ध्ना ॥ १ ॥ श्रीमदानन्दतीर्थार्य मतमाश्रित्य यत्नतः । क्रियते विष्णुगीता या विवृतिः साधुसंविदे ॥ २ ॥

इह हि संसारे क्लिश्यमानं वेदार्थज्ञानरहितमधिकारवर्जितं च स्त्रीशूद्रादिकमवेक्ष्य कृपाविष्टैर्ब्रह्मेशानादिभिरार्थितो भगवान् व्यासोऽवततार । ततश्च संसारे क्लिश्यमानानां जनानां धर्मज्ञानद्वारा मोक्षो भवेदिति कृपालुः सर्ववेदार्थोपबृंहितां सर्वप्राणिभिरनवगाह्यां केवलं भगवत्स्वरूपपरां वासुदेवार्जुनसंवादात्मिकां महाभारतपारिजातमधुभूतां गीतामुपनिबबंध । तथोक्तं—" स्वयं नारायणो देवो ब्रह्मरुद्रेन्द्रपूर्वकैः ॥ अर्थितो व्यासतांप्राप्य केवलं तत्वनिर्णयं ॥ चकार पंचमं वेदं महाभारत संज्ञितं ॥ शास्त्रेषु भारतं सारं तत्र नामसहस्रकम् ॥ वैष्णवं कृष्णगीताच तज्ज्ञानान्मुच्यतेऽञ्जसा ॥ न भारतसमं शास्त्रं कुतएवानयोः समम् ॥ " तत्र भगवताऽर्जुनबोधने प्रसक्तिं दर्शयितुं कतिपयश्लोकाधिकाध्यायमारभते ।

महाराष्ट्र टीका-सकलगुणपरिपूर्ण, मोक्षदाता असा लक्ष्मीपति मुकुंद; व ज्ञानरूप किरणांनींयुक्त असे सूर्यसदृश श्री वेदव्यास; तसेंच, परापर तत्त्वज्ञानाचा बोध करून देणारे श्रीमदानंदतीर्थ श्रीमध्वाचार्य; आणि विद्योपदेष्टे गुरु या सर्वांना नमस्कार करितों. १. विशेषतः श्रीमदानंदतीर्थ पूज्यपाद यांच्या मताचा आश्रय करून, सुज्ञजनबोधार्थ श्रीमद्भगवद्गीतेची ही श्रीमध्वमतानुवर्ति टीका करितों. २. जन्ममरणरूप, अत्यंत दुःखकारक अशा या संसारामध्यें, वेदार्थज्ञानरहित व वेदाधिकार नसलेले असे जे स्त्री शूद्रादिक मानवी प्राणी, त्यांना पाहून दयार्द्र अंतःकरणानें ब्रह्मरुद्रादिकांनीं प्रार्थना केल्यामुळें साक्षात् श्रीभगवान् व्यास ह्या भूतलावर अवतरले. आणि त्यांनीं ह्या तीक्ष्ण संसारामध्यें क्लेश भोगणाऱ्या मानवी जीवांना धर्मज्ञानद्वारां मोक्षप्राप्ति होण्यासाठीं, संपूर्ण वेदार्थ ज्यामध्यें भरलेला आहे, व प्रायः सर्व प्राणिमात्रांच्या बुद्धीला गहन व केवळ भगवत्स्वरूपपर आणि ज्यामध्यें कृष्णार्जुनसंवाद आहे व महाभारतरूप पारिजात वृक्षास मधरूप झालेली अशी ही सर्वमान्य गीता रचिली. याविषयीं असें ह्मटलें आहे कीं, "ब्रह्मा, रुद्र, इंद्र इत्यादि देवांनीं प्रार्थना केल्यामुळें साक्षात् श्रीभगवान् नारायणांनींच स्वतः श्री व्यासरूप अवतार धारण करून, केवळ तत्त्वप्रधान असा हा महाभारतरूप पांचवा वेद निर्माण केला. हा भारत ग्रंथ ह्मणजे सर्व शास्त्रांचें मूलस्थान आहे. त्यामध्यें श्रीविष्णुसहस्रनाम व श्रीमद्भगवद्गीता हीं मुख्य आहेत. त्यांच्या ज्ञानानें मनुष्यप्राणी तत्काल मुक्त होतो. तेव्हां ह्या भारतासारखें श्रेष्ठ शास्त्र दुसरें कोणतेंही नाहीं. "अर्थात् यांत समाविष्ट झालेली भगवद्गीता व विष्णुसहस्रनाम हींही अत्यंत श्रेष्ठ होत." त्यांत गीतेचा आरंभ करतांना प्रथमतः भगवान् श्रीगोपालकृष्णांनीं, अर्जुनाला गीतोपदेश करण्याचें कारण एक अध्याय व दहा श्लोकांनीं सांगितलें आहे. त्याचा उपक्रम असा—

धृतराष्ट्र उवाच ।

**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।**
**मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥**

**भगवतः सारथ्यादिना पांडवानां भगवत्कृपाविषयकत्वं सर्वलोकसाक्षिकंमपि सर्वप्रकारेणांधत्वादजानन् धृतराष्ट्रः स्वपुत्राणां**

**विजयविविदिषया मत्पुत्राः पांडुपुत्राश्च धर्मभूमौ कुरुक्षेत्रे योध्दुमिच्छंतो मीलितास्सन्तः किंकृतवंतइति संजयं पप्रच्छ ॥ १ ॥**

भगवान् **श्रीकृष्णानें अर्जुनाचें** सारथ्य स्वीकारल्यामुळें, पांडवांवर भगवंताची पूर्ण कृपा आहे, असें सर्व लोकांत प्रसिद्ध होतें; तरी सर्वप्रकारें बाह्यांतर दृष्टीनें शून्य होऊन, **धृतराष्ट्र** संजयास प्रश्न करितो कीं,–( **धृतराष्ट्र** ह्मणाला ) हे **संजया**, धर्मभूमिभूत अशा कुरुक्षेत्राचे ठिकाणीं युद्धाच्या इच्छेनें जमलेले **दुर्योधना**दिक माझे पुत्र आणि युधिष्ठिरादिक **पांडूचे** पुत्र यांनीं काय केलें ? ॥ १ ॥

संजय उवाच ।

# दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ॥
# आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥

संजय उवाच । **दुर्योधनोराजा व्यूहात्मना रचितं पांडवसैन्यं दृष्ट्वा द्रोणाचार्यसमीपमागत्य वचनमुवाच ॥ २ ॥**

असा धृतराष्ट्राचा प्रश्न ऐकून, **संजय** ह्मणाला:–" हे राजा **धृतराष्ट्रा**, मकरादि व्यूहरूपानें रचिलेलें पांडवांचें सैन्य पाहून, **दुर्योधन** द्रोणाचार्याजवळ जाऊन ह्मणाला कीं—॥ २ ॥

# पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ॥
# व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३ ॥

**भो आचार्य तव शिष्येण धृष्टद्युम्नेन व्यूहरचनयाधिष्ठितां पांडवसेनां पश्य ॥ ३ ॥**

अहो **द्रोणाचार्य**, तुमचा बुद्धिमान् शिष्य जो द्रुपदराजाचा पुत्र **धृष्टद्युम्न** यानें व्यूहरूपानें रचिलेली ही पांडवसेना पहा. ॥ ३ ॥

# अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ॥
# युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥

---

१ हें स्थल दिल्ली शहरापासून १०।१२ कोसांच्या अंतरावर यमुना नदीच्या पश्चिम बाजूस आहे.

**धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ॥**
**पुरुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥ ५ ॥**
**युधामन्युश्च विक्रांत उत्तमौजाश्च वीर्यवान् ॥**
**सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥**

अस्यां सेनायां महाधनुषोयुद्धे भीमार्जुनतुल्याः सात्यकि प्रमुखाश्शूराः सन्ति ॥ ४ ॥ ५ ॥ ६ ॥

या सेनेमध्यें युद्धांत **भीमार्जुना**प्रमाणें पराक्रम करणारे महान् धनुर्धारी आहेत. ते हे कीं—**युयुधान**( सात्यकि ), **विराट** आणि महारथी[1] **द्रुपद** ॥ ४ ॥ **धृष्टकेतु, चेकितान्**, महापराक्रमी **काशीराजा, पुरुजित्, कुंतिभोज** आणि मनुष्यांत श्रेष्ठ असा **शैब्यराजा** ॥ ५ ॥ पराक्रमी **युधामन्यु**, शौर्यवान् **उत्तमौजा**, सुभद्रेचा पुत्र **अभिमन्यु** आणि युधिष्ठिरादि पांच पांडवांपासून द्रौपदीचे पोटीं जन्मलेले महारथी **प्रतिविंध्यादि**[2] पांच द्रौपदीपुत्र. ॥ ६ ॥

**अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ॥**
**नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥ ७ ॥**

अस्माकंतु संबंधिनोये बलिष्ठाः मम सैन्यनायकास्तान्विद्धि जानीहि । तव सम्यक्ज्ञानार्थं तान् ब्रवीमि ॥ ७ ॥

अहो द्विजोत्तम **द्रोणाचार्य**, आमच्या सेनेंत श्रेष्ठ सेनाधिपति कोण कोण आहेत हें तुह्मांस चांगल्या रीतीनें समजण्याकरितां मी त्यांचीं नांवें सांगतों. ( शंका ) ‘ द्रोणाचार्य हे धनुर्विद्येंत निपूण असतां दुर्योधन राजानें सेनाधिपतींचें वरील वर्णन करण्याचें कारण नव्हतें. परंतु, द्विजोत्तम या संबोधनावरून **द्रोणाचार्यांची** ब्राह्मणवृत्ति असल्याकारणानें, या युद्धप्रसंगास

---

१ शस्त्रविद्येत प्रवीण असून दहा हजार धनुर्धारी योध्यांबरोबर जो एकटा युद्ध करितो त्याला ‘ महारथी ’ असें ह्मणतात.

**एको दशसहस्राणि योधयेद्यस्तु धन्विनाम् ।**
**शस्त्रास्त्रेषुप्रवीणश्च स महारथ उच्यते ॥ १ ॥**

२ युधिष्ठिर, भीम, अर्जुन, नकुल व सहदेव ह्या पांच पांडवांपासून द्रौपदीला अनुक्रमें प्रातिविंध्य, सुतसोम, श्रुतकीर्ति, शतानीक आणि श्रुतकर्मा असे पांच पुत्र झाले होते.

जमलेल्या शूरांचा परिचय यापूर्वी त्यांना झाला नसेल असें राजा दुर्योधनास वाटून त्यानें सेनाधिपतींचें वर्णन केलें असावें असें वाटतें. ॥ ७ ॥

**भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ॥**
**अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥**
**अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ॥**
**नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥**

तेच भवदादयोमान्निमित्तं प्राणत्यागे कृतनिश्चयाः । अनेकशस्त्रास्त्रधारिणोयुद्धकुशलाः ॥ ८ ॥ ९ ॥

आपण, भीष्माचार्य, कर्ण, कृपाचार्य, युद्धांत जयशाली असा तुमचा पुत्र अश्वत्थामा, माझा बंधु विकर्ण, तसेंच सोमदत्ताचा पुत्र भूरिश्रवा. हे सर्व योद्धे शूर असून, अनेक प्रकारच्या शस्त्रास्त्रांनीं युक्त, युद्धकुशल, हातीं घेतलेलें कार्य शेवटास नेणारे व माझ्याकरितां मरणास सिद्ध झालेले असे आहेत. ॥ ८ ॥ ९ ॥

**अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ॥**
**पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ १० ॥**

तथापि भीष्माभिरक्षितमस्मद्बलं न पांडवविजये समर्थं प्रतीयते १०

पितामह भीष्माचार्यांनीं रक्षण केलेलें आमचें सैन्य पांडवांशीं युद्ध करण्यास असमर्थ आहे. तसेंच भीमानें रक्षण केलेलें पांडवसैन्य आमच्याशीं युद्ध करण्यास समर्थ आहे. ॥ १० ॥

**अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः ॥**
**भीष्ममेवाभिरक्षंतु भवंतः सर्व एव हि ॥ ११ ॥**

अतोभवंतः सर्वएव व्यूहप्रवेशमार्गेषु स्वां स्वां भूमिमपरित्यज्यावस्थितास्सन्तः यथाऽन्यैर्युध्यमानः पृष्ठतः कैश्चिन्नहन्यते तथा भीष्मं रक्षंत्विति द्रोणाचार्यमुक्त्वा दुर्योधनो विरराम ॥ ११ ॥

याकरितां तुह्मीं सर्व वीर, नेमून दिलेली रणभूमींतील जागा न सोडतां,

व्यूहांत प्रवेश करण्याच्या सर्व मार्गांवर राहून शत्रूंशीं युद्ध करा, व तुह्मीं युद्ध करीत असतां, शत्रूकडील लोक मागच्या बाजूनें शस्त्रास्त्रप्रयोग करून, भीष्मास न मारतील अशा रीतीनें भीष्माचें संरक्षण करा ह्मणजे आह्मांस जय मिळेलच; असें द्रोणाचार्यांस सांगून दुर्योधन स्तब्ध झाला. ॥ ११ ॥ पूर्वीं भगवान् श्रीकृष्ण आणि विदुर इत्यादिकांनीं प्रतापी पांडवां-बरोबर लढाई केल्यानें त्यांत तुला यश मिळणार नाहीं असा दुर्योधनास उघड रीतीनें उपदेश केला असतांहि तिकडे त्यानें दुर्लक्ष करून उलट युद्धारंभीं आपलाच कमीपणा द्रोणाचार्यांस दाखवून दिला. यावरून त्याचा असा उद्देश दिसून येतो कीं, आपण कमीपणा दाखविल्यानें योद्धे सावधपणानें युद्ध करि-तील. असें नसतें तर पांडवांवर भगवत्कृपा असल्यानें ते समर्थ आहेत, हें जर दुर्योधनाच्या मनांत येतें तर युद्धोपक्रमच चालू झाला नसता.

**तस्य संजनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः ॥**
**सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥ १२ ॥**
**ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ॥**
**सहसैवाभ्यहन्यंत स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥ १३ ॥**

तस्य विषादमालोक्य भीष्मः तस्य हर्षं जनयितुं सिंहनादं शंखाध्मानंच कृत्वा शंखभेर्यादिनिनादैश्च विजयाभिशंसिनं घोषं चाकारयत् ॥ १२ ॥ १३ ॥

हें दुःखी अशा दुर्योधनानें द्रोणाचार्यांशीं केलेलें भाषण श्रवण करून कुरुवृद्ध जे भीष्माचार्य ह्यांनीं दुर्योधनाला आनंद देणारा असा सिंहनाद करून शंख वाजविला व भीष्माचार्यांनीं उल्हासानें वाजविलेला शंख ऐकून दुर्योधनाच्या पक्षाकडील वीरांनां उल्हास प्राप्त होऊन ते आपापलीं वाद्यें वाजवीत घोष करूं लागले आणि त्या सैन्यांतील शंख, भेरी, पणव, आनक, दुंदुभी वगैरे अनेक वाद्यें वाजूं लागल्यामुळें मोठा शब्द झाला. ॥ १२ ॥ १३ ॥

**ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यंदने स्थितौ ॥**
**माधवः पांडवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥ १४ ॥**

ततस्तद्घोषमाकर्ण्य कृष्णार्जुनौ स्वं स्वं शंखं प्रदध्मतुः ॥१४॥

तो दुर्योधनाच्या सैन्यांत झालेला शंखादिकांचा वाद्यघोष ऐकून, शुभ्र घोडे जोडलेल्या मोठ्या रथावर आरूढ झालेल्या कृष्णार्जुनांनींहि आपापले शंख वाजविले. ॥ १४ ॥

पांचजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ॥
पौंड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥ १५ ॥
अनंतविजयं राजा कुंतीपुत्रो युधिष्ठिरः ॥
नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥
काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः ॥
धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥
द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ॥
सौभद्रश्च महाबाहुः शंखान्दध्मुः पृथक् पृथक् ॥१८॥

ततो वृकोदरादयश्च स्वकीयान् शंखान् पृथक् पृथक् दध्मुः ॥ १५ ॥ १६ ॥ १७ ॥ १८ ॥

इंद्रियांचा स्वामी जो भगवान् **श्रीकृष्ण** यानें आपला पांचजन्य नांवाचा शंख वाजविला, आणि याचा सखा जो शत्रूंचें मर्दन करून धन संपादन करणारा **अर्जुन**, यानें आपला देवदत्त नांवाचा शंख वाजविला. तसेंच भयंकर कर्म करणारा व वृक नामक अग्नि ज्याच्या पोटांत आहे असा जो **भीम**, त्यानें आपला पौंड्रक नांवाचा मोठा शंख वाजविला. कुंतीपुत्र जो **युधिष्ठिरराजा**, यानें आपला अनंतविजय नांवाचा शंख वाजविला व **नकुल** आणि **सहदेव**, यांनीं अनुक्रमें सुघोष आणि मणिपुष्पक या नांवाचे आपले शंख वाजविले. तसेंच धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ जो **काशिराजा**, रथ्यांमध्यें श्रेष्ठ जो **शिखंडी**, **धृष्टद्युम्न**, **विराट**, वीरांकडून पराजय न पावणारा यदुकुलोत्पन्न **सात्यकि**, **द्रुपदराजा**, **प्रतिविंध्यादि** पांच द्रौपदीपुत्र, आजानुबाहु सुभद्रापुत्र **अभिमन्यु**, यानींहि आपापले शंख निरनिराळे वाजविले. ॥१५॥१६॥१७॥१८

**स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ॥**
**नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९ ॥**

स घोषो नभश्च पृथिवींच व्याप्तः प्रतिध्वनिभिः पूरयन् धृतराष्ट्रस्य तव पुत्राणां हृदयानि विदारितवान् अद्यैव नष्टं कुरुकुलमिति त्वत्पुत्रा मेनिरे ॥ १९ ॥

याप्रमाणें वाजविलेल्या शंखादि वाद्यांच्या ध्वनीनें पृथ्वी व आकाश व्याप्त होऊन त्यायोगानें तुझ्या पुत्रांच्या हृदयांत कंप उत्पन्न झाला ( ह्मणजे ) त्या ध्वनीच्या योगानें आजच कुरुकुलाचा नाश होतो कीं काय असें तुझ्या पुत्रांस वाटलें. ॥ १९ ॥

**अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः ॥**
**प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥ २० ॥**

हे महीपते धृतराष्ट्र अथार्जुनोयुद्धार्थं व्यवस्थितान् धार्तराष्ट्रान् दृष्ट्वा ॥ २० ॥

हे राजा धृतराष्ट्रा, उभय सेनेमध्यें याप्रमाणें वाद्यांचा घोष झाल्यानंतर युद्ध करण्याकरितां उभे राहिलेल्या तुझ्या पुत्रांस पाहून व एकमेकांवर शस्त्रप्रयोग करण्याचा काळ प्राप्त झाला आहे असें जाणून, ज्याच्या ध्वजावर मारुती आहे अशा अर्जुनानें आपलें गांडीव धनुष्य उचलिलें. ॥ २० ॥

**हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ।**

अर्जुन उवाच ।

**सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥ २१ ॥**
**यावदेतान्निरीक्षेऽहं योध्दुकामानवस्थितान् ॥**
**कैर्मया सह योद्धव्यमस्मिन्रणसमुद्यमे ॥ २२ ॥**

कृष्णंप्रति कैःसह मया योध्धव्यं ॥ २१ ॥ २२ ॥

त्याकाळीं ज्ञानेंद्रियांचा स्वामी असा जो **श्रीकृष्ण** त्याप्रत **अर्जुन** ह्मणाला कीं, हे च्युति ( नाश ) रहित भगवन् श्रीकृष्णा, माझा रथ उभय

सेनेच्या मध्यभागीं नेऊन उभा कर. ज्यांच्याबरोबर मला युद्ध करावयाचें व जे लढाईच्या इच्छेनें रणांत जमले आहेत, असे प्रतियोद्धे कोण कोण आहेत. हें जेथून मला दिसेल अशा ठिकाणीं रथ नेऊन उभा कर. ह्मणजे या युद्धांत कोणाकोणाशीं युद्ध करावें लागेल हें मी पाहतों. ॥ २१ ॥ २२ ॥

**योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ॥**
**धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥**

दुर्योधनस्य प्रियं कर्तुमिच्छंतो य इह समागताः तानेतान् यावदवेक्ष्यामि तावदुभयोः सेनयोर्मध्ये रथं स्थापयेत्युवाच ॥ २३ ॥

धृतराष्ट्राचा पुत्र दुष्ट दुर्योधनराजा, याचें प्रिय करण्याच्या इच्छेनें या रणांगणांत मिळालेले जे वीर युद्धाच्या इच्छेनें उभे राहिलेले आहेत त्यांस मी पाहतों. ॥ २३ ॥

संजय उवाच ।

**एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ॥**
**सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ २४ ॥**

एवमर्जुनेनोक्तो हृषीकेशो भीष्मादीनां मुखे रथं स्थापयित्वा।२४।

( याप्रमाणें अर्जुनाचें वचन ऐकून भगवान् श्रीकृष्णानें काय केलें, हें संजय धृतराष्ट्रास सांगतो. ) संजय ह्मणतो, असें अर्जुनानें ह्मटल्यावर श्रीकृष्णानें सर्व रथांत उत्तम जो अग्नीनें दिलेला अर्जुनाचा विजय रथ, तो दोन्ही सेनांच्यामध्यें उभा केला. ॥ २४ ॥

**भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् ॥**
**उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥ २५ ॥**

हे पार्थ एतान् कुरून पश्येत्युवाच ॥ २५ ॥

कुरुकुलश्रेष्ठ भीष्म आणि द्रोणाचार्य यांच्या सन्मुख, सर्व राजांच्या समुदायांत रथ उभा करून, श्रीकृष्ण अर्जुनास ह्मणाले; हे अर्जुना, येथें मिळालेल्या कौरवसेनेंतील वीरांना पहा. ॥ २५ ॥

**तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् ॥**
**आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ।२६।**

तत्र पार्थो मान्यानाचार्यान् दृष्ट्वा कृपया व्याप्तो विषीदन् कृष्णमिदमुवाच ॥ २६ ॥

हें वचन ऐकून अर्जुनानें कुरुक्षेत्राचे ठिकाणीं दोन्हीं सैन्यांत उभे असलेले पितृतुल्य ( चुलते ) आजे ( भीष्म ) गुरु ( द्रोणाचार्य ) मामा, पुत्र, नातू, भाऊ, मित्र, सासरे आणि आप्त यांनां पाहिलें. ॥ २६ ॥

**श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ॥**
**तान्समीक्ष्य स कौंतेयः सर्वान्बंधूनवस्थितान् ॥२७॥**

हे कृष्ण योध्दुमिच्छंतं पुरतः सम्यग्व्यवस्थितमिमं बंधुजनं दृष्ट्वा मे हस्ताद्यवयवाः व्यशीर्यंते ॥ २७ ॥

तसेंच युद्धाकरितां उभयसैन्यांत उभे असलेले आपले सासरे, आपल्यावर उपकार करणारे मित्र व समस्त बांधव यांनां पाहून अर्जुनानें असें केलें. ॥ २७ ॥

**कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ॥**

अर्जुन उवाच ।

**दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥**

**देहे कंपो रोमांश्च जायते । धनुर्हस्तात्पतति त्वक्च परितस्तप्यते ॥२८॥**

पुढें युद्धांत होणारे पितृव्यादिकांचे वध व त्यांपासून होणारें दुःख मनांत आणून, कृपेनें अत्यंत दुःखी होऊन, अर्जुन श्रीकृष्णाला ह्मणाला कीं, युद्धाच्या इच्छेनें समीपभागीं उभे राहिलेल्या आप्तजनांनां पाहून माझी झालेली अवस्था मी तुला सांगतों. ॥ २८ ॥

**सीदंति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ॥**
**वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥**

**नच स्थातुं शक्नोमि मनश्च मे भ्रमति दुर्निमित्तानि पश्यामि ॥२९॥**

माझे हातपाय वगैरे अवयव थरथर कांपत आहेत, तोंडाला अगदीं कोरड पडली आहे आणि माझ्या शरीरास कंप सुटून अंगावर रोमांच उभे राहिले आहेत. ॥ २९ ॥

**गांडीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते ॥**
**न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥ ३० ॥**

**श्रेयश्च न पश्यामि ॥ ३० ॥**

माझ्या हातांतील गांडीव ( गेंड्याच्या पाठीवरील कांब्यापासून केलेलें ) धनुष्य गळून पडत आहे, अंगाचा दाह होत आहे, रणभूमींत उभें राहण्यास शक्ति राहिली नाहीं व माझें मन भ्रमिष्ट झाल्यासारखें होत आहे. ॥ ३० ॥

**निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ॥**
**न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ ३१ ॥**

नच विजयादि फलमिच्छामि । ततः किमस्माकं राज्यादिभिः कार्यं ॥ ३१ ॥

हे केशवा ( ब्रह्मरुद्रपालका ), माझ्या ठिकाणीं होणारीं हीं अपजय-सूचक चिन्हें पाहून, युद्धांत झालेल्या स्वजनांचे वधानें आपलें कल्याण होईलसें दिसत नाहीं. ॥ ३१ ॥

**न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ॥**
**किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ॥३२॥**
**येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ॥**
**त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥३३॥**

यदर्थमस्माकं राज्याद्यपेक्षा त एते प्राणधनादित्यागमंगीकृत्य युद्धार्थमवस्थिताः । ततः किमस्माकं राज्यादिभिः कार्यम् ॥३२॥३३॥

व ज्याअर्थीं स्वजनवधानें श्रेय नाहीं त्याअर्थीं त्यांच्या वधानें होणाऱ्या जयाची इच्छा मी करीत नाहीं; व हे **गोविंदा** ( वेदप्रतिपाद्या ), ज्याअर्थीं मला जयप्राप्तीची इच्छा नाहीं त्याअर्थीं मला राज्य व सुख हीं नकोत. आप्त-

जनांस मारून प्राप्त होणाऱ्या राज्यापासून अथवा त्या राज्यभोगापासून आणि असे भोग घेत जगण्यापासून उपयोग तरी काय? ज्या आप्तजनांच्या सुखाकरितां राज्य व सुगंधवस्त्रादिभोग व शब्दादिजन्य सुखें आह्मीं इच्छितों, तेच आप्तजन प्राण किंवा धन यांची आशा सोडून युद्धांत उभे आहेत. ॥३२॥३३॥

**आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ॥**
**मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंधिनस्तथा ॥ ३४ ॥**
**एतान्न हंतुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ॥**
**अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५ ॥**

यदि मयि युद्धादुपरते मामेते हन्युस्तथाप्येतान् घ्नतोपि त्रैलोक्यराज्यस्यापि हेतोः हंतुं नेच्छामि किमुतमहीमात्रनिमित्तम् ।३४।३५।

ते कोण ह्मणशील तर—गुरु, चुलते, पुत्र, तसेच आजे, मामे, सासरे, नातू, शालक व संबंधिक हे होत. हे **मधुसूदना** ( मधु नामक दैत्य संहारक श्रीकृष्णा ), मी युद्धाविषयीं उपेक्षा केली असतां जरी **दुर्योधनाच्या** सैन्यांत असणाऱ्या **द्रोणाचार्या**दिकांनीं मला शस्त्रास्त्रांनीं मारिलें तरी मी त्यांनां मारूं इच्छित नाहीं. यांनां मारल्यापासून त्रैलोक्यराज्याची ( स्वर्गमृत्युपातालांची ) प्राप्ति होणार असली तरीही मी त्याची इच्छा करणार नाहीं. मग पृथ्वीच्या लाभाची इच्छा काय ह्मणून करीन? ॥ ३४।३५ ॥

**निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ॥**
**पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥**

किंचैतद्धनान्नकाप्यन्यास्माकं प्रीतिः पापंच स्यात् । यद्यप्येतेग्निदागरदाः शस्त्रपाणयो धनापहारिणश्चाततायिनः नैषां वधे दोषोस्ति तथापि पितृत्वादिना मान्यत्वादेषां वधे पापमेवाश्रयेत् ॥३६॥

हे **जनार्दना** ( भक्तांचे पुनर्जन्मरूप क्लेश हरणकर्त्या श्रीकृष्णा ), दुर्योधनादिक जे धृतराष्ट्रपुत्र त्यांनां मारिल्यानें आमचें काय प्रिय होणार आहे! उलट आह्मांस पाप मात्र लागेल. जरी ते आततायी ( अग्नीनें निरपराध्यांचीं घरें जाळणारे, किंवा विष देऊन प्राण घेणारे, अथवा परस्त्री व परधन हरण करणारे ) आहेत व अशा पाप्यांचा राजनीतिप्रमाणें वध केला असतां दोष

नसला तरी या युद्धांत पितृसमान व गुरुसमान असणाऱ्यांचा नाश होण्याचा संभव असल्यामुळें यांच्या नाशापासून आह्मांस पाप लागल्यावांचून राहणार नाहीं. याकरितां यांना मारून आह्मीं सुखी कसे होऊं ? ॥ ३६ ॥

**तस्मान्नार्हा वयं हंतुं धार्तराष्ट्रान्स्वबांधवान् ॥**
**स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ ३७ ॥**

नचैतान् घ्नतामस्माकं सुखं स्यात् ॥ ३७ ॥

हे माधवा ( हे लक्ष्मीपते श्रीकृष्णा ), हे दुर्योधनादिक धृतराष्ट्रपुत्र आमचे बंधु असल्यानें यांना आह्मीं मारणें योग्य नव्हे. याकरितां स्वकीय आप्तांनां मारिल्यानें आह्मी सुखी कसे होऊं ? ॥ ३७ ॥

**यद्यप्येते न पश्यंति लोभोपहतचेतसः ॥**
**कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥**
**कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ॥**
**कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥**

यद्यप्येते दुर्योधनादयो लोभेन भ्रष्टविवेकाः दोषं न पश्यंति । तथाप्यस्माभिर्दोषं प्रपश्यद्भिरस्मात्पापान्निवर्तितुं कथं न ज्ञेयम् ३८।३९

जरी प्राप्तैश्वर्यापेक्षां अधिक धनेच्छेच्या लोभानें दुर्योधनादिकांचा विवेक नष्ट झाल्यानें कुलक्षय व मित्रद्रोह यांपासून प्राप्त होणारें पातक ते जाणत नाहींत तरी हे जनार्दना, ( दुष्टजनांचा संहारकर्त्या श्रीकृष्णा ) कुलक्षयापासून होणारे मोठे दोष आह्मीं जाणत असतां होणाऱ्या या पापापासून दूर राहण्याविषयीं आह्मी कां जाणूनये. ३८।३९ कारण

**कुलक्षये प्रणश्यंति कुलधर्माः सनातनाः ॥**
**धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥**
**अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यंति कुलस्त्रियः ॥**
**स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥**

संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ॥
पतंति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः ॥ ४२ ॥
दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ॥
उत्साद्यंते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥
उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ॥
नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥
अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ॥
यद्राज्यसुखलोभेन हंतुं स्वजनमुद्यताः ॥ ४५ ॥

यद्यहं कुलक्षयं कुर्यां तदा वर्णसंकरादिकमहमेव कृतवान् स्याम् ॥ ४०-४५ ॥

कुळाचा नाश झाला असतां अनादिकालापासून चालत आलेला कुळधर्म नाश पावतो, व कुळधर्माचा नाश झाला असतां होणाऱ्या अधर्मानें र्व कुळ अधोगतीस पोहोंचतें, आणि हे भगवन् श्रीकृष्णा, कुळ अधर्मानें याप्त झालें असतां त्या कुळांतील स्त्रिया दूषीत होतात व हे यदुकुलोत्पन्ना, त्रेया दूषित झाल्या असतां वर्णसंकर होतो, आणि असा वर्णसंकर झाल्यानें ळाचा नाश करणाऱ्यांनां त्या कुळासहित नरकप्राप्ति होते, व श्राद्धतर्पणादि क्रिया लुप्त झाल्यामुळें त्यांचे पितरहि नरकांत पतन पावतात; कुलवध करणाऱ्यांच्या वर्णसंकरकारक अशा या दोषांनीं कुळपरंपरेनें चालत आलेले पुरातन र्म नष्ट होतात. ( प्रलयकालीं सर्वसंहारकर्त्या श्रीकृष्णा, ) ज्यांचे कुळधर्म ाश पावले आहेत त्यांनां निश्चयानें नरकवास प्राप्त होतो असें वृद्धांचें वचन ऐकतों. या सर्व कारणांमुळें माझें मन त्यांच्या वधाविषयीं निश्चित होत नाहीं. रेरे! आह्मीं राज्यलोभामुळें आपल्या आप्तलोकांनां मारण्यास उद्युक्त झालों ाहों, यामुळें महत्पाप करण्यास सिद्ध झालों आहों. ॥ ४०-४५ ॥ ( अशा ाक्षेपानें युद्ध न करितां राहिलों तर उलट ते आह्मांला मारतील असें मनांत ाणून अर्जुन ह्मणतो. )

यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः
धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६ ॥

अहो कष्टमापतितं ॥ ४६ ॥

जर शस्त्रें धारण करून रणभूमीवर उभे राहिलेले धृतराष्ट्राचे पुत्र, युद्धाविषयीं निरपेक्ष व शस्त्ररहित अशा मला मारतील तर तें मला अत्यंत हितकारक आहे. ॥ ४६ ॥

संजय उवाच ।

## एवमुक्त्वार्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् ॥
## विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥ ४७ ॥

तस्माद्बंधुवधान्मरणमेव वरमित्युक्त्वार्जुनः सशरं चापं विसृज्य दुःखकातरचित्तो रथस्योपर्युपाविवेश । एतद्धृतराष्ट्राय संजयोकथयत् ॥ ४७ ॥

( " युद्धांत आप्तलोकांच्या वधामुळें होणारा नरकवास चुकावा ह्मणून अर्जुनानें धृतराष्ट्रपुत्रांनीं आपणांस मारणें हें ' अत्यंत हितकारक ' असें ह्मटलें. शिवाय शस्त्ररहित अशा आपला त्यांनीं वध केला असतां क्षात्रधर्माविरुद्ध वागल्यामुळें त्यांची अपकीर्ति होईल असें अर्जुनास वाटलें." हा वृत्तांत ऐकून धृतराष्ट्राच्या मनांत येईल कीं, अर्जुनाच्या मताप्रमाणें पांडव रणभूमि सोडून रणांतून निघून गेले असतील. ह्मणून धृतराष्ट्रानें प्रश्न करण्यापूर्वींच संजय त्यास सांगतो. ) संजय ह्मणाला; हे धृतराष्ट्रा, अर्जुन याप्रमाणें बोलून, बंधुनिमित्तशोकानें चित्त उद्विग्न झाल्यामुळें, धनुष्यबाण टाकून, युद्ध करण्याचें आसन सोडून रथांत बसला. ॥ ४७ ॥

## इति श्रीमद्भगवद्गीता सूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादेऽर्जुनविषादयोगोनाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

इति श्रीमद्भगवद्गीताविवृत्तौ विद्याधिराजभट्टोपाध्यायविरचितायां श्रीमध्वमतानुवर्ति व्याख्योपेतायाम् श्रीमदिंदिराकांततीर्थ श्रीपादवीरचितायां प्राकृतटीकायां प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

# अथ द्वितीयोऽध्यायः

संजय उवाच ।

**तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् ॥**
**विषीदंतमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥ १ ॥**

ततः किं वृत्तमित्यपेक्षायां संजय उवाच । तमिति ॥ १ ॥

( अशा कुलवधाच्या भीतीनें अर्जुन युद्धाविषयीं निरपेक्ष होऊन खालीं बसल्यानंतर काय वर्तमान झालें तें संजय धृतराष्ट्रास सांगतो. )

संजय ह्मणाला; हे धृतराष्ट्रा, याप्रमाणें कृपायुक्त व अश्रुधारापूरित नेत्रांनीं शोकयुक्त झालेल्या अशा अर्जुनाला मधुनामक दैत्यसंहारकर्ते—

श्री भगवानुवाच ।

**कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ॥**
**अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २ ॥**

एवंविधमर्जुनं भगवानुवाच । कुतस्त्वेति द्वाभ्याम् । हे अर्जुन कुतो हेतोः त्वामिदं दुःखमस्थाने समुपस्थितम् । एतदविद्वत्सेवितं परलोकविरोध्ययशस्करं च ॥ २ ॥

श्रीभगवान् ह्मणाले; हे अर्जुना, वडिलांनीं न आचरिलेलें, स्वर्गसाधनास विरोध करणारें, आणि अपकीर्तीस साधनभूत असें हें दुःख युद्धोत्सवाचे वेळीं उत्पन्न होणें योग्य नसून तें तुझे ठिकाणीं कोणत्या कारणानें उत्पन्न झालें? ॥ २ ॥

**क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ॥**
**क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ ३ ॥**

तस्मात्कातर्यं मागाः हे पार्थ त्वय्येतन्नयुज्यते हे शत्रुतापन तुच्छं हृद्गतकातर्यं त्यक्त्वा युद्धायोत्तिष्ठेति ॥ ३ ॥

शत्रूंस ताप देणाऱ्या हे कुंतीपुत्रा अर्जुना, असें नपुंसकत्व धारण करूं

नको. हें मित्रेपण तुजसारख्या प्रतापसिंधु वीरास योग्य नव्हे. तुझ्या अंतःकरणांत उत्पन्न झालेलें व बलहीन मनुष्यांनींच धारण करण्यास योग्य अशा या नपुंसकत्वाचा त्याग करून युद्धास ऊठ. ॥ ३ ॥

अर्जुन उवाच ।

**कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ॥**
**इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥ ४ ॥**

पुनरपि स्नेहकारुण्यधर्मभयाकुलो भगवदुक्तं हितमजानन्नर्जुन उवाच । कथमित्यादिपंचभिः श्लोकैः । हे मधुनामकदैत्यहिंसक हे शत्रुनिबर्हण कृष्ण वाचापि प्रतिभटीकर्तुमनर्हौ संभावनीयौ भीष्मद्रोणौप्रति युद्धे बाणैः कथं योत्स्यामि ॥ ४ ॥

मी भयानें युद्धाविषयीं उपेक्षा केली नाहीं, तर युद्धांत अन्याय होण्याचा संभव असल्यामुळें माझें मन युद्धास अनुकूल होत नाहीं. अर्जुन ह्मणाला, हे शत्रुसंहारक मधुसूदना, युद्धांत अन्याय तो कोणता असें ह्मणशील तर सन्मान देण्यास योग्य अशा भीष्मद्रोणादिकांबरोबर प्रतियोद्धा होऊन मी बाणानें कसें बरें युद्ध करावें? ॥ ४ ॥

**गुरूनहत्वा हि महानुभावान्**
**श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ॥**
**हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव**
**भुंजीय भोगान्रुधिरप्रदिग्धान् ॥ ५ ॥**

नचैतद्धनने तदप्राप्तेर्देहनिर्वाहो नस्यादिति शंक्यं यतो गुरूनहत्वेहलोके भिक्षान्नमपि भोक्तुं श्रेष्ठं परलोकदुःखाभावात् । अर्थकामान् गुरून् हत्वातु तैर्भुज्यमानांस्तानेव भोगांस्तद्रुधिरेणापसिच्य तेष्वासनेषूपविश्य तदेतत्परलोकदुःखातिशायितदुःखम् ॥ ५ ॥

युद्ध न केल्यानें राज्यप्राप्तीच्या अभावामुळें जीवनवृत्ति कशी चालेल असें ह्मणशील तर—महत्पूज्य आचार्यादिकांचा वध करण्यापेक्षां या भूलोकांत

भिक्षावृत्तीनें जीवन करणें श्रेयस्कर होय. कारण त्यांच्या वधापासून होणाऱ्या यमयातना तरी चुकतील. शिवाय परलोकवार्ता तर राहूं दे, परंतु कौरवांपासून मिळणाऱ्या द्रव्याच्या आशेनें बद्ध झालेल्या अशा आचार्यादिकांचा वध करून या लोकांतच त्यांच्या रक्तानें भिजलेल्या आसनवसनादिकांचा उपभोग करण्यापासून अत्यंत दुःख होणार नाहीं काय? ॥ ५ ॥

न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो
यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ॥
यानेव हत्वा न जिजीविषाम-
स्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥ ६ ॥

किंच विजयोपि संदिग्धः द्वयोः सेनयोर्मध्ये नोऽस्माकं कतरत् किंनाम गरीयः अधिकतरं भविष्यतीति वयं न विद्मः । किंतत् यद्वा एतान् वयं जेष्यामः नो अस्मानेते जेष्यंतीति । किंच यानेव हत्वा जीवितुं नेच्छाम एव । एते सन्मुखेऽवस्थिताः अतो जयपराजयौ तुल्यावेव ॥ ६ ॥

शिवाय अधर्मास अनुसरून तरी आह्मांसच जय येईल असें कसें ह्मणावें? या उभय सेनेंत कोणाचा पक्ष बलिष्ट होईल हें आह्मांस समजत नाहीं. आह्मीं त्यांस जिंकूं किंवा ते आह्मांस जिंकतील याचा निश्चय करितां येत नाहीं. आह्मीं त्यांनां जिंकिलें तरी तोहि आह्मांस अपजयच असें समजलें पाहिजे. कारण ज्यांनां आह्मीं मारूं इच्छित नाहीं, असे हे धृतराष्ट्रपुत्र युद्धाला सिद्ध होऊन समोर उभे आहेत. ॥ ६ ॥

कार्पण्यदोषोपहतस्वभावः
पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ॥
यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे
शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥७॥

तस्माद्बंधुवात्सल्यकुलक्षयकृतदोषशंकाभिहतशौर्यलक्षणस्वभावो धर्मे संदिग्धमनाः अहं त्वां पृच्छामि मे निश्चितं तन्मां शाधि शिक्षय मम किमपि न प्रतिभाति ॥ ७ ॥

अर्जुन ह्मणतो, हे श्रीकृष्णा, बंधुवात्सल्य व कुलक्षयकृत दोष या दोहोंच्या शंकेनें माझा क्षात्रस्वभाव नष्ट झाला आहे, व धर्माविषयीं माझें मन मोहित झालें आहे, याकरितां मी तुला विचारितों कीं, जें खरोखर कल्याणकारक असेल तें मला सांग. मी तुझा शिष्य आहे व तुला शरण आलों आहें आणि मला कांहीं सुचत नाहीं तर मला आज्ञा कर. ॥ ७ ॥

न हि प्रपश्यामि ममापनुद्या-
द्यच्छोकमुच्छोषणमिंद्रियाणाम् ॥
अवाप्य भूमावसपत्नमृद्धं
राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥ ८ ॥

इंद्रियाणामतिशोषकरं मदीयं दुःखं यत्किमपनुद्यादपनयेत्तदहं भूमौ निष्कंटकं समृद्धं राज्यं तथा सुराधिपत्यं प्राप्यापि न प्रपश्यामि ८

मला प्राप्त झालेलें इंद्रिय शोषण करणारें दुःख, निष्कंटक व संपत्तीनें युक्त असें पृथ्वीचें राज्य किंवा इंद्रपद प्राप्त झालें तरी कमी होईल असें दिसत नाहीं. आप्तजन नाहींसे झाल्यावर राज्य तरी घेऊन काय करावयाचें आहे? ८

संजय उवाच ।

एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतप ॥
न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥ ९ ॥

एवमुक्तवतार्जुनेन किं कृतमित्यतः । संजय उवाच एवमिति ९

अर्जुन याप्रमाणें बोलल्यानंतर त्यानें काय केलें, अशी धृतराष्ट्रास शंका येईल ह्मणून संजय ह्मणाला, निद्रेला अर्थात् आळसाला जिंकणारा असा अर्जुन, इंद्रियांचा प्रवर्तक व वेदप्रतिपाद्य अशा श्रीकृष्णास ह्मणाला, कीं हे शत्रुसंतापका, मी युद्ध करणार नाहीं. असें ह्मणून तो उगाच राहिला; हें आश्चर्य होय. ॥ ९ ॥

**तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ॥**
**सेनयोरुभयोर्मध्ये विषीदंतमिदं वचः ॥ १० ॥**

ततः किंजातमित्यत आह । तमुवाचेति । प्रहसन्निवेति । परिहासवाक्यं वदन्नित्यर्थः ॥ १० ॥

हे भरतकुलोत्पन्न धृतराष्ट्रा, दोहों सेनांच्या मध्यभागीं शोक करणाऱ्या अर्जुनास, उपहास केल्यासारखें करून भगवान् श्रीकृष्ण पुढीलप्रमाणें ह्मणाले. ॥ १० ॥

श्री भगवानुवाच ।

**अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ॥**
**गतासूनगतासूंश्च नानुशोचंति पण्डिताः ॥ ११ ॥**

एवं साक्षादिंद्रावतारमुत्तमाधिकारिणमात्मनः प्रियतममर्जुनं क्षत्रियाणां विशेषतोपि परधर्मं नारायणद्विट्तदनुबंधिनिग्रहं बंधुस्नेहाद्धर्मत्वेनाशंक्य ततो निवृत्तप्रायं स्वविहितवृत्या भक्त्या भगवदाराधनमेव परमोधर्मस्तद्विरुद्धः सर्वोप्यधर्मस्तदधीनत्वात्सर्वस्येति बोधयन् श्रीभगवानुवाच । अशोच्यानिति । प्रसिद्धानुवादेनाप्रसिद्धस्यविधेयत्वात् । याननुशोचितवानसि ते अशोच्याः यांश्चभाषसे ते प्रज्ञावादा इति योजना अज्ञानव्यपदेशात् प्रज्ञया स्वमनीषयैवोत्थितवादाः न वृद्धसंमताः यद्वा प्रकर्षेण जानंतीति प्रज्ञाः तदवादास्तद्विरुद्धवादाः कथमासन्नविनाशा अशोच्या इत्यतआह । गतासूनिति । पण्डिताः अगतासुन् जीवतइव गतासून्मृतान्नानुशोचंति यद्वा गतानिर्गता असवः प्राणायेभ्यस्तइति गतासवोदेहाः तद्विपरीत्वाज्जीवाः अगतासवः । पुरुषस्य मृतौ ब्रह्मन् प्राणाभागत एव तु । आधिदैवं प्राप्नुवंति भागतोनुव्रजंति तमितिवचनात् तानुभयान् नानुशोचंति ॥ ११ ॥

याप्रमाणें खिन्न होऊन बसलेला, साक्षात् इंद्रावतार, उत्तमाधिकारी, आपणास अत्यंत प्रिय व भगवद्द्वेषि व तदनुयायि यांचा वध, हा क्षत्रियांचा परम धर्म असून, अशा धर्माविषयीं केवळ भ्रातांच्या स्नेहानिमित्तानें अधर्म

अशी शंका घेऊन युद्धाविषयीं उदासीन झालेला, अशा अर्जुनाला " स्ववृत्तीनें भक्तिपूर्वक भगवदाराधन करणें हाच काय तो भगवत्प्रिय धर्म, व तद्विरुद्ध चालणें हा अधर्म असून, सर्व जग भगवदधीन आहे " हें जाणविण्याकरितां, सर्व प्राण्यांची उत्पत्ति व विनाश, आगमन व गमन, विद्या व अविद्या इत्यादि जाणणारा आणि ऐश्वर्य, वीर्य, यश, श्री, ज्ञान, विज्ञान, इत्यादि प्रत्येक संपूर्ण गुणांनीं युक्त असा भगवान् श्रीकृष्ण त्यास ह्मणाला, ज्यांच्या उद्देशानें तूं शोक करितोस ते शोक करण्यास योग्य नव्हेत आणि अज्ञानपणानें स्वबुद्धिवाद-कल्पित गोष्टी बोलतोस, हीं तुझीं भाषणें वृद्ध व शास्त्रज्ञ लोकांस आवडणारीं नाहींत. ( प्रस्तुत या भीष्मादिकांचा युद्धाच्या ठिकाणीं होणारा मृत्यु जवळ आला असून त्याबद्दल शोक करूं नये कीं काय, असें जर ह्मणशील तर ) ज्ञानी मनुष्य मेलेल्यांचा किंवा जिवंत असलेल्यांचा शोक करीत नाहींत. कारण देह अनित्य व जीव नित्य आहे; याकरितां या दोहोंबद्दलही शोक करणें योग्य नाहीं. ॥ ११ ॥

## न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ॥
## न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥ १२ ॥

कुतो मृतान्नानुशोचंति इत्यतो नित्यत्वादित्याह । नत्वेवेति । जातुकदाप्यहं न नासमपि त्वासमेव । त्वं न नासीः अपि त्वासीः । इमे जनाधिपाः न नासन्नपि त्वासन्नेव । अहं यूयंच सर्वे वयं अतः परस्मिन्नंते काले नचैव न भविष्यामः । अपितु भविष्यामइति काल-द्वयसंबंध उक्तः । वर्तमानकालसंबंधस्फुटत्वान्नोक्तः । एवं कालत्रय-संबंधित्वेनानुमितानां नित्यत्वान्नशोकःकार्यइत्यर्थः । भगवत्सामर्थ्य-स्यार्जुनेन बहुशो दृष्टत्वादचिंत्यशक्तित्वेनेश्वरस्य जीववैलक्षण्यावगमा-दनित्यत्वस्य नाशंकितत्वाद्दृष्टांतत्वेन ग्रहणं यथाहं परमेश्वरः सर्ववेदांतेषु नित्यः प्रसिद्धः तथा त्वमेते जनाधिपाश्च नित्याः । ननु ईश्वरवज्जीवा-नामपि नित्यत्वं वेदांतेषु प्रसिद्धमेव । सत्यं । तथापि नित्योनित्यानां चेतनश्चेतनानामेको बहूनां यो विदधातिकामा नित्यादौ नित्ये निर्धा-रणसामर्थ्यात् जीवानां नित्यत्वमीश्वरस्य परमानित्यत्वमवगम्यते । नित्यत्वंच विनाशाभावो नचाभावे तारतम्यमस्तीति जीवनित्यत्वमुप-

**चरितमिति शंक्येत तदर्थं जीवनित्यत्वमुपपाद्यते तत्र वक्ष्यमाणचित् प्रतिबिंबादिकं साधनं । अनादित्वेन नित्यत्वसाधने व्यभिचारापरिहाराय विशेषणमुपादेयम् ॥ १२ ॥**

आतां मेल्याबद्दल कां शोक करीत नाहींत, असें ह्मणशील तर जीव नित्य आहे ह्मणून. आतां जीव नित्य असें तरी कशावरून समजावें असें ह्मणशील तर हे **अर्जुना,** मी पूर्वी नव्हतों असें नाहीं, तर मी होतोंच. तूंही पूर्वी नव्हतास असें नाहीं, तर तूंही होतास. हे राजे पूर्वी नव्हते असें नाहीं, तर तेही होतेच. पुढेंही आह्मी सर्व नसूं असें नाहीं, तर असणारच. याप्रमाणें भूतकाळीं व भविष्यकाळीं अर्थात् वर्तमानकाळींहि असणाऱ्या जीवाविषयींहि विनाशशंका घेऊन शोक करणे योग्य नव्हे. **भगवंताचें** सामर्थ्य **अर्जुनानें** पुष्कळ वेळां पाहिलें असून, अचिंत्य व अघटित ह्मणजे करण्यास व न करण्यास किंवा अन्यथा करण्यास शक्तिमान् अशा ईश्वराला जीवभिन्नत्वानें जाणल्यावरून परमात्म्याच्या नाशाविषयीं मुळींच शंका नव्हती. तथापि **श्रीकृष्णानें** केवळ जीवाच्या नित्यत्वाविषयीं मात्र ( नत्वेवाहं जातु नासं ) हा श्लोक दृष्टांताकरितां सांगितला. ईश्वरासारखें जीवाला नित्यत्व आहे, असें वेदांतावरून दिसतें खरें तथापि त्यांतील सूक्ष्म विचार तो एवढाच कीं, ईश्वर नित्यजीवापेक्षां परम नित्य आहे; व चेतनत्वरूप धर्मानें साम्य दिसलें तरी तो ईश्वर परम चेतन होय. नित्यत्व ह्मणजे विनाशराहित्य, त्यांत तारतम्य नाहीं. यावरून जीवनित्यत्व उपचार मात्र. अर्थात् जीवाला नाश आहे अशी शंका येईल तर ( जीव हें बिंबरूपी परमात्म्याचें प्रतिबिंब असल्यामुळें बिंबरूप परमात्मा परमनित्य असतांना प्रतिबिंबरूप जीवांचा नाश कसा होईल ? ) ईश्वरास परमनित्यत्व व जीवांस नित्यत्व आहे. ह्मणजे यांतील मुख्यार्थ एवढाच कीं, ईश्वर हा स्वातंत्र्यज्ञानानंदादि गुणांनीं परिपूर्ण आहे व जीव तदधीन व अस्वातंत्र्यादि गुणांनीं युक्त आहे हाच दोहोंतील भेद होय. बिंबाच्या अधीन प्रतिबिंब नियमानें असावयाचें. किंवा जावत्काळपर्यंत बिंबस्थिति आहे तावत्काळपर्यंत प्रतिबिंबस्थिरता ही आहे. हें आदर्शावलोकनानें सर्वांस स्पष्ट रीतीनें अनुभवास येतें. तसेंच जीव हें परमात्म्याचें प्रतिबिंब असलें तरी उभयतांमध्यें अत्यंत भेद असतोच. जसें आदर्शापुढें राहिलेला बिंबरूपी पुरुष

पूर्वाभिमुख असतांहि प्रतिबिंब पश्चिमाभिमुख असतें आणि बिंबानें डावा हात उचलला असतां प्रतिबिंब उजवा हात उचलतें, इत्यादि प्रत्यक्षसिद्ध किंवा अनुमानसिद्ध सत्यंभिदा इत्यादि अनुमानुकूलभेद तत्वनिर्णयादि टीकादि ग्रंथांत दर्शविलेला सूज्ञांच्या लक्षांत असेलच. येथें अति विस्तार होईल ह्मणून किंचिद्दिग्दर्शन मात्र केलें आहे. ॥ १२ ॥

देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ॥
तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥

ननु देहव्यतिरिक्तात्मनः सत्वेतस्य नित्यत्वं स्यात्तदेवासिद्धमितिचेत्तत्राह । देहिनइति । यथा कौमारादिविशिष्टदेहभेदेपि योऽहं कुमारशरीरवानभूवं सोऽहं इदानीं युवशरीवानूवर्ते इत्यादिप्रतिसंधानादेहातिरिक्त आत्मासिद्धस्तथैतद्देहपरित्यागेन देहांतरप्राप्तावपि प्रत्यग्रजातस्य शिशोराहाराद्यभिलाषेण पूर्वदेहानुसंधानात्तद्व्यतिरिक्तात्मसिद्धिरिति । ननु न तावज्ज्ञानमात्रेण देहव्यतिरिक्तात्मसिद्धिर्नैरात्म्यवादिभिरुत्प्रेक्षितैः शरीरादीनां सन्निधौ ज्ञानदर्शनात् । तेषामन्यत्तमस्य ज्ञातृत्वात् । नापि प्रत्यभिज्ञानेन तस्य भ्रांतित्वादित्यत आह । धीरइति । धीरोधीमानेवंविधैः कुतर्कैः देहव्यतिरिक्तात्मविषये न मुह्यति । ते धीरेण स्वयमेव निराकार्याइति । तथाहि । नतावदहंमनुष्यइत्यनुभवाच्छरीरस्य कौमाराद्यनुभवः शंकनीयः भौतिकत्वात् । अन्यथामृतस्याऽपि तत्प्रसंगात् प्राणेंद्रियापगमान्मृतस्यादर्शनमितिचेन्न । प्राणादेः सत्वेपि सुप्त्यादौ ज्ञानादर्शनात् । अतएव मनसोऽपि न ज्ञातृत्वं । सुप्त्यादौ सत्यपि मनसि ज्ञानादर्शनात् । करणत्वाच्च । मनसाजानामीत्यनुभवात् । नच करणस्य कुठारस्येव कर्तृत्वमुपपद्यते । एतेन बाह्येंद्रियाणामपि ज्ञातृत्वं निरस्तं । चक्षुषापश्यामीत्यादौ तेषामपि करणत्वप्रतीतेः नचप्रत्याभिज्ञानं भ्रांतिः । बाधका भावादिति ॥ अथवा बंधुस्नेहाद्धित्वया स्वधर्मनिवृत्तिः क्रियते सा किं चेतननाशभयात् । किंवा देहनाशभयात् । नाद्यः । तस्याविनाशत्वादेवेत्याह नत्वेवेति । युद्धगतत्वादीश्वरस्याप्यनित्यत्वं शंकेत साशंका लोकोपकारार्थं

विवक्षितं किंतु प्रवाहविच्छेदोपि सुप्त्यादावभावादित्याशयेनोक्तं ॥ अनित्या इति ॥ शेषं पूर्ववत् ॥ १४ ॥

देहाला बाल्यतारुण्यादि भिन्न भिन्न अवस्था प्राप्त झाल्या तरी शोक करण्याचें त्यांत कांही कारण नाहीं. कारण बाल्यावस्थेंतीलच शरीर वृद्धिंगत होऊन तारुण्य दशेंत दर्शनस्पर्शनादि उपभोगादिकांला मिळतें. तसें अन्यदेह प्राप्त झाला असतां पूर्वदेहाचें दर्शनसुद्धां मिळत नाहीं. अशी शंका येईल. तर त्याविषयीं **श्रीकृष्ण** सांगतात. हे भरतकुलोत्पन्ना कुंतिपुत्रा **अर्जुना**, या देहांत अहंभावयुक्त जीवाला देहाभिमान असल्यामुळें, इंद्रियांशीं संबंध असणाऱ्या शीतोष्णादि विषयांनीं सुखदुःखादिक होत आहेत. या विषयांचा संबंध किंवा वियोग पुनः पुनः होत असल्यानें ते अनित्य आहेत ( शरीर आहे तोंपर्यंत असणारे नव्हेत ) हे केवळ माझे ह्मणून अभिमान असल्यास मात्र सुखदुःखकारक होतात. जसें—वस्त्र, घोडा, गाई इत्यादि वस्तूंचा क्रयविक्रय करण्याचे पूर्वीं त्यांवर धन्याचा आपलेपणाचा अभिमान असल्यानें, त्यांच्या वृद्धीनें किंवा नाशानें धन्यास सुखदुःखें प्राप्त होतात. पण त्यांचा विक्रय केल्यानंतर तीं होत नाहींत. याचप्रमाणें तूंही देहेंद्रियादिकांचा अभिमान सोडून सुखदुःख धैर्यानें सहन कर.

**यं हि न व्यथयंत्येते पुरुषं पुरुषर्षभ ॥**
**समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ १५ ॥**

ननु दुःखाभावस्ययुद्धाकरणेपि संभवादलं तत्कृत्वा दुःखाभावायाभिमानत्यागेनेत्यतो देहाद्यभिमानत्यागेन भवन्दुःखपरिहारः स्वयं फलरूपोऽपि परमपुरुषार्थहेतुश्च भवतीत्याह । यंहि इति । यमेते मात्रास्पर्शा नव्यथयंति नचालयंति सुखदुःखलक्षणवैषम्यवंतं नकुर्वंति। सोऽमृतत्वाय मोक्षाय कल्पते योग्योभवतीत्यर्थः । सुप्त्यादौ पामराणामप्यभिमानाभावेन व्यथाभावादमृतत्वप्रसक्तिरित्यत उक्तं पुरुषमिति । पुरुषमेव संतं शरीराभिमानिनमित्यर्थः । अथवा कथं व्यथापरिहारमात्रेणामृतत्वं तमेवंविद्वानित्यादिश्रुतिविरोधादित्यतो न केवलं व्यथापरिहारमात्रेणामृतत्वं अपितु ब्रह्मज्ञानेनापीत्याशयेनाह । पुरुषमिति ।

**पुरुसरणात्पुरुषं । पुरुब्रह्मगुणाधिक्यात्तज्ज्ञानात् पुरुषःस्मृत इतिवचनात् । केनोपायेनाभिमानत्यागोभवतीत्यतउक्तं समदुःखसुखमिति । दुःखं यथानुपादेयमपुरुषार्थत्वात्तथा वैषयिकं सुखममृत्वविरोधित्वादनुपादेयं यस्यससमदुःखसुखः । एवंभावे कथं सुखहेतुषु शोभनाध्यासलक्षणस्तद्विरोधिषु द्वेषलक्षणाभिमानः स्यादितिभावः । समदुःखसुखत्वंच कथं भवति इत्यत उक्तं धीरमिति । सुखदुःखकार्यहर्षविषादस्तंभकमयत्नवंतमित्यर्थः । अत्र चतुर्मुखादन्येषां धैर्येणातिव्यथाराहित्यमेव । लिंगभंगात्प्राग्देहाद्यभिमानराहित्याभावात् । उक्तंच । ब्रह्मानिरभिमानित्वाच्छरीर्यप्यशरीरवान् । रुद्राद्यास्तन्वभिमानाद्बहिरर्थयुजस्तथेति ॥ १५ ॥**

देहादिविषयाभिमानाचा त्याग करून युद्धांत होणारें दुःख सहन करण्यापेक्षां, युद्धच करण्याचें टाळून दुःखप्राप्ति चुकविणें काय वाईट. अशी अर्जुनास शंका येईल ह्मणून, युद्ध न करून बंधुवधाचें दुःख टाळण्यापेक्षां हरिद्वेषि शत्रूंचा नाशरूप व मला प्रिय असें कर्म करण्यानें प्राप्त होणारा पुरुषार्थ संपादण्याकरितां सुखदुःखाभिमान सोडून युद्ध केलें असतां काय अनिष्ट आहे. या हेतूनें **श्रीकृष्ण** ह्मणतात. हे पुरुषश्रेष्ठा **अर्जुना**, ज्या मनुष्यांस हें इंद्रियस्पर्श सुखी किंवा दुःखी करीत नाहीं तीं मनुष्यें जन्ममरणरहित अशा मुक्तीस जाण्यास योग्य होतात. असें झाल्यास ( निद्रावस्थेंत असणाऱ्या मनुष्यांससुद्धां इंद्रियांपासून होणारा सुखदुःखाभिमान नसल्यानें अशांसहि मुक्त कां ह्मणूंनये. ) अशी शंका येईल; ह्मणून पुरुष पद घातलें आहे. केवळ इंद्रियाभिमान नसल्यानेंच मुक्ती मिळते असें नाहीं. पुरुष ह्मणजे ब्रह्मज्ञानी अशास मात्र अभिमानत्यागानें मुक्ती होते. दुःख जसें त्रासकारक असल्यानें त्याज्य आहे, त्याचप्रमाणें विषयसुखही परमपुरुषार्थरूप मुक्तिप्रतिबंधक असल्यामुळें तें अवश्य सोडावें हेंच काय तें समदुःखसुखत्व. हें अमृतत्व ( मोक्षसुख ) सुखदुःख प्राप्त झालें असतां इंद्रियांचा अभिमान टाकण्यास समर्थ व विवेकबुद्धियुक्त आणि ब्रह्मज्ञानी अशा पुरुषाशिवाय अन्य अज्ञलोकांस प्राप्त होत नाहीं. या अभिमानत्यागाविषयीं मुख्य अधिकार सर्व जीवगणांत श्रेष्ठ जो चतु-

वदति । समाधिस्थस्येति । संप्रज्ञात समाधिस्थस्येति लक्षणप्रश्नः । असंप्रज्ञातसमाधेः शुभाशुभप्राप्त्ययोगेन यःसर्वत्रानभिस्नेह इत्यादि वक्ष्यमाण लक्षणायोगात् । यद्यपि संप्रज्ञाते प्रजहातीत्येतेन विरोधस्तथापि तत्रैवकामाद्यभावनियमो नास्ति । तदुक्तम् । कामादयो न जायंते ह्यपि विक्षिप्तचेतसाम् । ज्ञानिनां ज्ञाननिर्धूतमलानां देवसंश्रयादिति । यद्वा । समाधिस्थस्य विषमबुद्धिवर्जितस्येत्यर्थः स्थिता प्रज्ञा ज्ञानं यस्य सः स्थितप्रज्ञः । का भाषा कथं भाष्यते । किं लक्षणमित्यर्थः । स्थितधीः किंप्रभाषेत किंवा प्रत्यासीत किंवा व्रजेत एवं परमानंदतृप्तः किमर्थं प्रवृत्तिं करोतीति प्रश्नाभिप्रायः ॥ ५४ ॥

प्रस्तुत ज्ञान्यांचा विचार चालल्यानें त्यांचीं लक्षणें जाणण्याच्या हेतूनें **अर्जुन** प्रश्न करितो:—हे ब्रह्मरुद्रादिप्रेरक भगवन् **श्रीकृष्णा,** ध्यानाविषयीं निश्चळ, बुद्धियुक्त व अपरोक्ष ज्ञानयुक्त अशा पुरुषास लौकिक व्यवहाराचें केव्हांही कारण नाहीं. याकरितां तो कोणत्या फळाच्या इच्छेनें बोलतो, बसतो किंवा चालतो ? भेरीताडनादिकानें सुद्धां चंचलत्व न पावणाऱ्या अशा अपरोक्ष ज्ञाननिष्ठाला लौकिक फळाची अपेक्षा नसल्यानें बोलणें वगैरेस कांहींच कारण संभवत नाहीं. अर्जुन हा स्वतः ज्ञानी असल्यानें तीं लक्षणें त्यास माहित नव्हतीं असें नाहीं. पण साक्षात् भगवंताच्या मुखानें स्पष्टीकरण झाल्यानें योग्य जनांस त्याची माहिती मिळावी हा त्याचा मुख्य हेतु आहे. ॥ ५४ ॥

श्रीभगवानुवाच.

**प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् ।**
**आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ ५५ ॥**

प्रारब्धकर्मणेषत्तिरोहितब्रह्मणो वासनया मत्तादेरिवाल्पाभिसंधिप्रवृत्तयः संभवंतीति यानिशेत्यादिना दर्शयिष्यन् प्रथमतो लक्षणं भगवानुवाच । प्रजहातीति । प्रायः सर्वान् कामान् प्रजहातीति । नतु सर्वात्मना । तदुक्तम् । सर्वकामनिवृत्तिस्तु ज्ञानिनो न कथंचन । अनिषिद्धामितैवातोह्यकामत्वमितीर्यत इति । प्रायोपि सर्वकामहानस्यासंभवमाशंक्याह । मनोगतानिति । मनोगताहि कामाः अतस्तत्रैव

तद्विरुद्धज्ञानोत्पत्तौ तेषां हानं युक्तमितिभावः । आत्मनि विष्णावेवा स्थितः सन् आत्मना विष्णुना तत्प्रसादेन तुष्टः । विषयांस्तु परित्यज्य रामेस्थितिमतस्ततः । दैवाद्भवति वै तुष्टिर्नान्यथा तु कथंचनेतिवचनात् यदेदृशो भवति तदाऽपरोक्षज्ञानीत्युच्यते ॥ ५५ ॥

प्रारब्धकर्मयोगानें ब्रह्मोपासन विचार किंचित् दूर झालेला असा ज्ञानी मदानें मोहित झालेल्या मनुष्यासारखा प्रवृत्त होतो असें ( या निशा सर्वभूतानां ) या श्लोकानें सांगण्यास प्रारंभ करणारे **श्रीकृष्ण** प्रथमतः ज्ञान्याचें लक्षण सांगतात. श्री भगवान् ह्मणतात–पृथापुत्रा **अर्जुना,** परमात्म्याचे ठिकाणीं एकाग्रचित्त असून त्याच्या प्रसादानें संतुष्टचित्त असलेला ज्या वेळीं मानासिक विषयवासना सोडतो त्या वेळीं त्याला निश्चलज्ञानी ह्मणजे अपरोक्षज्ञानी असें नांव प्राप्त होतें. ॥ ५५ ॥

**दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।**
**वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६ ॥**

एतदेव कामशब्दोपलक्षितदोषांतरत्यागकथनादिना स्पष्टयति । दुःखेष्वित्यादिभिस्त्रिभिः । कामादिराहित्यादिकं जिज्ञासुभिःसाध्यं ज्ञानिनितु तत्सिद्धम् । तद्वै जिज्ञासुभि साध्यं ज्ञानिनां यत्तु लक्षणमित्युक्तेः । अतः स्वभावसिद्धकामादिराहित्याख्यलक्षणस्य जिज्ञासुषु नातिव्याप्तिः शोभनाध्यासो रागः । रसोरागस्तथारक्तिः शोभनाध्यास उच्यत इत्यभिधानात् । वीता रागादयो यस्येति तथोक्तः ॥ ५६ ॥

कामशब्दोपलक्षित दोषांतरत्यागाच्या कथनानें मागील अर्थ स्पष्ट करितात:—स्वप्रारब्धानुसार दुःखें प्राप्त झालीं आहेत असें जाणून त्या दुःखानें ज्याचें अंतःकरण क्षुब्ध होत नाहीं किंवा जो सुखप्राप्तीविषयीं आशारहित असतो तसेंच जो अकल्याणकारक अशा विषयस्नेहभयक्रोधादिकांनीं रहित असतो त्यास दृढबुद्धि असें ह्मणतात ॥ ५६ ॥

**यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।**
**नाभिनंदति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५७ ॥**

सर्वत्रानभिस्नेहत्वाच्छुभाशुभं प्राप्य नाभिनंदति न द्वेष्टि ॥५७॥

जो सर्वत्र स्नेहरहित असून तत्तत्कालीं प्राप्त होणारें शुभाशुभ फल भोगण्याविषयीं संतुष्ट किंवा असंतुष्ट होत नाहीं तो केवळ परमात्मनिष्ठ व त्याचीच मति स्थिर झाली असें समजावें. ॥ ५७ ॥

**यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः ॥**
**इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥**

संहरते नियच्छति । सर्वशः सर्वाणि इंद्रियाणि सर्वेभ्यो वा इंद्रियार्थेभ्यो विषयेभ्यः ॥ ५८ ॥

ज्याप्रमाणें कूर्म ( कांसव ) आपले अवयव आंत ओढून घेतो त्याप्रमाणें जो ब्रह्मनिष्ठ आपलीं सर्व इंद्रियें विषयांपासून ओढून घेतो त्याची प्रज्ञा प्रतिष्ठित झाली असें समजावें. ॥ ५८ ॥

**विषया विनिवर्तंते निराहारस्य देहिनः ।**
**रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥**

एतादृशंचेज्ज्ञानं तर्हि सर्वे न साधयंतीत्यतो निराहारत्वेन इंद्रियजयः तेनैव ज्ञानं इत्यति दुःसंपादत्वं ज्ञानस्य वक्तुमुपोद्घाततयेंद्रियजयस्यतावन्महाप्रयत्नसाध्यत्वमाह । विषया इति । निराहारस्य देहिनः निराहारत्वेनेति यावत् । विषयाःरूपादयः तद्भोगसमर्थानींद्रियाणि अनेनोपलक्ष्यंते निवर्तंते । रसवर्जं रसोरागस्तं वर्जयित्वा । विषयाभिलाषो मानसिको निराहारत्वेन न निवर्तते । किंतु सरसः परंब्रह्म दृष्ट्वा साक्षात्कृत्वैव स्थितस्य पुंसो विनिवर्तते । अथवा निराहारत्वेन रसादितरविषयाः तद्भोगशक्तयस्तदाकांक्षाश्च विनिवर्तंते रसं वर्जयित्वा मनसो रसविषयाकांक्षा रसनेंद्रियस्य तद्भोगशक्तिश्च न निवर्तते । तयोस्त्वपरोक्षज्ञानेन निवृत्तिरिति । तदुक्तम् । इंद्रियाणि जयंत्याशु निराहारा मनीषिणः । वर्जयित्वा च रसनामसौरस्ये प्रवर्धत इति ॥ ५९ ॥

असें हें ज्ञान आहे तर सर्व लोक कां संपादन करीत नाहींत अशा शंकेचें निरसन व्हावें ह्मणून, निराहारानें इंद्रियजय होतो व या साधनानें ज्ञान

साधणें हें अति दुर्घट व महाप्रयासानें साध्य होणारें आहे अशाबद्दल सांगतात:— आहाररहित देहधाऱ्याचीं विषयोपभोगास समर्थ अशीं इंद्रियें विषयाभिलाष सोडल्यानें त्या विषयापासून निवृत्त होतात. निराहाराच्या योगानें इंद्रियांचें विषयोपभोगाचें सामर्थ्य नाश पावतें, विषयोपभोगाची इच्छा नाश पावत नाहीं. ती विषयोपभोगाची इच्छा परमात्म्याला साक्षात् पाहिल्यानें सहज निवृत्त होते. अथवा रसविषयांच्या इच्छेवांचून ह्मणजे रसनेंद्रियाच्या रस उपभोगण्याच्या शक्तीवांचून इतर विषयांची इच्छा किंवा विषय भोगण्याची शक्ति हीं निवृत्त होतात. रसविषयांची इच्छा सुद्धां परमात्म्याच्या प्रत्यक्ष ज्ञानानें निवृत्त होते. ज्या वेळीं बाह्येंद्रियसमूह विषयसमूहानें संबंध पावतात त्या वेळीं मन विषयांचे ठिकाणीं जातें व मग विषयांची अपेक्षा होते व जीव विषयापेक्षेनें युक्त होतो. याप्रमाणें होणें हीच इंद्रियासक्ति होय. ज्यावेळीं इंद्रियसमूहांस विषयसंबंध होत नाहीं. यद्यपि विषयसंबंध झाला तरी मन विषयांचे ठिकाणीं आसक्ति धरीत नाहीं आणि मन आसक्त झालें तरी विषयांची अपेक्षा होत नाहीं असें होणें हा इंद्रियजय असें समजावें. यासाठीं इंद्रियांस जिंकणें हें मोठें प्रयासाचें काम आहे असें समज. ॥ ५९ ॥

**यततो ह्यपि कौन्तेय पुरुषस्य विपश्चितः ।**
**इंद्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः ॥ ६० ॥**

ननु इंद्रियजयार्थं किं निराहारत्वलक्षणेन महाप्रयत्नेन प्रत्याहारादिना साधारण प्रयत्नेन तत्संभवात् । तथा किं ब्रह्मापरोक्षज्ञानेन नित्यानित्यविवेकादिज्ञानेनापि तदुपपत्तेरित्यत आह । यततोहीति । विपश्चितः परोक्षज्ञानिनः यततः साधारण प्रयत्नवतोपि पुरुषस्य शरीराभिमानिनः प्रमथनशीलानि इंद्रियाणि प्रसभं बलात् पुरुषस्य मनो हरंति । विषयसन्निकृष्टानि तदभिमुखं कृत्वा तद्रागि कुर्वंतीत्यर्थः ६०

इंद्रियांना विषयांपासून पराङ्मुख करण्यासाठीं महाकष्टसाध्य अशा निराहाररूप प्रयत्नाचें काय कारण आहे? साधारण इंद्रियदमनादिक उपायांनींहि विषयांपासून इंद्रियांना परांङ्मुख करितां येईल. तसेंच दुःसाध्य अशा ब्रह्माच्या अपरोक्ष ज्ञानावांचून केवळ प्रत्याहार व नित्यानित्य वस्तु विवेकज्ञानानेंहि इंद्रि-

यांचें दमन करणें संभवेल अशी शंका येऊं नये ह्मणून सांगतातः-हे कुंतीपुत्रा अर्जुना. प्रत्याहारादि साधारण प्रयत्नानें युक्त व नित्यानित्यविवेचनकुशल अशा विद्वान मनुष्याचें सुद्धां मनोभंजन करण्यास समर्थ अशीं तीं विषयेंद्रियें बलात्कारानें मनाला विषयांसक्त करून सर्वसाधारण प्रयत्न निष्फल करितात. याकरितां भवभंजनसमर्थ अशा ब्रह्माच्या अपरोक्ष ज्ञानाशिवाय इतर साधनांचें काय प्रयोजन आहे? ॥ ६० ॥

**तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।**
**वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१ ॥**

**यदींद्रियाणि साधारणयत्नविवेकज्ञानाभ्यां न जीयंते तर्ह्यशक्यान्येव जेतुमित्यत आह । तानीति । तानींद्रियाणि संयम्योक्तनिराहारत्वविवेक सेवादिबहुतरप्रयत्नेन युक्तो मयि मनोयुक्तः अहमेव परः सर्वस्मादुत्कृष्टो यस्य स मत्परः आसीत । एवं महाप्रयत्नेनेंद्रियनिग्रहेसत्युक्तलक्षणं ज्ञानं सिध्यतीत्याह । वशेहीति ॥ ६१ ॥**

पूर्वीच्या साधारण प्रयत्नांनीं जर तीं इंद्रियें जिंकणें अशक्य आहे तर तीं कोणाच्याही स्वाधीन होणार नाहींत. अशी शंका येऊं नये ह्मणून सांगतातः- जरी तीं इंद्रियें अशा पोकळ उपायाभासांनीं वश होत नाहींत, तरी केवळ स्वभक्तांना दुस्तर अशी संसाररूपी नदी तरण्यास नावेच्या स्थानापन्न असणारा मीच सर्वोत्तम आहें, असें जाणून व सर्वापत्तीपासून उद्धरण्याचा हवाला माझेवरच टाकून राहणारा व ज्यास माझें अपरोक्षज्ञान झालें आहे, असा ज्ञानी इंद्रियासक्त न होतां स्थिर राहतो. ज्याच्या अधीन रमाब्रह्मापासून तृणपाषाणापर्यंत सर्व जगत् आहे तो मी सर्व जगन्नियंता असल्यानें तत्वाभिमानी अशा देवतागणासहवर्तमान सर्व इंद्रियगणांत प्रेरणा करणाऱ्या अशा मला दुर्घट असें या त्रिभुवनांत कांहींच नाहीं असें तूं समज. ज्ञानानें दुर्बल असलेले लोक मात्र प्रथमतःच या गव्हर व निराहारत्व लक्षण अशा मुख्य साधनाला भिवून, अमुख्य अशा प्रत्याहारादि लक्षण उपायांत मति गुंग करून त्या इंद्रियांचे जोरानें फसतात. किंबहुना त्या ज्ञानहीनांची दशा बहु शोचनीय असते. ॥ ६१ ॥

ध्यायतो विषयान्पुंसः सङ्गस्तेषूपजायते ।
सङ्गात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ।६२ ।

रागादिराहित्यं ज्ञानिलक्षणमुक्तम् । जिज्ञासूनाचसाध्यं रागादिकारण फलज्ञानेच रागादित्यागो भवति । अतस्तदर्थं रागादिदोषकारणं फलमाह ॥ ध्यायत इति द्वाभ्याम् । ६२ ।

जें पूर्वी ( वितरागभयक्रोध ) या श्लोकानें ज्ञान्याचें लक्षण सांगितलें आहे, तें ज्ञानेच्छु पुरुषांनीं महत्प्रयास पडले तरी अवश्य संपादावें. न संपादल्यास त्यापासून होणारा महदनर्थरूप अंतराय सांगतात:—लोकविडंबनार्थ विषयसमुदायापासून दूर राहून, मोहक अशा त्या विषसमान विषयांचें ध्यान करणाऱ्या पुरुषाला त्या विषयांविषयीं स्नेह उत्पन्न होतो. व त्यामुळें वरचेवर अति दुःसह अशी विषयेच्छा उत्पन्न होते व त्या विषयेच्छेप्रमाणें जे आपणास अनुकूल न होतां उलट प्रतिकूल होतांत त्यांवर अनिवार्य असा क्रोध उत्पन्न होतो. ॥ ६२ ॥

क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।
स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥६३॥

संमोहोऽकार्येच्छा संमोहोधर्मकामितेतिवचनात् । अधर्मे धर्मबुद्धिर्वा स्मृतिविभ्रमः ज्ञातस्यापि प्रतिषेधादिशास्त्रार्थस्यान्यथा स्मरणं बुद्धिनाशः । पूर्वं निर्णीतदोषज्ञानस्य सर्वात्मना नाशः । प्रणश्यति नरकाद्यनर्थं प्राप्नोति । तदुक्तम् । अधर्मकामिनः शास्त्रे विस्मृतिर्जायते यदा । दोषादृष्टेस्तत्कृतेश्च नरकं प्रतिपद्यत इति ॥ ६३ ॥

क्रोधापासून संमोह ह्मणजे अधर्माची इच्छा होते, अधर्मबुद्धीपासून स्मृतिविभ्रम ह्मणजे शास्त्रांतील निषिद्ध विषयांचें ग्राह्यत्वेंकरून ज्ञान होतें. त्या अन्यथा स्मरणापासून बुद्धिनाश होतो, बुद्धिनाश झाल्यानें नरकाद्यनर्थ प्राप्त होतात. असें होतें त्यामुळें रागद्वेषास कारण जें विषयध्यान त्याचा त्याग करून रागद्वेषरहित व्हावें.

रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् ।
आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ ६४ ॥

अस्त्वेवं राग द्वेष परिहारः ततः किमित्याकांक्षायां तस्याव्यवहितफलमाह । रागद्वेषेतिद्वाभ्यां । रागद्वेषवियुक्तैस्ताभ्याम प्रयुक्तैः स्वाधीनैरिंद्रियगणैः केवलशरीरधारणार्थं विषयांश्चरन् अनुभवन् विधेयः आत्मा जितं मनोयस्यसः इंद्रियजयस्य फलमाह। प्रसादमधिगच्छतीति । प्रसादोनाम प्रायोयत्नं विनापि विषयेष्वप्रवृत्तिः ॥ ६४ ॥

याप्रमाणें रागद्वेषत्याग केल्यास काय फळ प्राप्त होणार तें सांगतातः— जो अधिकारी रागद्वेषरहित इंद्रियांनीं केवळ शरीरसंरक्षणार्थ विषयोपभोग करणार। होतो त्याचें अंतःकरण शुद्ध असल्यामुळें त्याचीं इंद्रियें प्रसन्न होतात ह्मणजे प्रयत्नावांचूनही विषयांकडे इंद्रियें जात नाहींत. ॥ ६४ ॥

**प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।**
**प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥**

प्रसादेसति किं स्यादित्यतआह । प्रसादइति । मनः प्रसादस्य सर्वदुःखहानिर्न साक्षात्फलं किंतु ज्ञानद्वारेणैवेत्याह । प्रसन्नेति । प्रसन्नचेतसोहि बुद्धिः शीघ्रं पर्यवतिष्ठति । ब्रह्मापरोक्षेण सम्यक्स्थितिं करोति ॥ ६५ ॥

मनुष्याला बंधमोक्षाला कारण मन असल्यामुळें मनःप्रसन्नतेनें होणारें फळ सांगतात;—मन प्रसन्न झाल्यानें सर्व दुःखनिवृत्ति होते व त्या मनुष्याची बुद्धि निश्चळ होऊन तो अपरोक्ष ज्ञानास योग्य होतो. असें मनःप्रसादसामर्थ्य आहे. ॥ ६५ ॥

**नास्ति बुद्धिरयुक्तय न चायुक्तस्य भावना ।**
**न चाभावयतः शान्तिरशान्तय कुतः सुखम् ॥६६॥**

श्रवणमननाभ्यामुपकृतेन ध्यानेनैव ब्रह्मापरोक्षज्ञानसिद्धेः किमनेन प्रसादेन । यदर्थमिंद्रियजयोपेक्षित इत्याशंक्य प्रसादाभावे दोषमाह । नास्तीति । नहि प्रसादंविना युक्तिः चित्तनिरोधः अयुक्तस्यच बुद्धिः सम्यक्ज्ञानंनास्ति । ध्यानेनैव ज्ञानोत्पादात् कथंनास्ति बुद्धिरयुक्तस्येत्यतआह । नचेति । भावनाध्यानं नचाभावयतः शांतिः

भगवन्निष्ठा भवति । शमोमन्निष्ठता बुद्धेरितिवचनात् । तथाऽभावयतोऽज्ञानवर्जितस्य शांतिर्मुक्तिर्नास्ति । शांतिर्मोक्षोथनिर्वाणमित्यभिधानात् । अशांतस्य अमुक्तस्य कुतः सौख्यमिति ॥ ६६ ॥

श्रवणमननानेंच ( ध्यानद्वारानें ) अपरोक्षज्ञान होत असल्यामुळें दुःसाध्य मनःप्रसादाकरितां इंदियजय कशास पाहिजे या शंकेचें निवारण करतात. मनःप्रसाद झाल्यावांचून चित्तनिरोध होत नाहीं. तो नसल्यानें यथार्थ ज्ञान होत नाहीं. ज्ञान नसल्यानें ध्यान होत नाहीं. ध्यानहीन मनुष्यास भगवन्निष्ठ बुद्धि नाहीं. ती नसल्यानें मोक्ष प्राप्त होत नाहीं. ॥ ६६ ॥

**इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ।**
**तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवाम्भसि ॥ ६७ ॥**

कथमयुक्तस्य भावना न भवतीत्यत आह । इंद्रियाणामिति । चरतामिंद्रियाणामनु पश्चात् ईश्वरेण विधीयते क्रियते यन्मनः तदस्य प्रज्ञां प्रज्ञानं वायुरंभसि नावमिव हरति । उत्पत्स्यमानं ज्ञानं निवारयति उत्पन्नमप्याभिभवतीत्यर्थः । अत्रानुःपृष्ठ भावित्वार्थो न लक्षणाद्यर्थ इति कर्मप्रवचनीयो न भवति ॥ ६७ ॥

चित्तनिरोध नसणाऱ्यास ध्यान कां होत नाहीं याविषयीं सांगतातः— विषयसंबंध पावणाऱ्या इंद्रियांस अनुसरून श्रीहरीच्या प्रेरणेनें मन विषयांप्रत धांवतें. त्यामुळें बुद्धि चंचल होते. जसें गहन समुद्रांत वायुवेगानें नौका एकत्र स्थिर रहात नाहीं त्याप्रमाणें मन स्वाधीन नसल्यामुळें तें मन ब्रह्मापरोक्षज्ञानास कारण असलेल्या बुद्धीचा नाश करतें ह्मणजे ब्रह्मापरोक्षज्ञान होऊं देत नाहीं. ॥ ६७ ॥

**तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।**
**इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥**

यतएवंनिगृहीतेंद्रियस्यैव प्रसादः प्रसादवतएव युक्तिः युक्तिमतएव श्रवणमननाभ्यां तत्वज्ञानं तत्वज्ञानवतएव अपरोक्षज्ञानसाधनं ध्यानं नान्यथा तस्मात्सर्वात्मना निगृहीतेंद्रिय एव ज्ञानीति निगमयति । तस्मादिति ॥ ६८ ॥

हे भुजशाली अर्जुना, ज्याचीं इंद्रियें विषयांपासून दूर रहातात त्याची बुद्धि अपरोक्ष ज्ञान होण्यास समर्थ आहे असें समज. ॥ ६८ ॥

**या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।**
**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥६९॥**

चतुःश्लोक्याविक्षिप्योक्तं लक्षणं पिंडीकृत्याह । यानिशेति । या सर्वभूतानां निशा परमेश्वरस्वरूपाज्ञानलक्षणा यस्यांसुप्ता जीवानकिंचिज्जानंति । तस्यामिंद्रियसंयमयुक्तोज्ञानी जागर्ति सम्यगापरोक्ष्येण परमात्मानं पश्यतीत्यर्थः । यस्यां विषयलक्षणायां भूतानि जाग्रति सा मुनेः मननशीलस्य पश्यतोमननजन्यज्ञानवतोनिशा निशायामिव सुप्तोमुनिः विषयान्नजानातीत्यर्थः । अनेन किं प्रभाषेतत्यादेरपि परिहारउक्तोभवति । एतच्च प्रायः परमात्मेतरादर्शनं देवताव्यतिरिक्तज्ञानिविषयं । तदुक्तम् । देवेभ्योन्ये यदा ब्रह्मपश्यंत्यन्यन्न दृश्यते । निशायामिव सुव्यक्तं यथान्यैर्ब्रह्म नेयते । आश्चर्य वस्तुदृग्यद्वत् व्यक्तमन्यन्न पश्यति । एकाग्र्याद्वासुखोद्रेकादेवाः सूर्यवदेवतु । प्रायशः सर्ववेतारः तत्रापिह्युतरोतरमिति ॥ ६९ ॥

पूर्वी चार श्लोकांत निरनिराळें सांगितलेलें ज्ञानिलक्षण एकत्र करून सांगतात:—सर्व विषयी जन ज्या विषयाचे ठायीं जागरूक असतात तेथें ब्रह्मज्ञानी रात्रीप्रमाणें निद्रिस्थ असतो, ह्मणजे विषयचिंतन करीत नाहीं. ज्या परमेश्वरज्ञानाविषयीं ज्ञानी जागरूक असतो तेथें विषयी जन निद्रिस्थ असतात, ह्मणजे त्यांस तें ज्ञान होत नाहीं, अर्थात् ब्रह्मज्ञान्याला विषयासक्ति होत नाहीं हें लक्षण मुख्यत: देवादिकांचे ठायीं असतें ॥ ६९ ॥

**आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं**
**समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत् ।**
**तद्वत्कामा यं प्रविशन्ति सर्वे**
**स शान्तिमाप्नोति न कामकामी ॥ ७० ॥**

बाह्यानुसंधानरहितस्य युज्येतापि कथंचित् मत्तादिवत् गमनादिकं विषयानुभवस्तु दृश्यमानः कथंस्यात् तस्य नियत साधनसाध्य-

स्यानुसंधानेन विना अनुदयादित्याशंक्य विषयानुभवप्रकारमाह । आपूर्यमाणमिति । यो विषयैरापूर्यमाणोप्यचलप्रतिष्ठोभवति नोत्सेकं-प्राप्नोति नच प्रयत्नं करोति नचाभावेशुष्यति । नहि समुद्रः सरित्प्रवेशा-प्रवेशनिमित्तवृद्धिशोषौ बहुतरौ प्राप्नोति प्रयत्नंवाकरोति स मुक्तिप्राप्नो-तीत्यर्थः । उक्तंच । भुंजानोपिहि यः कामान्मर्यादांनतरेत्कचित् । समुद्र वद्धर्ममर्यांनासौकामी स उच्यते । केतिकुत्सितवाचीस्यात् कुत्सितं मानमेवच । कामोमोक्षविरोधीस्यान्न सर्वेच्छाविरोधिनी ॥ ७० ॥

सुरापानादिकेंकरून मदांध पुरुष जसा कर्तव्याविषयीं प्रयत्नरहित असतो त्याप्रमाणें अपरोक्षज्ञानी विषयप्राप्तिविषयीं प्रयत्नशून्य असतो. त्याचा विषयभोग प्रकार असा आहे कीं, समुद्र जसा उदकानें पूर्ण असून पर्जन्य-काळीं नदीचें उदक आलें तर वृद्धि पावत नाहीं, उष्णकाळीं न आलें तरी क्षय पावत नाहीं, त्याप्रमाणें अपरोक्षज्ञानी विषय प्राप्त झाले तरी अथवा न झाले तरी वृद्धिशोषातें पावत नाहीं. व त्याविषयीं प्रयत्नही करीत नाहीं ह्मणूनच मुक्ति पावतो. इतरांला मुक्तिसुख मिळत नाहीं. ॥ ७० ॥

**विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निःस्पृहः ।**
**निर्ममो निरहंकारः स शान्तिमधिगच्छति ॥ ७१ ॥**

एतदेवप्रपंचयति । विहायेति ॥ योनिस्पृहोनिषिद्धस्पृहारहितः कामान् विषयान् निस्पृहतया विहाय चरति भक्षति । भक्षयामीत्या-द्यहंकारममकारवर्जितश्च । अस्वरूपे स्वरूपत्वमतिरेवह्यहंकृतिः । त्याज्या-सर्वत्रममता ज्ञात्वा सर्वं हरेर्वशमितिवचनात् । सहिपुमान्यतः सएव-मुक्तिमधिगछति ॥ ७१ ॥

जो निषिद्ध परित्याग करून सर्वही भगवदधीन आहे असें जाणून व कर्तृत्वाभिमान सोडून त्या त्या काळीं आलेलीं सुखदुःखें भोगतो तोच मोक्षाचा अधिकारी होय. ॥ ७१ ॥

**एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ।**
**स्थित्वास्यामन्तकालेऽपि ब्रम्हनिर्वाणमृच्छति ॥७२॥**

इति श्रीमद्भगवद्गीता सूपनिषत्सु सांख्ययोगो नाम द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

एवमुक्तलक्षणमुपसंहरति ॥ एषेति ॥ ब्राह्मी ब्रह्मविषया स्थितिं लक्षणं एषा उक्तप्रकारा । एतां स्थितिं प्राप्य न मुह्यति । ज्ञानवान् मुच्यतइतियावत् । साच मुक्तिः किंतदेहपातानंतरमेवोतान्यथेत्यपेक्षायामाह ॥ स्थित्वेति ॥ निर्वाणमशरीरं । अभावाज्जडदेहस्य विष्णुर्निर्वाण मुच्यते । भिन्नदेहाभावतोवा ससहस्रशिरा अपीतिवचनात् । अंतकालेऽप्यस्यां स्थितौ स्थित्वैव ब्रह्म गच्छति अन्यथा जन्मांतरं प्राप्नोति ज्ञानिनामप्यंतकाले अन्यमनसां प्रारब्धकर्मभावात् जन्मांतरं प्रारब्धकर्म नाशकाले नियमेन भगवत्स्मृतिर्भवति ततोमोक्षश्च । तदुक्तं ज्ञानिनां कर्मयुक्तानांकायत्यागक्षणोयदा । विष्णुमाया तदा तेषांमनोबाध्यं करोतिहि । बहुजन्मविपाकेन भक्तियोगेन ये हरिं । भजंति तत्स्मृतिंत्वंते देवोयाति नचान्यथेति ॥ ७२ ॥

इति श्रीमद्भगवद्गीताविवृतौ विद्याधिराजभट्टोपाध्यायविरचितायां श्रीमध्वमतानुवर्ति व्याख्योपेतायाम् द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

अपरोक्षज्ञानाचें लक्षण सांगून समाप्त कारितातः—हे पृथापुत्रा अर्जुना ज्यास पूर्वी सांगितल्याप्रमाणें ब्रह्मस्थिति प्राप्त झाली आहे तो अधिकारी कदापि मोहित होत नाहीं. मरणकालीं ही स्थिति असेल तरच त्याला भगवत्प्राप्ति होते. ती नसल्यास ज्ञान्यालाही पुनर्जन्म येणार आहे. ज्ञानीजनासही प्रारब्ध कर्म असल्यास अंतकालीं भगवत्स्मरण होत नाहीं, प्रारब्धकर्मप्रतिबंधक नसल्यास त्यास अंतकालीं नियमानें भगवत्स्मरण होतें व तो ज्ञानी या जडदेहापासून मुक्त होऊन पुनर्जन्ममरणरहित अशा भगवत्पदास जातो ( मुक्त होतो व आपल्या योग्यतेप्रमाणें आनंदातें पावतो. ॥ ७२ ॥

येथें श्रीमदिन्दिराकान्ततीर्थ श्रीपादविरचित प्राकृत टीकेचा दुसरा अध्याय समाप्त झाला.

# अथ तृतीयोऽध्यायः ।

अर्जुन उवाच ।

**ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन ।**
**तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥ १ ॥**

द्वितीयेऽध्याये जीवेश्वरादितत्वज्ञानोपदेशपूर्वकं ज्ञानोपायः कर्मयोगः प्राधान्येनोक्तः । स एव विशेषतः प्रपंच्यतेऽस्मिन्नध्याये । काम्यकर्मणोज्ञानमस्त्युत्तममभिहितं भगवता दूरेण ह्यवरंकर्मेत्यादौ तत्रार्जुन उवाच । ज्यायसीति । काम्यकर्मणः सकाशात् बुद्धिरात्मज्ञानं ज्यायसी प्रशस्ततराचेत्ते मता तर्हि शांतोदांतइत्युपक्रम्यात्मानंपश्येदिति ज्ञानार्थत्वेन विहितान्शुद्धान्यतिधर्मान्शमादीन्विहाय किमिति सर्वएतेपुण्यलोकाभवंतीत्यादिना तथात्रापि हतोवाप्राप्स्यसिस्वर्गमित्यादिना काम्यत्वेन प्रसिद्धे तत्रापि घोरे रागद्वेषाद्युपेते युद्धाख्ये कर्मणियुध्यस्वभारतेति मां नियोजयसि ॥ १ ॥

मागील अध्यायांत **श्रीकृष्णांनीं** अर्जुनास जीव व ईश्वर या उभयतांचें तत्वज्ञान सांगून कर्मयोग सांगितला; त्याचाच विस्तार विशेषेंकरून या अध्यायांत सांगतात. मागील अध्यायांत निष्काम कर्म ह्मणजे काय तें सांगून त्याचे आचरणानें अंतीं मोक्षप्राप्ति होते ह्मणून सांगितलें. यावरून कर्मयोगापेक्षां ज्ञानयोगच श्रेष्ठ असा भगवंताचा अभिप्राय असावा, अशी शंका मनांत येऊन, त्या शंकेचे निरसनार्थ **अर्जुन** प्रश्न करितो:–हे **जनार्दना**, भवबंधमोचक श्रीहरे, काम्यकर्मापेक्षां ब्रह्मज्ञान हें जर श्रेष्ठ आहे तर, हे केशवा, शांततादिपूर्वक इंद्रियनिग्रहयुक्त होऊन परमात्मज्ञान संपादन करण्याचे सर्व यतिधर्म सोडून, काम्यकर्मरूप व रागद्वेषादिकांनीं युक्त–असें अति घोर जें युद्ध, तें करण्याविषयीं मला कां सांगतोस ? ॥ १ ॥

**व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे ।**
**तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ २ ॥**

अथविहितं युद्धमपि कर्मबंधंप्रहास्यसीत्युक्तत्वाज्ज्ञानार्थंभवतीतिमतं तदा व्यामिश्रेणवाक्येन मे बुद्धिं मोहयन्निवासि । अथाभिसंधिभेदादुभयरूपत्वं तथापि शुद्धेषु निवृत्तिलक्षणेषु यत्याश्रमधर्मेषु सत्सु वैकल्पिककाम्येषु नियोजनमयुक्तमेव । अतोहं येन निश्चित्य श्रेयआप्नुयाम् तदेकं वाक्यं वदेति ॥ २ ॥

अथवा, हें युद्ध तुझ्या शत्रूंचा संहाररूप असून, तुला प्रिय असल्यामुळें, तें तुला कर्मबंधमोचकही होईल, असें तुझें ह्मणणें असेल तर, मी विचारितों कीं, शमदम हे निर्मल यतीचे आश्रमाला उचित असे धर्म असून, केवळ रागादिकांनीं युक्त अशा युद्धाविषयीं माझ्या मनांत प्रेरणा उत्पन्न करून, एकदां कर्मयोग श्रेष्ठ ह्मणून सांगतोस; व एकदां ज्ञानयोग श्रेष्ठ असें सांगतोस; अशा मिश्र वाक्यानें माझ्या मतीला भ्रांति पडल्यासारखें करतोस तर ज्ञान आणि कर्म या दोहोंतून जो मला निश्चयानें अधिक श्रेयस्कर होईल तोच योग सांग कीं, ज्या योगानें मी कृतकृत्य होईन ॥ २ ॥

श्री भगवानुवाच ।

**लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयाऽनघ ।**
**ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥३॥**

बुद्धेर्ज्यायस्त्वेपि त्वमाधिकारिकत्वात् कर्मण्यधिकृतइति तत्र नियोजयामीत्याशयवान् भगवानुवाच । लोकइति । अस्मिन् लोके द्विविधा निष्ठा स्थितिः पुरा पूर्वं मया प्रोक्ता । कथम् सांख्यानां सम्यक् ख्यातिर्ज्ञानम् संख्या तत्र भवाः सांख्यास्तेषां ज्ञाननिष्ठानाम् सनकादीनां ज्ञानयोगेन जपध्यानादिना स्थितिः योगिनामुपायिनां ज्ञानित्वेप्याधिकारिकत्वादिश्वरेच्छया प्रियव्रतादिवल्लोकसंग्रहार्थत्वाच्च कर्मयोग्यांनां जनकादीनां कर्मयोगेनाश्रमत्रयविहितेन स्थितिः त्वं तु जनकादिवत् गृहस्थधर्मवानेव ज्ञानयोग्योनतु सनकादिवत्त्यागेनेत्यर्थः । आधिकारिकास्तु ज्ञानाधिकारमात्रं किंतु केचिदेव । तदुक्तम् । प्रजापाश्वतथादेवा महाधीकारिणःस्मृताः । ऋष्य शीतिस्तथासत्पपितरोप्सरसांशतम् । गंधर्वाणां तथा राज्ञां विंशदन्यासुजातिषु । अल्पाधिकारिणःप्रोक्ता अनधीकारिणःपरे इति । अथवा ज्ञानप्रचुरोयोगोज्ञानयोगः ।

कर्मप्रचुरोयोगः कर्मयोगः । निष्ठापर्यवसितिर्मुक्तिः ॥ तदुक्तम् ॥ सांख्याज्ञानप्रधानत्वात् देवाश्चऋषयस्तथा । मुख्यसांख्यास्तत्रदेवाज्ञानमेषांमहद्यतः । बहुकर्मकृतोप्यंतेततोपिबहु वेदनात् । मुख्यसांख्याइति ज्ञेयास्तदन्येकर्मयोगिनः । ज्ञानिनोप्यति बाहुल्यात्कर्मणः कर्मयोगिनः । नोभयंतद्विनाकश्चित् पुमान्हि पुरुषार्थभाक् । ज्ञानिनो मोक्षनियमस्तथापि शुभकर्मणा । आनंदवृद्धिरन्येन ऱ्हासो ज्ञानंतुकर्मणेति ॥ ३ ॥

कर्ममार्गापेक्षां ज्ञानमार्ग श्रेष्ठ असला तरी, तूं ज्ञानमार्गाविषयीं कर्मयोगानें शुद्धांतःकरण झाल्यावांचून, –( तूं अधिकारी झाला नाहींस ह्मणून )– मी तुला प्रथमतः युद्धरूप कर्ममार्गाचा उपदेश केला; अशा अर्थाचें श्रीकृष्ण अर्जुनास उत्तर देतातः–श्रीकृष्ण **भगवान** ह्मणतात, हे पापरहिता **अर्जुना,** या लोकीं दोन प्रकारचे उपाय ( निष्ठा-मोक्षप्राप्तीचे मार्ग ) पूर्वीं मी सांगितले आहेत; ते असे–कीं, सांख्यरूप ज्ञाननिष्ठ **सनकादिकांस** जपतपध्यानेंकरून ज्ञानयोगानें मुक्तिसाधनरूप एक उपाय आणि अधिकारी वर्गांतील **जनकादिक** गृहस्थांनीं आपल्या आश्रमाला उचित अशीं कर्में निष्काम बुद्धीनें करून ज्ञानद्वारां मुक्त व्हावें, हा मुक्तिसाधनकर्मयोगरूप दुसरा उपाय; या दोन उपायांपैकीं ज्ञानी वर्ग किंवा अधिकारी वर्ग यांनीं अनुक्रमें स्वीकारणें उचित आहे. त्यांपैकीं तूं अधिकारी वर्गांतील असल्यामुळें, तुजला गृहस्थाश्रमाला योग्य अशा कर्मांच्या योगानें शुद्धांतःकरण होऊन, ज्ञान संपादन करणें हें योग्य आहे. या करितां तूं ज्ञानसाधन युद्धरूप कर्माचाच आश्रय करावास ॥ ३ ॥

**न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।**
**न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ४ ॥**

किंच कुतः कर्म न कर्तव्यम् । कर्माकरणस्य मोक्षसाधनत्वादितिचेत् । तत्किम् मोक्षोनैष्कर्म्यशब्दवाच्यइत्येवमुच्यते उत कर्माकरणे कर्ममूलसंसारो न भवतीति । आद्यंदूष ति । न कर्मणामिति । कर्मणां युद्धादिनामनारंभा नैष्कर्म्यमोक्षं नाश्नुते । काम्यकर्मपरित्यागेन प्राप्यत इति नैष्कर्म्यशब्दवाच्यत्वमन्यथा युपपद्यतइतिभावः । कर्मा-

भावसाध्यत्वेननैष्कर्म्यशब्दवाच्यत्वं किं न स्यादित्याशंक्याह । पुरुष-इति । सर्वदा स्थूलेन सूक्ष्मेण वा पुरेण युक्तोजीवः यदि तस्य कर्मा-करणेन मुक्तिः स्यात्तदाऽनधिकारिणामपि स्यात्ततश्चतस्यानादौ संसारेऽनधिकृतदेहस्य संभवेन मुक्तिप्रसंगादधुनापि दृश्यमानस्यपुरुषत्वं न स्यादिति भावः । द्वितीयेप्येतदेवोत्तरम् । न कर्मणामिति । इदानी-मकरणेपि पुरुषतत्वेनानादौ संसारेधिकृतानंतजन्मसंभवात्तत्र कृतानाम-नंतकर्मणां भावादनंतत्वेन भोगेन क्षयाभावाच्च किमद्य अकरणमात्रेण भवतीतिभावः । उक्तंच । जीवंश्चतुर्दशादूर्ध्वं पुरुषोनियमेनतु । स्त्रीवा-प्यनूनदशकं देहंमानुषमार्जते । चतुर्दशोर्ध्वं जीवीनिसंसारश्चादिवर्जितः। अतोवित्वापरंदेवं मोक्षाशा कामहामुन इति । ननु निष्कामंज्ञानपूर्वंच निवृत्तमिति चोच्यते । निवृत्तंसेवमानस्तुब्रह्माभ्येतिसनातनमिति । निष्कामकर्मणामोक्षः स्मृतः । तत्र फलाभावएव उपपत्तिः । ज्ञानस्यश्रव-णादिजन्यत्वात् । अतोऽकरणेपि फलाभावस्य साम्यात्किं कर्मकरणायासेनेत्यत आह । नचेति । संन्यसनं काम्यकर्मत्यागः । काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासंकवयोविदुरितिवक्ष्यमाणत्वात् । ते नच निष्कामकर्म-करणमुपलक्ष्यते । संन्यसनान्निष्कामकर्मकरणात् सिद्धिम् । मोक्षं न समधिगच्छति । किंतु सत्वशुद्ध्यादिद्वारा ज्ञानमेव प्राप्नोति । अतो न तत्प्रतिबंदिग्रहणं युक्तमितिभावः । ननु यत्याश्रमोमोक्षसाधनत्वेन श्रुत्यादिप्रसिद्धः । तत्र चेयमेवोपपत्तिः । यतिधर्माणां फलाभावः । अतस्तत्साम्यादकरणेपि मोक्षोभविष्यतीत्याशंकानिरासार्थं चोक्तं । नचेति । संन्यसनादेवेति चित्तशुद्धिवैराग्यश्रवणादिजन्यज्ञानशून्यादा-श्रममात्रादित्यर्थः अनधिकारिणां प्रायत्यार्थोयत्याश्रमः । अन्येषां त्वधिकारावस्थायामपि प्रायत्यस्य सत्वाद्विशेषलाभाय विधीयते । तदुक्तम् । देवादीनामादिराज्ञां महोद्योगेपि नो मनः । विष्णोश्चलति तद्योगोप्यतीव हरितोषणमिति ॥ ४ ॥

कर्म काय ह्मणून करूं नये ? कर्म न केल्यानेंच मुक्ति मिळते असें तुझें ह्मणणें आहे ? अथवा कर्म न केल्यानें कर्ममूल जो संसार तो नाहींसा होतो ? या शंका अर्जुनाचे मनांत येण्याचा संभव असल्यामुळें श्रीकृष्ण

त्यांचें समाधान सांगतात:-श्रीकृष्ण ह्मणतात, हे अर्जुना, अधिकारी पुरुषांनीं कर्म न केल्यानें, नैष्कर्म्य शब्दवाच्य मोक्ष होतो असें नसून, काम्यरूप जें कर्म त्याच्या परित्यागानेंच त्याला मोक्षफळाची प्राप्ति होते. जर " नैष्कर्म्य " शब्दाचा अर्थ ' कर्म न केल्यानें मोक्ष मिळतो ' असा होईल तर, सर्वदा स्थूल-सूक्ष्म-देहसंबंधरूप अशा या दुर्निवार संसारांत पुरुष पडला नसता; आणि अनादि अशा संसारांत अनेक देह ( जन्म ) घेऊन, त्या अनेक देहांत केलेलीं निरनिराळीं अशीं अनेक प्रकारचीं कर्में असल्यानें, प्रस्तुतमात्र कर्म न केल्यानें हा ( पुरुष ) मुक्त होतो, असा अर्थ नाहीं. निष्काम कर्म केल्यानें ज्ञानयोगाची प्राप्ति होऊन, तो मोक्षसुख अनुभवितो. आणखी, केवळ निष्काम कर्म केल्यानेंच मोक्षप्राप्ति होते असें नसून, तीं कर्में केल्यानें ज्यांचें चित्त शुद्ध झालें आहे अशांस, यथार्थ ज्ञानप्राप्ति होऊन, त्या ( ज्ञाना ) चेयोगानें मोक्षप्राप्ति होते. अथवा चित्तशुद्धि, वैराग्य आणि श्रवणेंकरून ज्ञान झालें नसल्यानें केवळ सर्वत्यागरूप संन्यासाश्रमानेंच मोक्षप्राप्ति होते असेंही नाहीं. तर, चित्त शुद्ध झालें ह्मणजे, भगवत्स्वरूपाचें यथार्थ ज्ञान होऊन, निषिद्ध विषयेच्छारहित असणें, हाच ' संन्यास ' या शब्दाचा अर्थ होय. यावरून, कर्मच करूं नये असा माझा अभिप्राय नाहीं. ॥ ४ ॥

**न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।**
**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ५ ॥**

किंच । सर्वात्मनाकर्मणांत्यक्तुमशक्यत्वान्न कर्माकरणेन मुक्तिरित्याह । नहीति । जातु कस्यांचिदवस्थायां क्षणमात्रमपि कश्चिदपि ज्ञानी वाऽज्ञोवाऽकर्मकृत् कर्माण्यकुर्वाणो न तिष्ठति तत्रहेतुः कार्यतइति । सर्वोजनः प्रकृतिजैर्गुणैः सत्वादिभिः अवशोअस्वतंत्रः विष्णुवशोवा । अः इतिब्रह्मेति श्रुतिः । कर्मकार्यते । अत्रेश्वर जीवजडानाम् कर्तृत्वमनेकविधम् । तदुक्तम् । तस्मात्स्वतंत्रकर्तृत्वं विष्णोरेव नचान्यगम् । तदधीनस्वतंत्रत्वं स्वावरापेक्षयैवतु । जीवस्यविकृतिर्नाम कर्तृत्वं जडसंश्रयम् । पुमान्दोग्धा थगौर्दोग्ध्री स्तनो दोग्धेतिच क्रमात् इति ॥ ५ ॥

सर्वथा, अस्वतंत्र असे प्राणी, कर्म करण्याचें सोडून रहाण्यास असमर्थ

आहेत, याविषयीं सांगतात:—ज्ञानी किंवा अज्ञानी पुरुष कोणत्याही स्थितींत असले तरी, निमिषमात्रही, कांहीं तरी कर्म केल्याशिवाय राहूं शकणार नाहींत; कारण, अकारवाच्य ब्रह्म, त्या ब्रह्माचे अधीन होऊन, अस्वतंत्र असा हा प्राणी, प्रकृतिजन्य सत्वादिगुणाच्यायोगानें, आपल्या इच्छेप्रमाणें नियमित कर्म करीतच असतो. ईश्वर, जीव आणि जड या तिघांसही अनेकप्रकारचीं कर्तृत्वें आहेत. त्यांत ईश्वर हा कोणाच्याही अधीन नसून स्वतंत्र कर्ता होय; जीव हा परमात्म्याचे अधीन असल्यामुळें, त्या परमात्म्यानें दिलेल्या स्वातंत्र्यानें किंचित् कर्ता होय; आणि परमात्म्यानें ठरविलेलें विकाररूप हें जडाचें कर्तृत्व होय. यास उदाहरण:—पुरुष गाईचें दूध काढितो, तो स्वतंत्र कर्ता आणि त्या पुरुषानें खाणेंपिणें घालून जिचें पालन केलें आहे अशी ती गाय, त्या पुरुषाचे आधीन राहून त्याला दूध देते. ह्मणून तिचेठायीं पराधीन कर्तृत्व. तसेंच त्या गाईसीं संबंध पावलेला स्तन, आहारादिकांपासून विकार पावलेलें दूध देतो; तेथें विकारकर्तृत्व. यांत, अनन्याधीन स्वातंत्र्यकर्तृत्व, अन्याधीन कर्तृत्व, आणि विकाररूप कर्तृत्व हीं स्पष्ट दिसतात; याचप्रमाणें सर्व ठिकाणीं कर्तृत्व जाणावें. येथें फक्त त्यांचें दिग्दर्शनमात्र केलें आहे. ॥ ५ ॥

**कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।**
**इन्द्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥ ६ ॥**

ननु कर्मणाम् सर्वात्मनात्यक्तुमशक्यत्वेपि शक्यानां त्यागः कार्य इत्यतआह । कर्मेंद्रियाणीतिद्वाभ्याम् । कर्मेंद्रियाणि वागादीनि संयम्य निगृह्य यो मनसा इंद्रियार्थान् विषयान् स्मरन्नास्ते सविमूढात्मा भ्रांतचित्तः मिथ्याचारः कपटाचारः दांभिकइतिउच्यते ॥ ६ ॥

जरी, सर्वकर्मपरित्याग कोणाच्यानें होत नसला तरी, शक्य तितका कर्मपरित्याग करण्यास काय चिंता आहे? याविषयीं सांगतात:—जो पुरुष सर्वकर्मपरित्याग करण्यास उत्सुक होऊन, बलात्कारानें कर्मेंद्रियें स्वाधीन करून घेऊन, विषयांनीं विद्धचित्त होत्साता, त्या विषयांचें मनांत स्मरण करीत असतो, तो मूढ दांभिक ( ढोंगी ) आहे असें जाण. ॥ ६ ॥

**यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।**
**कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ ७ ॥**

यस्तु ज्ञानेंद्रियाणि मनसा नियम्य कर्मेंद्रियैः कर्मयोगं स्ववर्णाश्रमोचितं असक्तः फलेच्छारहितः आरभते करोति स अधिकोभवति। अनेन मनएव बंधमोक्षयोः प्रयोजकं न कर्मकरणाकरणे अतस्तन्निग्रह एव कार्यो न कर्मत्याग इत्युक्तं भवति ॥ ७ ॥

हे अर्जुना, जो पुरुष मनानें ज्ञानेंद्रियांचें नियमन करून, कर्मेंद्रियांनीं आपल्या वर्णाश्रमधर्माला उचित अशीं कर्में असंग होऊन-फलाची इच्छा सोडून करितो, तो क्रमाक्रमानें आपल्या योग्यतेप्रमाणें उच्च पदवीला पोंहोंचतो. त्या करितां मनुष्याचें मन हेंच भवबंधाला किंवा मोक्षाला मुख्य कारण असल्यामुळें, अधिकारी पुरुषानें प्रथमतः तेंच आपल्या अधीन करून घेणें भाग आहे. ॥ ७ ॥

नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः।
शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥ ८ ॥

ततः किमित्यत आह। नियतमिति। वर्णाश्रमोचितं कर्म कुरु हि यस्मादकर्मणः कर्माकरणात् कर्म ज्यायः प्रशस्ततरम्। किंच अकर्मणस्तव देहनिर्वाहोपि न भवेत् ॥ ८ ॥

याप्रमाणें सगळ्या विषयाचें विवेचन करून, त्याचें मुख्य तात्पर्य सांगतातः—वर्णाश्रमोचित स्नान—संध्या—अनुष्ठानादिक जें कर्म तें तूं कर; कारण, कर्माचा त्याग करण्यापेक्षां असंग बुद्धीनें कर्म करणें अत्यंत प्रशस्त होय; इतकेंच नव्हे तर, सर्व कर्मपरित्याग केल्यास तुझ्या देहाचा देखील निर्वाह चालणें अशक्य होय. ॥ ८ ॥

यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः।
तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः समाचर ॥ ९ ॥

ननु कर्मणा बद्ध्यते जंतुर्विद्ययाचविमुच्यते। तस्मात्कर्म न कुर्वंति यतयः पारदर्शिन इत्यादिवचनात्। कर्मणोबंधकत्वावगतेः कथं कुरुकर्मेति विधीयतइत्याशंक्यावैष्णवकर्मविषयं तद्वचनमित्याह। यज्ञार्थादिति। यज्ञोविष्णुः। यज्ञोविष्णुरितिश्रुतेः। अथवा विषयीकृतो-

ज्ञानरूपत्वात् ज्ञोभगवान् येनोद्देशेन स यज्ञः । ज्ञोनामा भगवान् विष्णुस्तंयात्युद्देश एष यः । स यज्ञ इतिसंप्रोक्तो विहिते कर्मणिस्थित इतिवचनात् तदर्थात्कर्मणोन्यत्रतदेकंविना अयंलोकः कर्मबंधनम् यस्यसः कर्मबंधनः अतस्तदर्थं यज्ञार्थं मुक्तसंगः कर्मसमाचर ॥ ९ ॥

प्राणी कर्में करून बद्ध होतो व ज्ञानानें मुक्त होतो, संसारपरपारदर्शी—नियमनशील असे यति, कर्म करीत नसून, विद्येंतच (ज्ञानांत) निरत झाल्यानें कर्म हें भवबंधास कारण आहे असें उघड दिसतें; तर मला कर्म करण्यास कां सांगतोस? अशी शंका अर्जुनाचे मनांत येईल, तिच्या निरसनार्थ अवैष्णव कर्में आहेत तीं मात्र बंधनकारक होतात, अशा अर्थानें श्रीकृष्ण सांगतातः—हे कुंतिपुत्रा धनंजया, यज्ञा (परमात्म्या) प्रीत्यर्थ जीं कर्में आहेत त्यांशिवाय इतर सर्व कर्में जीवाला बंधनकारक होतात, याकरितां तूं श्रीहरीस अर्पण करण्याचे हेतूनें फलाची इच्छा न करितां; वैष्णव धर्मोपयोगीं कर्म कर; ह्मणजे त्यापासून तुझें कांहींही अनिष्ट होणार नाहीं. ॥ ९ ॥

**सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।**
**अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥ १० ॥**

अत्रार्थवादमाह । सहेत्यादिभिश्चतुर्भिः सहयज्ञाः यज्ञसहिताः प्रजाः ब्राह्मणाद्याः पुरा सर्गादौ सृष्ट्वा प्रजापतिरुवाच । किमित्यनेन यज्ञेन प्रसविष्यध्वं । अभिवर्धयध्वं । एष यज्ञोवो युष्माकमिष्टकामधुक्-मोक्षप्रदोस्तु ॥ १० ॥

याविषयीं पूर्वी ब्रह्मदेव जें बोलला आहे तें सांगतों. यज्ञ ह्मणजे भगवत्प्रीत्यर्थ जें करावयाचें तें कर्म, त्या साधनासह वर्तमानब्राह्मणादिवर्णांची परमात्म्याचे प्रेरणेनें ब्रह्मदेवानें सृष्टि करून, त्या काळीं ब्राह्मणक्षत्रियादिवर्णांला तो (ब्रह्मदेव) ह्मणाला, तुह्मीं या यज्ञकर्माचे योगानें अभिवृद्ध व्हा. तो यज्ञांत राहणारा परशुराममूर्ति श्रीनारायण तुह्मांस मोक्ष देणारा होवो. ॥ १० ॥

**देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु वः ।**
**परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥**

कथम् अनेन यज्ञेन यूयं देवान् भावयत हविर्भिर्वर्धयत ते देवाः वः युष्मान् भावयंतु वर्धयंतु । एवमन्योन्यं वर्धयंतो देवाश्च यूयं परं श्रेयोमोक्षाख्यमवाप्स्यथ ॥ ११ ॥

या यज्ञरूप कर्मानें तुह्मीं सुरगणपरिवारासह श्रीहरीला हविर्भाग देऊन तृप्त करा! ह्मणजे ते देव, ( यथाकाळीं ) वृष्ट्यादिकेंकरून तुमचें पाळन करितील. याप्रमाणें परस्पर संतुष्ट-चित्त होऊन, श्रीहरीच्या कृपेनें तुह्मीं परमसुखदायक मुक्तिलाभ मिळवाल. ॥ ११ ॥

**इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविताः ।**
**तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन एव सः ॥ १२ ॥**

यज्ञैर्भावितादेवा इष्टान् भोगान् मोक्षसंबंधिनो दास्यंति अतो-देवैर्दत्तान्नादीन् तेभ्यो यज्ञादिभिरदत्वा योभुंक्ते स चोरएव ॥ १२ ॥

तुह्मीं परमेश्वरप्रीत्यर्थ केलेल्या कर्मांनीं, त्याचा परिवार जो देवगण त्यांनां संतोष होऊन, ते देव तुह्मांस मुक्तिसंबंधीं उपभोग प्राप्त होण्यास सहायकर्तें होतील. अर्थात्, देवांनीं पाऊस वगैरे पाडल्यानें, उत्पन्न झालेल्या ( ह्मणून देवांनींच दिलेल्या ) अन्नादि वस्तु, त्यांनीं पंचमहायज्ञादि कर्में करून जो देवांला संतुष्ट करीत नाहीं, आपणच त्या वस्तूंचा उपभोग घेतो तो केवळ चोर समजावा. ॥ १२ ॥

**यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः ।**
**भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात् ॥१३॥**

यज्ञशिष्टाशिनः विष्णूच्छिष्टभोजिनः संसारबीजैः किल्बिषैर्मुच्यंते । ये त्वात्मभोजनार्थमेव पचंति न विष्णुपूजार्थं ते पापादुराचाराः अघनिमित्तमेव भुंजंतइति । तच्चोक्तम् । कर्मणा निरपेक्षेण विष्णवे चार्पितेन च । सम्यग्ज्ञानं भवेत्पुंसां देवतातृप्तिपूर्वकम् । निर्देशाद्भगवत्येव तृप्ताः स्युर्देवता यतः । तदंगत्वेन निर्देशात्स्वेषु ते तृप्तिमाप्नुयुः । तेषु तृप्तेषु देवेशे विष्णौचोत्पद्यते परम् । ज्ञानं तेनैव सम्यक्च मुच्यते कर्मपीडनादिति ॥ १३ ॥

जे पुरुष यज्ञांतर्यामी जो परमात्मा, तत्प्रीत्यर्थ पंचमहायज्ञादि देवप्रीय कर्में करून, राहिलेलें उच्छिष्ट भोजन करितात, ते, अपार अशा संसाराला कारण झालेलीं जीं पापें त्यांपासून मुक्त होतात. जे कोणी, देवाला संतोष देणारें असें यज्ञकर्म करीत नसून, केवळ पोटासाठींच अन्न शिजवितात, ते केवळ पापी होऊन पापाला साधन असें तें अन्न खातात. तात्पर्य एवढेंच कीं, निरपेक्षबुद्धीनें कर्म करून यज्ञमूर्ति असा जो परमात्मा, तत्प्रीत्यर्थ त्याचे अनुयायी जे देवगण त्यांस हविर्भाग दिला असतां, दात्यांस यथार्थज्ञान उत्पन्न होतें. परमात्म्यांचें नांव घेऊन त्यास सत्कर्म अर्पण केल्यानें, तो ( परमात्मा ) नित्य तृप्त असा आहे तरी, आपल्या भक्तांचें अभिष्टसिध्यर्थ, विशेष तृप्ति दाखवितो; त्यामुळें सर्व देवतागण तृप्त होऊन, कर्मकर्त्या अधिकाऱ्यास यथार्थज्ञान उत्पन्न व्हावें ह्मणून अनुकूल होतात. सुरनरतिर्यगादि जगदुत्पादक श्रीहरीच्या संतोषानें सर्व त्रैलोक्यही संतोषभरांत निमग्न होतें असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ॥ १३ ॥

**अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसम्भवः ।**
**यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥**

कर्मकर्तव्यमित्यत्र हेत्वंतरमाह । अन्नादितित्रिभिः । अन्नाद्भूतान्युत्पद्यंते अन्नंच पर्जन्यादुद्भवति यज्ञात्पर्जन्याभिमन्यमानवृष्टिजनकमेघचक्रस्योत्पन्नत्वात्तत्कारणमुच्यते मेघचक्राभिमानी च पर्जन्यः तच्च यज्ञाद्भवति अग्नौप्रास्ताहुतिः सम्यगादित्यमुपतिष्ठति। आदित्याज्जायतेवृष्टिर्वृष्टेरन्नं ततः प्रजाइतिस्मृतेश्च उभयवचनादादित्यात्समुद्राच्चवृष्ट्यंगीकारादविरोधः । अतश्च यज्ञात्पर्जन्योद्भवः संभवति । यज्ञोदेवतामुद्दिश्यद्रव्यत्यागः । उद्दिश्यदेवतांद्रव्यत्यागोयज्ञइतीरितइतिवचनात् । कर्मेतरक्रिया ॥ १४ ॥

आतां कर्म करणें अवश्य आहे, अशाविषयीं अन्य कारणें सांगतात:—अन्नापासून प्राण्यांची उत्पत्ति होते, तें अन्न पर्जन्य पडल्यानें उत्पन्न होतें, पर्जन्य हा, देवगणांच्या संतोषार्थ केलेल्या यज्ञापासून उत्पन्न होतो, आणि यज्ञ, कर्म केल्यानें होतो. ॥ १४ ॥

**कर्म ब्रम्होद्भवं विद्धि ब्रम्हाक्षरसमुद्भवम् ।**
**तस्मात्सर्वगतं ब्रम्ह नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥**

कर्म ब्रह्मणो जायते एषह्येवसाधुकर्मकारयतिइत्यादेः। तच्च ब्रह्माक्षराख्यवेदाभिव्यंग्यं । यतएवं परंपरया यज्ञाभिव्यंग्यंब्रह्म तस्मान्नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् । तानि चाक्षराणि भूताव्यंग्यानीति चक्रम् ॥ १५ ॥

तें कर्म ब्रह्मशब्दवाच्या नारायणाच्या प्रेरणेनें उत्पन्न होतें. तें ब्रह्म वेदाक्षरसमुदायानें अभिव्यक्त होतें. तें ब्रह्म सर्वव्याप्त असल्यानें, यज्ञरूप परंपरेनें अभिव्यक्त होतें. यावरून तें ब्रह्म यज्ञांत निरंतर प्रतिष्ठित असतें. ॥ १५ ॥

**एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ।**
**अघायुरिन्द्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥**

तदेवं जगच्चक्रं योनानुवर्तयति सतद्विनाशकत्वादघायुः । पापनिमित्तमेवायुर्यस्य सोघायुः । इंद्रियाभिमानेन विषयेषु रतिमान् मोघं व्यर्थमेव जीवति ॥ १६ ॥

हे पार्था, याप्रमाणें चालू असलेलें जें चक्र ( जगाचें रहाटगाडगें ) त्याला जो पुरुष अनुसरत नाहीं, तो पापांत आयुष्य घालविणारा, इंद्रियसुखाचेठायीं अनुरक्त ( विषयलोलुप ), ह्मणून त्याचें जिवंत राहणें व्यर्थ आहे असें समज ॥ १६ ॥

**यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ।**
**आत्मन्येव च सन्तुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥१७॥**

यद्येवं कर्माकरणे हानिस्तत्करणेलाभस्तर्हि परमेश्वरेतीव मनः समाधानमसंप्रज्ञातसमाधिलक्षणम् न कार्यंस्यात् । तत्र कर्मलोपस्यावश्यंभावादित्यत आह यस्त्विति । यस्तु आत्मरतिः आत्मनस्तद्दर्शनेन रतिर्यस्यस आत्मरतिः अत्र सर्वत्रात्मशब्दः परमात्मवाची । एवशब्देनान्यत्ररतिर्निरस्यते । साचान्यत्राररतिः सर्वात्मनेत्याह । आत्मतृप्त इति । आत्मनातृप्तोन्यत्रसर्वात्मनालंबुद्धिमान् । नकेवलमात्मरत्याख्येन सुखेन किंतु प्रसन्नेन परमात्मनैवेति दर्शयितुं आत्मग्रहणं केनालंबुद्धि-

रित्याशंक्य पूर्वोक्तेनात्मरत्याख्येन सुखेनेत्याह । संतुष्टइति । संतोषाख्यात्मरतिः केनास्यजाता तादृशीत्यपेक्षायामसंप्रज्ञात समाधिलक्षणया परमात्मस्थित्येत्याह । आत्मन्येवेति । तत्स्थएवसन् संतुष्ट इत्यर्थः । नान्यत्किमपि संतोषकारणमित्यवधारणम् । ज्ञानिन एवासंप्रज्ञातसमाधिर्भवतीतिदर्शयितुं मानवइत्युक्तम् । मनु अवबोधन इति स्मरणात् । तस्यासंप्रज्ञातसमाधिस्थस्यैव कार्यं न विद्यत एव । उक्तंच । स्थितप्रज्ञस्यापिकार्योदेहादिर्दृश्यतेयदा । स्वधर्मोममतुष्ट्यर्थः । साहि सर्वैरपेक्षितेति ॥ १७ ॥

याप्रमाणें, कर्म न केल्यास स्वार्थहानि व कर्म केल्यानें परमार्थ लाभ होतो, तर परमेश्वराचे ठिकाणीं मनःसमाधानरूप असंप्रज्ञात समाधि ( बाह्य दर्शन न होतां ध्यानरत होणें ) करूं नये असें होईल, कारण, केवळ भगवन्निष्ठ झाला असतां, त्या वेळीं कर्मलोप होण्याचा संभव आहे. अशी शंका येईल तर तिचें, **श्रीकृष्ण** समाधान सांगतातः—जो ज्ञाननिष्ठ पुरुष, परमात्म्याच्या दर्शनानेंच त्या परमात्म्याचे ठायीं रममाण होऊन तृप्त होतो, किंवा, त्या परमात्म्याशिवाय अन्य विषयांची अपेक्षा न करितां असंप्रज्ञात समाधीच्या योगानें परमात्म्याचे ठायींच संतुष्ट असतो, अशा पुरुषानें मात्र संध्यावंदनादि अन्य कर्में न केलीं तरी चालतील. यावरून येथें ‘ आत्म ’ शब्द हा परमात्म्याचा वाचक होय; कारण, मुख्यत्वेंकरून जीवाला ‘ आत्म ’ शब्दवाच्य व्याप्ति नाहीं; आणि एकाग्रचित्तानें परमात्म्याचेठायींच रति, व तृप्ति ( संतोष ) हें, असंप्रज्ञातसमाधियुक्त ज्ञान्याचें लक्षण आहे; याकरितां, येथें ‘ आत्म ’ शब्दाचा ‘ जीव ’ असा अर्थ घेतला तर पूर्वापर विरोध येतो. आणखी, ‘ आत्मा ’ ह्मणजे ‘ जीव ’ त्याचेठायीं ‘ रति ’ असा अर्थ होतो, असें ह्मटल्यास अन्य साधनांवांचून कोणतेंही सौख्य प्राप्त होणार नाहीं. सौख्य तर दिसतें, याकरितां, असंप्रज्ञात ज्ञानीजीवांच्या संतोषासाठीं नित्यसुखात्मक परमात्मरति किंवा दर्शन यावांचून, अन्य संतोषसाधनच नाहीं; याकरितां येथें ‘ आत्म ’ शब्दाचा ‘ जीव ’ असा अर्थ घेणें योग्य नाहीं. ॥ १७ ॥

**नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ।**
**न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥ १८ ॥**

नन्वसंप्रज्ञातसमाधिस्थस्यापि कथं कार्याभावः । कर्मकृतिकाले त्वयाहमुद्बोधनीयइति कं चित्प्रयुक्त्वा समाहितस्तेन योगशास्त्रोदितोपायैरुद्बोधितः कर्मकरिष्यतीत्यत आह । नैवेति । तस्यासंप्रज्ञातसमाधिस्थस्य समाधिंविहाय कृतेन कर्मणाऽत्मरत्याधिकस्तत्समोवार्थोनास्ति । मामूद्यज्ञादिकरणार्थमुत्थानम् । नित्यनैमित्तिकाकरणेप्रत्यवायप्राप्तेस्तदर्थंतु स्यादित्यत आह । नाकृतेनेति । अकृतेन संध्यावंदनाद्यकरणेन प्रत्यवायोनास्ति । तथापि गुरुदेवतापूजाकरणाकरणयोरर्थप्रत्यवायौस्यातामेव । अतस्तत्संनिधिप्राप्तावुत्थानमावश्यकमेवेत्यत आह । नचेति । अस्यसंप्रज्ञातसमाधेरुत्थितस्य सर्वभूतेषु गुर्वादिषु अर्थस्य व्यपाश्रयः प्राप्तिः पूजादिर्येन गुर्वादिदर्शनादिव्यापारेण भवति सव्यापारश्च कश्चिन्नास्ति गुर्वादिपूजायाः करणमात्मरतितुल्यफलहेतुर्नभवतीत्यर्थः । एवमकरणमप्यनर्थहेतुर्नभवतीतिद्रष्टव्य । अथवा कर्मकर्तव्यमित्यत्रयुक्त्यंतरमाह । यस्त्विति । तृप्तिसंतोषशब्दयोः पर्यायत्वेपि परमात्मनातृप्तः । परमात्मनि तृप्तइति विशेषः । यद्वा रतिरानंदउद्दिष्टस्तृप्तिस्तुकृतकृत्यता । प्रीतिस्तुविविधस्नेहः कर्मजोनिजएवचेत्यभिधानादर्थभेदः । प्रीतिः संतोषः । तथाचैवंलक्षणकस्य मुक्तस्य कार्यं न विद्यतइत्यर्थः । तदुक्तम् । विष्णुप्रसादाद्रतिमांस्तृप्तोविष्णुप्रसादतः । विष्णावेवातितृप्तश्च मुक्तोसौविध्यगोचरइति । ननु कृष्णोमुक्तैरीज्यतेवीतमोहैरित्यादिलिंगात्मुक्तस्यापि कर्मकर्तव्यमेवेत्यत आह । नैवेति । स्वेच्छयैव करणं न फलापेक्षया विधिबद्धत्वेन वेतिभावः ॥ १८ ॥

असंप्रज्ञातसमाधिस्थानें कर्म न करण्याविषयीं विशेष कारणें नाहींत ? संध्यावंदनादिकांचा काळ प्राप्त झाला असतां, आपणास उद्बोधन ( तो काळ प्राप्त झाला त्याविषयीं जागृत करणें ) करावें, असें दुसऱ्या कोणा मनुष्यास सांगून, आपण समाधि लावावी. योग्य काळीं, त्या दुसऱ्या मनुष्यानें, योगशास्त्रांत सांगितलेल्या उपायानें समाधिस्थास समाधि उतरावयास लावून, ती उतरल्यावर त्या समाधी लावणारानें संध्यादि कर्में कां करूं नयेत ? याविषयीं श्रीकृष्ण भगवान् सांगतातः—त्या असंप्रज्ञातसमाधिस्थ ज्ञान्यास, समाधीचा त्याग करून, ( संध्यादि ) कर्म केल्यानें पूर्वीपेक्षां जास्त फळ मिळतें

असें नाहीं; किंवा कर्म न केल्यामुळें त्या ज्ञान्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं व गुरु वगैरे आपल्यापेक्षां श्रेष्ठ, व ऋषि, इत्यादि आले असतां त्यांस उत्थापन देऊन त्यांचें पूजन वगैरे करणें हें अवश्य आहे; तथापि, असंप्रज्ञातसमाधिस्थ अपरोक्षज्ञान्यानें असें आचरण न केल्यास कांहीं दोष नाहीं. ॥ १८ ॥

**तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर।**
**असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ १९ ॥**

ततः किमित्यपेक्षायां यस्मादसंप्रज्ञातसमाधिस्थस्य मुक्तस्य वा कार्यं नास्ति तस्मादतादृशत्वात् ज्ञान्यपि त्वं कार्यं वर्णाश्रमोचितं कर्मसमाचरेत्याह । तस्मादिति । ननु जिज्ञासोर्ज्ञानिनश्च कर्मणाप्रयोजनाभावात् कार्याभावः किंनस्यादित्यत आह । असक्तइति । जिज्ञासुरसक्तः कर्माचरन्नेव ज्ञानद्वारा परंब्रह्मप्राप्नोति ज्ञानीतु कर्माचरन् परमातिशयितमानंदं प्राप्नोति । अतोमुक्तासंप्रज्ञातसमाधिस्थ व्यतिरिक्तस्य कर्मणा फलसद्भावादस्त्येव कार्यमितिभावः ॥ १९ ॥

याकरितां असंप्रज्ञातसमाधिस्थांस किंवा मुक्तांस कर्म करावें लागत नाहीं. परंतु, तूं तसा नसल्यानें, फलाची इच्छा न कारितां वर्णाश्रमोचित अशीं संध्यावंदनादि कर्में तूं कर; मी जिज्ञासु असल्यानें मला कर्म करण्याची जरूर नाहीं असें समजूं नकोस; कारण जिज्ञासु असला तरी, तो फलाची इच्छा न धरितां वर्णाश्रमोचित कर्में करून, ज्ञानी होऊन, मोक्षास जातो; ह्मणून तुला कर्म करणें अवश्य आहे. ज्ञानी झाला तरी फलेच्छारहित कर्में करून मुक्तींत आनंदाभिवृद्धीतें पावतो; यावरून मुक्त व असंप्रज्ञातसमाधिस्थ यांशिवाय इतरांस निस्संग कर्म केल्यानें अधिक फलप्राप्ति होते, याकरितां सर्वांनीं कर्म अवश्य करावें. ॥ १९ ॥

**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः।**
**लोकसंग्रहमेवापि सम्पश्यन्कर्तुमर्हसि ॥ २० ॥**

ननु ज्ञानादेव मोक्षसिद्धेः कथमसक्तः आचरन्नेव परमाप्नोतीत्युक्तमित्याशंक्याफलार्थत्वेन विहितस्य कर्मणः कर्तव्यतायामाचारः

प्रमाणमस्तीत्याह । कर्मणैवेति । कर्मणासह कर्मकुर्वतएव सिद्धिं मोक्षमास्थिताः । सहैव कर्मणा सिद्धिमास्थिताजनकादयः । ज्ञाननिष्ठा अपि ततः कुर्युर्वर्णाश्रमोचितमितिवचनात् । यद्वा कर्मणा करणेन परंपरया सिद्धिम् मोक्षम् ज्ञानम् वास्थिताइत्यर्थः । अथवा तमेवं विद्वानित्यादिनिरवकाशश्रुत्यादिविरोधात् । श्रुत्यादेर्ज्ञानाभावे मोक्षाभावइत्येवंपरत्वात् ज्ञानप्राधान्यपरत्वाच्चसंसारनिवृत्तिसुखवृद्धिलक्षणे मोक्षे साहित्यमुपपाद्यते । एतदपेक्षयैव ज्ञानकर्मसमुच्चयवादाः । इतोपि कर्मकर्तव्यमित्याह । लोकसंग्रहमिति । नकेवलमानंदातिशयः किंतु लोकसंग्रहणमपि प्रयोजनम् संपश्यन् कर्म कर्तुमर्हसि । लोकसंग्रहोऽज्ञजनस्य कर्मणि प्रवर्तनम् । तस्यभगवत्प्रीतिः प्रयोजनम् । तदुक्तम् । अज्ञानां ज्ञानदं कर्म ज्ञानिनां लोकसंग्रहात् । अद्धैव तुष्टिदं मह्यं सामुक्तानंदपूर्तिदेति ॥ २० ॥

जर ज्ञानानेंच मोक्ष मिळतो तर, फळाची इच्छा न करितां कर्म करण्याचें प्रयोजन काय? या शंकेचें समाधान व्हावें ह्मणून, विहित कर्म करण्याचा सांप्रदायच यास प्रमाण आहे अशा अर्थानें श्रीकृष्ण सांगतातः— पूर्वीं जनकादिक राजे ज्ञाननिष्ठ असूनही, फलेच्छारहित कर्म करूनच मोक्षास गेले; जरी ज्ञानानेंच मोक्ष मिळतो असें श्रुतिसिद्ध आहे तरी, फलेच्छारहित अशीं सत्कर्में केल्यानें, मुक्तीमध्यें आनंदाभिवृद्धि होते. एवढेंच नव्हे तूं कर्म केलेलें पाहून, इतर लोकही सत्कर्में करून कृतकृत्य होतील अशा लोकसंग्रहास्तव तरी तूं कर्म करावेंस हें योग्य आहे. ॥ २० ॥

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ २१ ॥**

कथं कर्मकरणेन लोकसंग्रहइत्यतआह । यद्यदिति । श्रेष्ठोयद्यदाचरति इतरः प्राकृतजनोपि तत्तदेवाचरति । सश्रेष्ठोयद्वाक्यादिकं प्रमाणं कुरुते ज्ञापयति । यद्वा यत्प्रमाणकं लौकिकं वैदिकं वा कर्म कुरुते लोकोपि तदेवानुसरति ॥ २१ ॥

आपण कर्म केल्यानें जनसंग्रह कसा होतो, याविषयीं सांगतातः—

हे **अर्जुना**, लोकमान्य असा कोणी पुरुष जसें आचरण करितो, तसेंच इतर ( सामान्य ) लोकही करितात. इतकेंच नव्हे, तर तो श्रेष्ठ पुरुष जें लौकिक अथवा वैदिक वाक्य प्रमाण मानितो, तें वाक्य सर्व लोकही प्रमाणच मानितात. २१

**न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किञ्चन ।**
**नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥ २२ ॥**

**किंच प्रयोजनमात्ररहितेनापि मया केवलानुग्रहस्वभावेन लोकसंग्रहार्थम् कर्म क्रियते । मोक्षे आनंदवृद्धिप्रयोजनवता ज्ञानिना तत्कर्म कर्तव्यमिति किमु वक्तव्यमित्याशयेनाह । नमइति त्रिभिः । हे पार्थ मे कर्तव्यं नास्ति यतः त्रिष्वपि लोकेषु प्रागप्राप्तं पश्चात्प्राप्तव्यं किमपि नास्ति तथापि कर्मणि वर्त्तएव कर्मकरोम्येव ॥ २२ ॥**

कोणतेंही कर्म करण्याचें मला कारण राहिलें नाहीं तरीही मी लोकसंग्रहाकरितां कर्में करितों; मग, ज्ञान्यानें कर्म केलें असतां त्यास मोक्षांत आनंदाभिवृद्धि आणि लोकसंग्रह हीं दोन्ही फळें मिळतात; असें असतां त्यानें सत्कर्माचरण कां करूं नये ? अशा अर्थाचें **श्रीकृष्ण** भाषण करितातः—हे **अर्जुना**, मला या त्रैलोक्यांत कर्तव्यकर्म असें कोणतेंच राहिलें नाहीं. किंवा मला पूर्वीं अप्राप्त व पुढें प्राप्त होणारी अशी कोणतीच वस्तु राहिली नाहीं; तथापि, लोकसंग्रहाकरितां मी कर्मरत झालों आहें. ॥ २२ ॥

**यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतन्द्रितः ।**
**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ २३ ॥**

**यदिह्यहं जातु कदाचित् अतंद्रितोऽनलसः कर्मणि न वर्तेयं । कर्म न कुर्यां तर्हि ममैव वर्त्म मार्गं मनुष्याअनुवर्तंते अनुसरेयुः ॥२३॥**

हे **पार्था**, निरालस्य होऊन, मी एखादें कर्म करण्याचा त्याग करीन तर माझ्यासारखेच सर्व लोक, सगळीं कर्में सोडून देऊन स्वहितास मुकतील. ॥ २३ ॥

**उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।**
**संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः । २४ ।**

ततश्च लोकाउत्सीदेयुः कर्मलोपेन भ्रंशयेयुः ततश्च यो वर्णसंकरो- भवेत् तस्याप्यहमेव कर्तास्यां भवेयं । एव महमेवप्रजाः उपहन्यां उपहतवान्स्यां । अतोमया कर्म क्रियते । तथा लोकसंग्रहार्थं भवद्धि- र्धैरपि कर्म कर्तव्यमेव । उक्तंच । ममैव केवलंनास्ति केनाप्यर्थस्तथा- प्यहं । कर्मकृल्लोकरक्षायै तस्मात्कुर्वीतमत्पर इति ॥ २४ ॥

जर मी कर्म न करीन तर माझ्याप्रमाणेंच सर्व लोकही कर्म करण्याचें सोडून विनाकारण नाश पावतील; व त्यामुळें वर्णसंकर होण्याचा संभव असून तो मीच केल्याप्रमाणें होऊन, सर्व प्रजाही मीच नष्ट केली असें होईल. ॥ २४ ॥

सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत ।
कुर्याद्विद्वांस्तथाऽसक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥ २५ ॥

नन्वज्ञेनेव ज्ञानिनापि कर्म कार्यंचेद्विद्वदविद्वत्कर्मणोः कोविशेष इत्यत आह । सक्ताइति । असक्तः फलाकांक्षारहितः । सक्त्यसक्ति- पूर्वकत्वेनविशेषइत्यर्थः ॥ २५ ॥

अज्ञान्याप्रमाणें ज्ञान्यानेंही कर्म करावें यांत ज्ञान्यांस विशेष काय आहे? याविषयीं सांगतात:—हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, ज्याप्रमाणें अविद्वान् लोक, फलाची इच्छा करून, कर्मांत आसक्त होऊन कर्म करितात, त्याप्रमाणेंच फलाची इच्छा न करितां केवळ लोकसंग्रहाकरितां विद्वान् ( ज्ञानी ) कर्म करितात, ह्मणजे अपरोक्ष ज्ञानी आहेत ते केवळ लोकसंग्रहाकरितांच कर्म करितात; व ज्ञानीही फलाची इच्छा न करितां कर्म करितात आणि अज्ञानी फळप्राप्ती व्हावी ह्मणून कर्म करितात. यावरून अपरोक्षज्ञानी, ज्ञानी व अज्ञानी यांच्या कर्मांत परस्पर मोठें अंतर आहे असें उघड झालें. ॥ २५ ॥

न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसङ्गिनाम् ।
जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥ २६ ॥

अयोग्यानां कर्मणि संगं जनयितुमपि कर्म कर्तव्यमित्याह । न बुद्धिभेदमिति । अज्ञानां भगवत्स्वरूपमजानतां कर्मसु सक्तानां

बुद्धेर्भेदं विपर्यासं न जनयेत् । कर्मणःसकाशात् बुद्धिचालनं न कुर्यात् । विद्वान् कर्माण्यकुर्वन् ज्ञानमात्रनिष्ठश्चेद् योग्यानामपि ज्ञान-मार्गाश्रयप्रसंगात्तेषां ज्ञानमार्गप्रवर्तकोपि स्वयमेव स्यात् । तच्चनिषि-द्धम् । अतोविद्वान्सावधानोभूत्वा स्वयमाचरन् कर्माणि सेवयेदज्ञैः कर्माणि कारयेदित्यर्थः ॥ २६ ॥

ज्ञानप्राप्तीस अयोग्य अशा लोकांस कर्माची आसक्ती उत्पन्न व्हावी ह्मणून, कर्म अवश्य करावें अशाविषयी सांगतात:—भगवंताचें स्वरूप न जाणणारे व काम्यकर्मांत ज्यांची आसक्ती आहे, अशा अज्ञ लोकांचे मनांत अविश्वास उत्पन्न होईल, असें करूं नये. ज्ञानी मनुष्य कर्मांचा त्याग करून ज्ञाननिष्ठ होतो असें समजलें ह्मणजे ज्ञानप्राप्तीस अयोग्य असे लोकही ज्ञान-मार्गाचेंच अवलंबन करतील. मग अयोग्य जनांस निषिद्ध असा ज्ञानमार्ग त्यांनां ज्ञान्यानेंच स्वतः सांगितला असें होईल. याकरितां विद्वानानें फलेच्छा-रहित होऊन आपण कर्में करावीं व अज्ञानीं लोकांकडून तीं करवावीं. ॥२६॥

**प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।**
**अहंकारविमूढात्मा कर्ताऽहमिति मन्यते ॥ २७ ॥**

श्लोकद्वयार्थं श्लोक त्रयेण प्रपंचयति । प्रकृतेरित्यादिना । क्वचित्स्वभावः प्रकृतिः क्वचिच्चात्रिगुणात्मिका । क्वचित्प्रकृष्टकर्तृत्वाद्भग-वान् प्रकृतिर्हरिरित्यभिधानात् । अत्र त्रितयमपिगृह्यते । प्रकृतेर्गुणै-र्विष्णोरिच्छादिभिः स्वतंत्रैः जीवस्वभावस्योत्तममध्यमाधम स्यानु गुणैः सम्यक् मिथ्याज्ञानादिभिर्निमित्तैः सत्वादिभिरुपादानैः तथा प्रकृतेः संबंधिभिस्तद्विकारैः तदुपसर्जनैर्वा देहेंद्रियादिभिः क्रियमाणानि सर्वाणि कर्माणि अहंकर्ता स्वातंत्र्येण कर्तुंशीलंममास्तीत्यहंकारविमूढ-बुद्धिर्मन्यते ॥ २७ ॥

वरील दोन श्लोकांचें जास्त विवेचन पुढील तीन श्लोकांनीं करितात:—हे अर्जुना, मनुष्य हा ' अहंकर्ता ' (मीच करणारा) अशा कर्तृत्वाभिमानानें विशेषेंकरून मूढबुद्धि होऊन, प्रकृष्टकारण अशा परमात्म्याचे इच्छादि गुणांनीं अथवा जडप्रकृतीपासून उत्पन्न झालेलें जें शरीर व इंद्रियांचे गुण त्यांनीं,

अथवा, उत्तम, मध्यम, आणि अधम ( कनिष्ठ ) यांस कारणीभूत ज्ञानस्वभाव गुणामुळें, किंवा, जडप्रकृतीचे जे सत्व, रज आणि तम हे गुण त्यांनीं प्रेरित होऊन, सर्व कर्में मीच करितों, असें अहंकारामुळें समजतो. ॥ २७ ॥

तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः ।
गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते ॥ २८ ॥

प्रकृतेर्गुणानां विभागस्योक्तलक्षणस्य कर्मणांविभागस्य च पराधीनकर्तृत्वादिरूपस्य च तत्वं जानंस्तु गुणाविष्णोरिच्छादयः गुणेषु स्वाभाविकेषु जीवस्य कामादिषु प्रेरकत्वेन वर्तंते तदनुसारेण च गुणाः इंद्रियादीनि गुणेषु विषयेषु वर्तंते । ईश्वरएव स्वेच्छादिभिर्जीवगुणान्निमित्तीकृत्य त्रिगुणविकारात्मकं कर्म इंद्रियादीनां विषयैः संसर्गं च करोति मम स्वातंत्र्यं क्वापि नास्तीति मन्वानो न सज्जते २८

परंतु हे भुजशाली अर्जुना, शरीरेंद्रियादिगुण जड प्रकृतीपासून उत्पन्न होतात. आणि ते सर्वदा परमात्म्याचे स्वाधीन असून, तो परमात्मा स्वतंत्रपणानें अखिल ब्रह्मांडांचा उत्पन्नकर्ता आहे. त्याचे स्वाधीन सर्व कर्म—कर्तृत्व—शक्ति आहे. असें जो जाणतो तो तत्वज्ञानि होय. परमात्म्याचे इच्छादि गुण जीवांच्या इच्छादिगुणांचेठायीं प्रेरक असतात. त्या परमात्म्याच्याच प्रेरणेनें इंद्रियें कर्म करण्यास प्रवृत्त होतात. भगवान् **नारायणच** आपल्या इच्छादि गुणांनीं, जीवगुणांस निमित्त करून विकारात्मक कर्म करवितो. तसेंच तो इंद्रियांचा विषयांळा संसर्ग करवितो. यावरून आपण स्वतंत्र आहों असें आपणांस ह्मणतां यावयाचें नाहीं. याप्रमाणें सर्व कांहीं परमात्म्याचे स्वाधीन आहे, असें समजणारा, कर्माविषयीं, मी कर्ता असा अभिमान धरित नाहीं. ॥ २८ ॥

प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जन्ते गुणकर्मसु ।
तानकृत्स्नविदो मन्दान्कृत्स्नविन्न विचालयेत् ॥२९॥

प्रकृतेर्गुणैः संमूढाः तथा प्रकृतेर्गुणेष्विंद्रियादिषु च संमूढा अभिमानिनः ततएव गुणकर्मसु विषयेषु कर्मसु च सज्जंते । तान्अकृ-

त्स्नविदः प्रकृतेर्गुणविभागज्ञानशून्यान् मंदान् ज्ञानेऽयोग्यान् स्वयं कृत्स्नं समस्तंविद्वान्न विचालयेत् । कर्मसुसंगं त्याजयित्वा सन्मार्गे न प्रवर्तयेदिति । शब्दाद्या इंद्रियाद्याश्चसत्वाद्याश्चशुभानिच । अप्रधानानिच-गुणानिगद्यंते निरुक्तिगैरित्यभिधानाद्गुणशब्दस्यानेकार्थत्वम् सिद्धम् २९

प्रकृतीच्या गुणांमुळें मूढ असे लोक विषय किंवा कर्म यांच्याठिकाणीं कर्तृत्वाभिमान—मीच कर्ता असा गर्व धरितात; ज्यांस गुणकर्मविभागांचें ज्ञान नाहीं, जे ज्ञानास अनधिकारी होत; अशांची, इंद्रियगुणविषयादि समस्त परमात्म्याचे स्वाधीन आहेत, असें जाणणाऱ्या तत्वज्ञान्यानें, कर्ममार्गावरील आसक्ति शिथिल करूं नये. ॥ २९ ॥

मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।
निराशीर्निर्ममो भूत्वा युद्ध्यस्व विगतज्वरः ॥३०॥

एवं विद्वदविद्वत्कर्मभेदमभिधायगुणांतरविधानपूर्वकम् विदुषः कर्मविधत्ते । मयीति । आत्मानं मामधिकृत्य यच्चेतस्तदध्यात्मचेतः । सर्वाधिकेपरमात्मनिमयि चेतइतिवा तेन सर्वाणि कर्माणि भ्रांत्या स्वस्मिन्नध्यारोपितानि भगवानेव सर्वाणि कर्माणि करोति तत्पूजेतिच मय्येव संन्यस्य विसृज्य निराशीः विष्णुभक्तिज्ञानतृप्तिव्यतिरिक्तका-मरहितः निर्ममः अहंकरोमि ममेदंकर्मेतिभावशून्यः विगतज्वरः त्यक्त-शोकश्च भूत्वा युध्यस्व । उक्तंच । नाहंकर्ता हरिः कर्ता तत्पूजाकर्मचा-खिलम् । तथापि मत्कृतापूजा तत्प्रसादेन नान्यथा । तद्भक्तिस्तत्फलं मह्यं तत्प्रसादः पुनःपुनः । कर्मन्यासोहरावेवं विष्णोस्तृप्तिकरः सदेति ३०

याप्रमाणें विद्वान् व अविद्वान् लोकांचीं कर्मे सांगून, पुनः अन्यगुण-विशेषपूर्वक विद्वानांचीं कर्में सांगतातः—हे **अर्जुना,** आपण जीं कर्में करितों तीं सर्व परमात्माच करितो असें जाणून, तीं कर्में मला ( परमात्म्याला ) च अर्पण करून, विष्णु भक्ती वांचून, इतर विषयांची इच्छा सोडून, स्वकर्तृत्वा-भिमान टाकून, कुलवधापासून मला दोष लागेल असा तुला जो शोक प्राप्त झाला आहे, त्याचा त्याग करून, तुझ्या धर्मास उचित असें जें हें युद्धकर्म तें करण्यास सिद्ध हो. ॥ ३० ॥

ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवाः ।
श्रद्धावन्तोऽनसूयन्तो मुच्यन्ते तेऽपि कर्मभिः ॥३१॥
ये त्वेतदभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम् ।
सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥ ३२ ॥

किम् विद्वांस एवकुर्वंतीत्येतावता मयाकार्यमित्याशंक्यस्वोक्तकरणाकरणयोः फलमाह । येमे इतिद्वाभ्यां । तेपि कर्मभिर्मुच्यंतइत्यनेन कर्मणः पृथक्साधनत्वं नोच्यते । येत्वेवं निवृत्तकर्माणस्तेपि ज्ञानद्वारामुच्यंते । किमुअपरोक्षज्ञानिनइति । उक्तंच । निवृत्तादीनि कर्माणि ह्यपरोक्षेशदृष्टये । अपरोक्षेशदृष्टिस्तु मुक्तौ किंचिन्न मार्गते । सर्वं तदंतराधाय मुक्तयेसाधनंभवेत् । न किंचिदंतराधाय निर्वाणायापरोक्षदृगिति ॥ ३१ ॥ ३२ ॥

जे मनुष्य मी एवढा वेळ केलेल्या उपदेशाप्रमाणें वागून मला मान्य असें निवृत्तिकर्म निरंतर करितात, ते अपरोक्षज्ञानशून्य असले तरी, मी सांगितलेल्या कर्माच्या अनुष्ठानानें अपरोक्षज्ञान संपादन करून, भवबंधापासून मुक्त होतील. मग, अपरोक्षज्ञानी या कर्मानुष्ठानानें मुक्त होतील ह्मणून काय सांगावें ? ॥ ३१ ॥ जे कोणी या माझ्या मताचा द्वेष करून त्याप्रमाणें वागत नाहींत, ते सर्व ज्ञानशून्य, कर्मज्ञान आणि ब्रह्मज्ञान यांविषयीं मतिशून्य आहेत व ते सर्व कर्ममार्गापासून भ्रष्ट होतील असें समज. ॥ ३२ ॥

सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।
प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥३३॥

यदिश्रद्धयाऽसूयां विना त्वन्मतानुष्ठाने मोक्षोन्यथातुअज्ञानात् मिथ्याज्ञानाच्च नाशस्तर्हि ते मतं किमिति नानुतिष्ठति लोकइत्यतआह । सदृशमिति । यद्वा मंदान् न विचालयेदित्ययोग्यानां तत्वबोधनं न कार्यमित्युक्तम् तत्र हेतुमाह । सदृशमिति । ज्ञानवानपि स्वस्याः प्रकृतेः रागादिस्वभावस्य सदृशमनुगुणमेव चेष्टते किमुताज्ञः । यतोभूतानि प्राणिनः प्रकृतिं स्वभावं यांति अनुसरंति तथाचेंद्रियाणां निग्रहोज्ञानिभिः क्रियमाणो बहुबोधो वा किं करिष्यति ॥ ३३ ॥

द्वेषभावनारहित होऊन, तुझ्या मतावर श्रद्धा ठेवणारास मुक्तिसुखाचा लाभ होतो, व तुझ्या मतावर ज्याची श्रद्धा नाहीं तो त्या लाभास अंतरतो, तर सर्व लोक तुझ्या मताप्रमाणें आचरण कां करीत नाहींत? अशी अर्जुनास शंका येईल, तिचें समाधान करितातः—ज्ञानी पुरुष असले तरी ते आपल्या स्वभावाप्रमाणें कर्मे करितात. मुख्य तात्पर्य असें कीं, सर्व प्राणिमात्र आपापल्या स्वभावाप्रमाणें कर्मे करीत असल्यामुळें, त्यांस इंद्रियनिग्रह किंवा ज्ञान्यांनी केलेला उपदेश त्यांच्या पूर्वजन्मांतील संस्कारापुढें काय चालणार? ॥ ३३ ॥

**इंद्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।**
**तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपन्थिनौ ॥ ३४ ॥**

ननु स्वभावस्य बलवत्त्वे मयिसर्वाणीति विधानं फलकथनं च व्यर्थमित्यत आह । इंद्रियस्येति । अर्थे स्वस्वविषये परिपंथिनौ शत्रू रागद्वेषग्रहणम् लोभमोहादेरप्युपलक्षणम् । निग्रहात्सद्यः प्रयोजनाभावेपि अतिप्रयत्नेन फलस्य भावित्वाच्छक्तितो निग्रहःकार्यइत्याशयः । तदुक्तम् । संस्कारोबलवानेषब्रह्माद्याअपितद्वशाः । तथापि सोन्यथाकर्तुं शक्यतेतिप्रयत्नत इति । एतच्च योग्यजनाविषयं । अयोग्यानां दुःस्वभावस्य कदापि विपर्ययाभावादिति बोद्धव्यम् ३४

जर स्वभावच बलवत्तर आहे तर एवढा वेळ केलेल्या उपदेशाचें फळ काय? याविषयीं सांगतातः—प्रत्येक इंद्रियास रागद्वेषादि विशेष दोष असतात, तथापि मुमुक्षूला ते केवळ शत्रूसारखे असल्यामुळें, त्यानें त्यांच्या स्वाधीन होऊं नये; कारण, पूर्वसंस्काराचें उल्लंघन करणें जरी दुर्घट असलें, तरी, प्रयत्नानें तेंही साध्य होऊन, तो मुमुक्षू इंद्रिय-निग्रह करण्यास समर्थ होतो. ह्मणून माझ्या मताप्रमाणें सत्कर्म केलेंच पाहिजे. ॥ ३४ ॥

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥**

यद्यपि कर्मकर्तव्यं तथाप्युग्रमवर्जनीयरागद्वेषम् युद्धाख्यं कर्म किमर्थं कार्यमित्यतआह । श्रेयानिति । विगुण अंगहीनोपि स्वधर्मः स्वनुष्ठितात् सर्वांगसाकल्येन कृतात्परधर्मादपि श्रेयान् अधिकतरः ।

कुतः स्वधर्मेयुद्धादौ प्रवर्तमानस्य निधनमपिश्रेष्ठम् । परस्य धर्मस्तु भयावहः निषिद्धत्वादनर्थप्रापकइति ॥ ३५ ॥

कर्म केलेंच पाहिजे असा तुमचा अभिप्राय असला तरी, रागद्वेषादिकांनींयुक्त असें युद्धकर्म कशाला करावें ? अशी अर्जुनास शंका येईल, तिचें समाधान सांगतातः–गुणांनी कमी असला तरी, स्वधर्म श्रेष्ठ होय; परधर्म सर्व गुणयुक्त असला तरी त्याचा स्वीकार करणें चांगलें नाहीं. स्वधर्मांत–तूं क्षत्रीय आहेस म्हणून तुला युद्धांत–मरण आलें तरी तें ( परलोकीं ) श्रेयस्कर होईल. परधर्माचा स्वीकार करणें भयकारक होय. ॥ ३५ ॥

अर्जुन उवाच ।

**अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ।**
**अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥३६॥**

बहवः प्रवर्तकारागादयः उक्ताः तेषु बलवंतंप्रति महांतं यत्नं करिष्यामीतिभावेन प्रसंगाद्रागादिषु बलवंतं ज्ञातुमर्जुनउवाच । अथकेनेति । हे वृष्णिकुलोत्पन्न अयं पुरुषः पापं कर्तुमनिच्छन्नपि बलान्नियोजितइव । पापंचरति स केन प्रयुक्तः–प्रेरितश्चरति इतिप्रश्नः । अथेत्यर्थांतरम् यद्वा परमेश्वराद्देवेभ्यश्चानंतरमित्यर्थः । प्रकृतेः क्रियमाणानीत्यादिना तेषामपि प्रेरकत्वस्योक्तवात् । ईश्वरादिव्यतिरिक्तोऽशुभ प्रेरकः शत्रुरूपोमयाजेतव्योबलवान्कइत्याशयः ॥ ३६ ॥

रागद्वेषादि अनेक शत्रू आहेत; त्यांपैकीं सर्वांत बळवान् कोण तें मला समजलें म्हणजे, त्याचा जय करण्याविषयीं मी होईल तितका प्रयत्न करीन, असें मनांत आणून अर्जुन श्री कृष्णास विचारतोः– अर्जुन म्हणतो, हे वृष्णिकुलोत्पन्न श्रीकृष्णा, पुरुष हा, इच्छा नसतांही दुसऱ्याच्या प्रेरणेनें बालत्कारें करून पापाचरण करितो; तर त्याला प्रेरणा करणारा कोण ? अथवा मुख्य प्रेरक श्रीहरी आहेच ? व त्या श्रीहरीचे अनुयायी शुभप्रेरक देवही आहेतच; या देवांवाचून अशुभ प्रेरक व मला जिंकण्यास योग्य असा मुख्य शत्रू कोण आहे तें सांगा; म्हणजे मी त्याला जिंकण्याचा विशेष प्रयत्न करीन. ॥ ३६ ॥

श्री भगवानुवाच ।

**काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।**
**महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥३७॥**

काममूलत्वात्सर्वेषां सएवबलवानितिभगवानुवाच । कामइति । यस्त्वयापृष्टोबलवान्प्रवर्तकः सएषकामएव क्रोधोप्येष एव तज्जन्यत्वात् कामात्क्रोधोभिजायतइतिउक्तत्वात् । यत्रापि गुरुनिंदादिनिमित्तः क्रोधस्तत्रापि भक्तिनिमित्तानिंदाकामनिमित्तएव । रजोगुणात्समुद्भवतीति रजोगुणसमुद्भवः महदशनं भोग्यं यस्य स महाशनः । महान् ब्रह्महत्यादिरूपः पाप्मायस्मादिति महापाप्मा । इह जगति एनं कामं मोक्षविरोधित्वाद्वैरिणं विद्धि ॥ ३७ ॥

सर्वांमध्यें काम ( इच्छा ) हाच बलिष्ठ आहे ह्मणून सांगतातः– **श्रीकृष्ण** ह्मणतात हे **अर्जुना**, काम हा पापकर्मप्रवृत्तीस मुख्य कारण आहे. क्रोध हा त्या कामापासूनच उत्पन्न झालेला आहे. आणि त्या क्रोधाची उत्पत्ति रजोगुणापासून झालेली आहे. अति विषयासक्त होऊन ब्रह्महत्यादि महत्पातकांस करविणारा हा काम, सामोपचारानें अनिवार्य ( निवारण्यास कठीण ) असून, मोक्षमार्गाला विरोध करणारा असल्यामुळें, तूं इहलोकीं हाच आपला शत्रु आहे, असें समज. श्रीहरिप्रेरणेनें देव जसे शुभप्रेरक आहेत त्याप्रमाणें त्यांच्याच प्रेरणेनें कुत्सित कामाभिमानी कालनेमि हा अशुभप्रेरक होय. ॥ ३७ ॥

**धूमेनाव्रियते वह्निर्यथादर्शो मलेन च ।**
**यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥**

कथं कामोमोक्षविरोधीत्यत आह । धूमेनेतिद्वाभ्याम् । यथा धूमेनाग्निरावृतः प्रकाशरूपोप्यन्यैर्न दृश्यते तथेदं परमात्माख्यं वस्तु तेन कामेनावृतं स्वयं प्रकाशरूपमपि अन्यैर्नदृश्यते । यथादर्शोमलेनावृतोमुखाद्यभिव्यक्तिहेतुर्न भवति तथेदमंतः करणमावृतं जीवेश्वराभिव्यक्तिहेतुर्न भवति । यथोल्बेनगर्भवेष्टनेन गर्भआवृतोव्यापाराक्षमः तथेदं जीवस्वरूपं कामेनावृतं नेश्वरादिज्ञाने क्षममित्यर्थः ॥ ३८ ॥

काम हा मोक्षविरोधी कसा होतो तें सांगतातः–धूरानें व्यापलेला अग्नि, प्रकाशरूप असला तरी, जसा दिसत नाहीं, तसा परमात्मा हा स्वयंप्रकाश असूनही, कामरूप आवरणानें जीवांस तो दिसत नाहीं. मलीन झालेला आरसा जसा पाहणाऱ्याच्या मुखाचें प्रतिबिंब दाखविण्यास असमर्थ होतो, तसें हें अंतःकरण कामरूपमळानें आच्छादित झाल्यामुळें त्याला परमेश्वराच्या

स्वरूपाचें ज्ञान होत नाहीं. उदरांतील गर्भ जसा ( उल्बनामक ) वेष्टणानें गुरफटलेला असून चलनवलनादि करण्यास असमर्थ असतो, तसा जीव हा स्वरूपाच्छादक कामरूप वेष्टणानें गुरफटलेला आहे. ह्मणून त्याला ईश्वराचें ज्ञान होत नाहीं. ॥ ३८ ॥

**आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।**
**कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च ॥ ३९ ॥**

एवं ज्ञेयज्ञानकरण ज्ञातृ प्रतिबंधकोक्त्या ज्ञानोत्पत्तिप्रतिबंधकत्वमुक्तम् । इदानीं कथं चिदुत्पन्नस्यापि शास्त्रज्ञानस्यापरोक्षज्ञानजननसामर्थ्यं कामेन प्रतिबध्यत इत्याह । आवृतमिति । ज्ञानिनोपि ज्ञानं कामेनावृतं किमुअल्पज्ञानिनः कामरूपेण कामाख्येन नित्यवैरिणा दुःपूरेण दुःखेन हि कामः पूर्यते । नहींद्रादिपदं सुखेन लभ्यते । न केवलं दुष्पूरेण किं तर्हि यद्यपींद्रादिपदम् । प्राप्तं पुनर्ब्रह्मादिपदमिच्छतीत्यलंबुद्धिर्नास्तीत्यनलेन । उक्तंच । ज्ञानस्यब्रह्मणश्चाग्नेर्धूमोबुद्धेर्मलं तथा । आदर्शस्याथजीवस्य गर्भस्योल्बोहि कामकइति । अथवोत्तममध्यमाधमजीवानां कामाभिमान्यसुरेणावृतत्वं । तारतम्येनेत्यत्रदृष्टांतत्रयम् । तदुक्तम् । अखिलप्रेरको विष्णुर्ब्रह्माद्यास्तदनंतराः । अशुभा अशुभेष्वेव कामादेरभिमानिनः । तत्र कामः कालनेमिः, सर्वधूममलोल्बवत् । शुभमध्याधमजनं क्रमादावृत्यतिष्ठतीति ॥ ३९ ॥

कदाचित् दीर्घप्रयत्नानें व शास्त्रानुभवानें ज्ञान उत्पन्न झालें तरी, काम हा त्या ज्ञानाला प्रतिबंधक करितो ह्मणून सांगतात:— हे अर्जुना, शास्त्रोत्पन्न ज्ञान ज्यांस झालें आहे, अशा ज्ञान्यांच्या ज्ञानाला त्यांचा नित्य वैरी जो काम तो प्रतिबंध करितो. काम हा मोठ्या ज्ञान्यांचा नित्य वैरी आहे, मग तो अल्पज्ञांचा वैरी आहे हें काय सांगावें ? काम हा वैरी कसा ? तें सांगतात:—या कामाची इच्छापूर्ति सुखानें होत नसून ती दुःखानें केली पाहिजे. कारण, इंद्रपद प्राप्त झालें असतांही त्या पदापेक्षां वरिष्ठ जें ब्रह्मपद त्याची तो इच्छा करितो याप्रमाणें हा अनलंबुद्धि आहे. ॥ ३९ ॥

**इन्द्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ।**
**एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥**

वधार्थं तत्रशत्रोः अधिष्ठानमाह । इंद्रियाणीति । इंद्रियादीनि कामस्याधिष्ठानंएतैर्हि एषकामोज्ञानमावृत्य देहिनं विमोहयति ॥ ४० ॥

शत्रूचा वध करावयाचा ह्मटलें ह्मणजे तो कोठें रहातो हें समजलें पाहिजे, ह्मणून सांगतातः—या कामाचीं राहण्याचीं ठिकाणें ह्मटलीं ह्मणजे, कर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रियें, मन व बुद्धि हीं होत; हा काम इंद्रियादिकांनीं मनुष्याचें ज्ञान वेष्टण करून, या देही मनुष्यास मोह घालतो ॥ ४० ॥

**तस्मात्त्वमिन्द्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।**
**पाप्मानं प्रजहिह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥**

हृताधिष्ठानस्य शत्रोर्नाश्यत्वात्कामहनने इंद्रियनिग्रहउपायइत्याह। तस्मादिति ॥ ४१ ॥

ज्यानें शत्रूचें राहण्याचें ठिकाण अगोदर आपल्या स्वाधीन करून घेतलें, अशाला शत्रूचा पराजय करणें सुलभ होतें, ह्मणून सांगतातः—हे भरतश्रेष्ठा अर्जुना, या कामरूप शत्रूस इंद्रियें हीं आश्रयभूत आहेत, ह्मणून तूं पहिल्यानें तीं इंद्रियेंच आपल्या स्वाधीन करून घेऊन, ज्ञान विज्ञानाचा नाश करणारा जो पापी कामरूप शत्रु त्याला निश्चयानें जिंकून टाक. ॥ ४१ ॥

**इन्द्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्यः परं मनः ।**
**मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥**

शत्रुहनने आयुधरूपं ज्ञानंवक्तुं ज्ञेयमाह । इंद्रियाणीति । शारीरादिंद्रियाणि पराणि उत्कृष्टानि न केवलं बुद्धेः परः किंत्वव्यक्तात्पुरुषः परइतिश्रुत्युक्तप्रकारेणाव्यक्तादपि परः ॥ ४२ ॥

शत्रुवध शस्त्रावांचून होत नाहीं ह्मणून, ज्ञानरूप आयुध सांगण्यास तत्पूर्वपीठिका सांगतातः—अर्थाभिमानी रुद्रपुत्रापेक्षां इंद्रियाभिमानी इंद्रादि देवगण श्रेष्ठ; इंद्रादिकांपेक्षां मनोभिमानी रुद्र श्रेष्ठ; रुद्रापेक्षां बुध्यभिमानी सरस्वति श्रेष्ठ; तिच्यापेक्षां महत्तत्वाभिमानी ब्रह्मदेव श्रेष्ठ; त्याच्यापेक्षां अव्यक्ततत्वाभिमानी चित्प्रकृति लक्ष्मी श्रेष्ठ आणि तिच्यापेक्षां ज्याला सुरासुर नमस्कार करितात तो श्रीपरमात्मा श्रेष्ठ होय. ॥ ४२ ॥

एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ॥
जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ ४३ ॥
इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु कर्मयोगोनाम
तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

इदानीं ज्ञानमाह । एवमिति । आत्मानं मनः आत्मना बुध्या संस्तभ्य निश्चलं कृत्वा दुरासदं दुःखेनाधर्षणीयं कामं जहि नाशय । इंद्रियाणिपराणीत्यादाविंद्रियादिदेवताविवक्ष्यंते । सर्वेभ्यः प्रवरादेवा-इंद्राद्याइंद्रियात्मकाः । तेभ्योमनोभिमानीतुरुद्रस्तस्मात्सरस्वती । बुध्या-त्मिकाततोब्रह्मा महानात्मापरः स्मृतः अव्यक्तरूपा लक्ष्मीस्तु वरातस्या हरिः स्वयम् । नतत्समोधिकोवेति ह्यानुपूर्वीप्रकीर्तिता । यथाक्रमप्रबो-धेन नाश्याः कामादिशत्रवः । प्राप्यते च परं स्थानं विष्णोरतुलमं-जसेति । इंद्रियेभ्यः पराह्यर्थाह्यर्थेभ्यश्च परं मनः । मनसस्तु पराबुद्धिर्बुद्धे-रात्मा महान्परः । महतः परमव्यक्तमव्यक्तात्पुरुषः परः । पुरुषान्नपरं किंचित् साकाष्ठासापरागतिरिति श्रुतेः । नचेंद्रियेभ्यः पराह्यर्था रुद्रोहं-कृतिरूपकइत्यादिविरोधः । सर्वाभिमानिनोदेवाः सर्वेपिह्युत्तरोत्तरम् । आधिक्यं वक्तुमेतेषां पृथक् स्थानमुदीर्यत इत्यादिवचनात् ॥ ४३ ॥

इति श्रीमद्भगवद्गीताविवृतौ विद्याधिराजभट्टोपाध्यायविरचिता-याम् श्रीमध्वमतानुवर्ति व्याख्योपेतायाम् तृतीयोऽध्यायः ॥३॥

हे भुजशाली अर्जुना, ( वर सांगितल्याप्रमाणें ) सर्व श्रेष्ठ परमात्मा आहे असें जाणून, बुद्धिनें मनाचें सांतवन करून घे; आणि जिंक-ण्यास कठीण अशा कामशत्रूला जिंक; ह्मणजे तूं सर्व विषयांचेठायीं निःसंग होऊन, सत्कर्मेंकरून तुला ज्ञान प्राप्ती होईल. मग त्या ज्ञानानें प्रसन्न झालेल्या श्रीहरीच्या कृपेला तूं पात्र होशील. ह्मणून, युद्ध हें मला प्रिय व तुझ्या क्षात्र-धर्माला उचित असें कर्म आहे, असें समजून तें तुला केलें पाहिजे. ॥ ४३ ॥

येथें श्रीमदिन्दिराकान्ततीर्थ श्रीपादविरचित प्राकृत टीकेचा
तिसरा अध्याय समाप्त झाला.

# अथ चतुर्थोऽध्यायः

श्री भगवानुवाच ।

इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।
विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥ १ ॥
एवं परम्पराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।
स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २ ॥
स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।
भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ३ ॥

श्रीगुरुभ्योनमः । उक्तयोर्ज्ञानकर्मणोरुभयोर्विस्तारात्मकोयमध्यायः । ततोबुद्धेःपरस्य माहात्म्यं कर्मभेदोज्ञानमाहात्म्यं चोच्यते । उक्तकर्मयोगे रुचिजननाय पूर्वानुष्ठितोऽयं धर्मइति भगवानुवाच । इमामितित्रिभिः ॥ १ ॥ २ ॥ ३ ॥

उक्त ज्ञान किंवा कर्म या उभयतांचा विशेष विस्तार करून, परतर परमात्म्याचें माहात्म्य सांगून, **अर्जुनास** कर्मयोगाची आसक्ति उत्पन्न व्हावी याकरितां हा ( कर्मयोग ) पूर्वानुष्ठित असल्यानें तूंही युद्धरूप सत्कर्मांत आसक्त व्हावेंस ह्मणून या तीन श्लोकांनीं **अर्जुनास** सांगतातः–हे **अर्जुना,** अविनाशी आणि निष्काम असा कर्मयोग मी पूर्वीं **सूर्याला** सांगितला होता; त्यानें आपला पुत्र **वैवस्वतमनु** याला सांगितला; **मनूनें** आपल्या पुत्राला ह्मणजे **इक्ष्वाकु** राजाला तो सांगितला. ॥ १ ॥ हे शत्रुतापका **अर्जुना,** याप्रकारें परंपरेनें प्राप्त झालेला हा निष्काम कर्मयोग मन्वादि राजर्षि जाणत होते. परंतु वर्तमानकाळीं, तो ( कर्मयोग ) कोणाला ठाऊक नसण्याचें कारण हेंच कीं, पुष्कळ काळ लोटल्यामुळें, पूर्वींचे ज्ञानी राहिले नाहींत; त्यामुळें हा नाहींसा झाला आहे. ॥ २ ॥ मी पूर्वीं जो **सूर्याला** सांगितला होता तोच तुलाही सांगितला. हा साधारण मनुष्यांनां सांगण्यासारखा नाहीं, परंतु तूं केवळ माझा भक्त व सखा आहेस, ह्मणूनच अति गुह्य असें हें मर्म मी तुला सांगितलें. ॥ ३ ॥

अर्जुन उवाच ।

**अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ।**
**कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥**

मयीसर्वाणीत्युक्तं भगवन्माहात्म्यं आदितोज्ञातुमर्जुनउवाच । अपरमिति । अपरंपश्चात्तनं । परं पूर्वकालीनं ॥ ४ ॥

भगवन्माहात्म्य साकल्यानें श्रवण करण्याविषयीं उत्सुक झालेला **अर्जुन** विचारितोः—हे भगवन् **श्रीहरे**, तुझा प्रादुर्भाव वसुदेव स्त्री जी देवकी तिजपासून झालेला आहे, ह्मणजे तूं अलिकडचाचं आहेस; आणि सूर्याचा जन्म तर फार प्राचीनकाळीं झालेला आहे. असें असतां, तूं सूर्याला निष्काम कर्मयोगाचा उपदेश ( पूर्वकाळीं ) केलास हें संभवेल तरी कसें ? हें तुझें ह्मणणें युक्तिविरुद्ध असल्यामुळें मला योग्य कसें वाटेल ? ॥ ४ ॥

श्री भगवानुवाच ।

**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।**
**तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ५ ॥**

रूपांतरेण मया सूर्याय प्रोक्तमित्याशयवान् भगवानुवाच । बहूनीति ॥ ५ ॥

कृष्णरूपानें देवकीपासून मीं आधुनिककालीं प्रगट झालों आहें तरी, पूर्वीं मीं अन्य रूपानें सूर्याला निष्काम कर्मयोग सांगितला होता; अशा अर्थाचें **श्रीकृष्ण** उत्तर देतातः—हे **धनंजया**, माझे अवतार आणि तुझे जन्म यापूर्वीं पुष्कळ होऊन गेले आहेत. हे शत्रूंला ताप देणाऱ्या **अर्जुना**, मी सर्वज्ञ असल्यामुळें मागें घडलेला वृत्तांत, कोठें कधीं व कसा घडला तें सर्व जाणतों; परंतु, तूं जीवकोटींतील असून अल्पज्ञ आहेस, ह्मणून तुला पूर्वजन्मांतलें कांहींच आठवत नाहीं. हाच काय तो तुझ्यांत व माझ्यांत स्पष्ट भेद आहे. ॥ ५ ॥

**अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।**
**प्रकृतिं स्वामधिष्ठाय सम्भवाम्यात्ममायया ॥ ६ ॥**

जन्मान्यतीतानिचेत्तर्हि न जननमरणराहित्यं भगवतः स्यात्तथा चाविनाशीत्युक्तविरोधः स्यादित्यतआह । अजोपीति । उत्पत्तिरहितोपि सन् अव्ययः आत्मा देहोयस्येत्यव्ययात्मापि सन् भूतानामीश्वरोपिसन्संभवामि । स्वरूपतोदेहतश्चानादिनित्यस्य संभवः कथमुच्यते व्याहतत्वात् इत्यतउक्तम् प्रकृतिमिति । प्रकृत्या जातान् वसुदेवादीन् अधिष्ठाय प्रादुर्भवामि । तेन निमित्तेन प्रकृतिमधिष्ठाय प्रकृत्युपादानांभ्रांतिमाश्रित्य संभवामि । भ्रमतां भ्रमति क्षितिरितिवत्संभूतोयमिति जनानां भ्रमविषयोभवामीत्यर्थः । यदि मातापितृसंबंधोङ्गीकृतः तर्हि तन्निमित्तं दुःखादिकमपि प्रसज्येतेत्यतउक्तम् । स्वामिति । स्वकीयाम् भगवदधीनामित्यर्थः । कुतस्तव जीवविलक्षणं जन्मेत्यतउक्तम् । आत्ममाययेति । आत्मज्ञानेन सर्वज्ञत्वादित्यर्थः । केतुः केतश्चितिश्चित्तं मतिः क्रतुर्मनीषामायेतिह्यभिधानं । यद्वा प्रकृतिशब्देन भ्रमनिमित्तमुक्तम् । प्रकृतिवाचिनैव मायाशब्देन भ्रांत्युपादानमुच्यत इति भेदः । उक्तंच । महदादेश्चयामाता श्रीर्भूमिरिति कल्पिता । विमोहिका च दुर्गाख्या ताभिर्विष्णुरजोपिहि । जातवत्प्रथते ह्यात्मचिद्बलात्मूढ चेतसामिति । अथवा परप्रेरणया अवतारादिकमिति शंका निवार्यते । आत्म मायया स्वेच्छयेत्यर्थः । महामायेत्यविद्येति नियतिर्मोहिनीति च । प्रकृतिर्वासनेत्येवं तवेच्छानंत कथ्यतइतिवचनात् । पूर्णकामस्य अवतारे किंप्रयोजनमित्यतउक्तम् । प्रकृतिमिति स्वभावमित्यर्थः । स्वस्वरूपमितिवदुपचारत्व शंकानिवृत्त्यर्थं पुनः स्वशब्दः । स्रष्टृत्वादिस्वभावत्वात् स्वेच्छया विष्णुरव्ययः । सृष्ट्यादिकं करोत्यद्धास्वयं च बहुधाभवेदितिश्रुतेः ॥ ६ ॥

मागें पुष्कळ अवतार होऊन गेले असें ह्मटल्यानें ( अवतार धारण करणाऱ्या परमेश्वरास ) जननमरणादि आहे असें सिद्ध होतें; आणि यामुळें मागील ( अविनाशितुतद्विद्धि ) वाक्यांतील अर्थाला विरोध येतो, याकरितां श्रीकृष्ण सांगतातः–हे अर्जुना, मी उत्पत्तिनाशशून्य आहे; ह्मणजे मला जन्म नाहीं व मृत्युही नाहीं. ब्रह्मादिदेवगणांहून मी श्रेष्ठ आहे. असें आहे तरी, साधुरक्षणाकरितां, मी अनेक काळीं अनेक अवतार घेतों. तें पाहून लोक मला

'उत्पन्न झाला' असें ह्मणतात. स्वरूपानें किंवा देहानें अनादि व नित्य असलेल्यास 'जन्मला' असें तरी कसें ह्मणतां येईल? तर प्रकृतिसंबंधीं देहधारी असलेल्या देवक्यादिकांच्या देहांत मी असून लोकांत प्रगट झालों ह्मणजे मी त्यांपासून उत्पन्न झालों, अशी भ्रांति लोकांस पडते. ज्याप्रमाणें एखादा मनुष्य पृथ्वीवर धांवत असतां, अचल अशी पृथ्वीही धांवत आहे असें त्यास वाटतें, त्याप्रमाणें, मी शाश्वत असून प्राकृत देहापासून उत्पन्न झालों असें त्यास वाटतें; आतां मला मातापितरांचा संबंध घडतो ह्मणून गर्भवासादि दुःखेंही असलींच पाहिजेत असें ह्मणशील तर, ज्या प्रकृतिगुणांनीं प्राणीमात्र झाले आहेत, ती प्रकृतीच माझ्या स्वाधीन असल्यामुळें, तें दुःख मला कदापिही होत नाहीं. आणखीं जीवांचे जन्मांत आणि तुझ्या अवतारांत काय भेद आहे? असें तूं ह्मणशील तर ऐक; मी सर्वज्ञतादि सर्वगुणविशिष्ट असून स्वेच्छेनें लोककल्याणाकरितां अनेक अवतार घेतों. जीव हे, आपापल्या प्राक्तनानें बांधिलेले असून, ते कृतकर्मांचें पुण्यपापादि फळ भोगितात. कारण ते पराधीन आहेत. त्यांचा निरुपाय झाल्यानें ते पुनः पुनः जन्ममरणयुक्त संसारांत निमग्न होत असतात. हेंच जीवांतील आणि माझ्यांतील मोठें अंतर होय. ॥ ६ ॥

## यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
## अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥

**किंच स्वप्रयोजनाभावेपि दयालुतया भगवतः परप्रयोजनार्थमवतारादिकं युज्यत इत्यभिप्रेत्य परप्रयोजनापेक्षाकालं दर्शयन् परप्रयोजनविशेषं दर्शयति । यदेतिद्वाभ्यां ॥ ७ ॥**

भगवान् नारायणानें रामकृष्णादि अवतार घेतले ते घेण्याचें त्याला कांहीं कारण होतें किंवा नाहीं? कारण होतें असें झाल्यास नित्य व परिपूर्ण अशा परमात्म्यास अपूर्णत्व येतें; आणि अवतार घेण्याचें कांहीं कारण नसेल तर एखादा अज्ञान मनुष्य सुद्धां कांहीं तरी कारणाशिवाय कोणतेंही कार्य करण्यास प्रवृत्त होत नाहीं, असें असतां सर्व विद्यानिधि परमात्मा कारणाशिवाय कृत्य कसें करील? तेव्हां याचें (अवतार घेण्याचें) कारण इतकेंच

कीं, शरणागत दीनांवर दया करावी. याशिवाय दुसरें कांहीं नाहीं; अशा अर्थानें सांगतातः—हे अर्जुना, ज्या ज्या वेळीं लोककल्याणकारक असा धर्म नष्ट होतो, किंवा लोकांनां दुःख देणाऱ्या अधर्माचें प्राबल्य होतें त्या त्या वेळीं मी स्वेच्छेनें अनेक अवतार घेतों. ॥ ७ ॥

## परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्।
## धर्मसंस्थापनार्थाय सम्भवामि युगे युगे ॥ ८ ॥

युगेयुगइतिधर्महान्यधर्मवृद्धिकालइत्यर्थः स्वभावादेव जन्मना परित्राणादि भगवान् करोति नाशक्त्येति द्रष्टव्यम् ॥ ८ ॥

ज्या ज्या काळीं अधर्माचा प्रसार झाल्यानें साधुपुरुष नष्टप्राय होतात व दुर्जनांचा सुळसुळाट होतो, त्या त्या काळीं धर्मस्थापना करून साधूंचें रक्षण आणि दुर्जनांचा नाश करण्याकरितां मी अवतार घेतों; ( जरी नित्यमुक्त अशा वैकुंठांत असतांही त्या श्रीहरीला, साधूंचीं सर्व दुःखें नाहींशीं करण्याची शक्ति आहे, तथापि, या लोकांत अनेक अवतार घेऊन आपल्या शक्तीचा विचित्र प्रभाव दाखविल्यानें, मुक्तियोग्य अशा मंदबुद्धि जीवांनां सुद्धां, त्यांच्या ठिकाणीं दृढभक्ति उत्पन्न होऊन ते दुर्निवार अशा भवबंधापासून मुक्त व्हावेत, हाच भूलोकांत अवतार घेण्याचा त्याचा मुख्य हेतु आहे. ॥९॥

## जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः।
## त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन॥ ९ ॥

एवं स्वस्य स्वभावादेवावतारादिव्यापारमुक्त्वा तज्ज्ञानफलमाह। जन्मेति। एवमुक्तप्रकारेण दिव्यमलौकिकं मे जन्म कर्म च तत्वतोवेत्ति सदेहं त्यक्त्वा पुनर्जन्म नैति न प्राप्नोति। किंतु मामेति एकदेशज्ञानेन मुक्तिवचनं योग्य गुणज्ञानोपलक्षणार्थं येषां गुणानां ज्ञानेन मुक्तिरुक्ता पृथक् पृथक्। वेदेषु चेतिहासेषु सा तु तेषां समुच्चयात् ॥ ९ ॥

मागील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें आपल्या अवतारादि विचित्र शक्ति, जीवांच्या शक्तीपेक्षां विलक्षण आहेत असें स्पष्टपणें दाखवून, त्या जो जाणतो

त्यास फळ काय मिळतें तें सांगतातः-हे अर्जुना, उक्त रीतीनें माझे जन्म किंवा कर्म जो पुरुष यथार्थपणें जाणतो, तो पुनः जन्ममरणयुक्त अशा संसारांत पडत नाहीं. इतकेंच नव्हे तर माझें स्थान जी नित्यमुक्ति ती त्यास प्राप्त होते. एक गुणाच्या ज्ञानानें अधिकारी पुरुषास मुक्ति प्राप्त होते असें शास्त्रांत ज्या ठिकाणीं सांगितलें आहे, त्या ठिकाणीं, आपल्या योग्यतेनुसार गुणाचें ज्ञान झाल्यानें मुक्ति प्राप्त होते असेंच समजावें. ॥ ९ ॥

**वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ।**
**बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥**

**जन्मकर्मादिज्ञानश्रद्धायाउत्पादनार्थं संति च तथा मुक्ताइत्याह । वीतेति । मन्मयाः मत्प्रचुराः सर्वत्र मां विना किंचिदपश्यंतः मामुपाश्रिताःसंतः स्वयोग्योपासनाविषयगुणविशिष्टभगवज्ज्ञानाख्येनैव तपसा पूताः दग्धकर्माणः मयिभावं सायुज्यादि लक्षणां स्थितिमापुः१०**

भगवंताचें अवतार चरित्र हें कर्मज्ञान व श्रद्धा उत्पन्न होण्यास मुख्य कारण असून, यायोगानें पूर्वी पुष्कळ मुक्त झाले आहेत; ह्मणून सांगतातः— विषयांची इच्छा सोडून, किंवा भयक्रोधादि दोष रहित होऊन, 'मन्मयाः' ह्मणजे माझ्यावांचून, संसारांत तारणारी अन्य श्रेष्ठ अशी वस्तू नाहीं असें समजणारे—निरंतर माझाच आश्रय करणारे—स्वयोग्य उपासना करून त्या उपासनेला विषयभूत गुणविशिष्ट भगवंताचें ज्ञान हेंच तप तें आचरून दग्ध कर्म ह्मणजे पवित्र झालेले असे अधिकारी सायुज्यादि मुक्ति प्राप्त करून घेतात. ( असाच याचा अर्थ होय, 'मन्मय' किंवा 'मद्भाव' असें ह्मटल्यानें मजसीं ऐक्य पावतो किंवा मीच होतों असा अर्थ दिसतो तसा अर्थ घेऊं नये. कारण, अनादि अशा स्वातंत्र्यादि सकलगुणयुक्त परमात्म्याहून अल्पज्ञ व परतंत्र असे जीव नित्य भिन्नच असतात. असें जर नसतें, तर या जीवाला भवबंधमुक्त होण्याकरितां परमात्म्याच्या प्रसादाचें कांहीं कारण नव्हतें आणि, जीवांत आणि परमात्म्यांत भेदच नसेल तर जीवापासून परमात्म्याला मुक्ति कां मिळूं नये ? याप्रमाणें, जीव आणि परमात्मा यांचें ऐक्य आहे असें मानिलें तर अनेक शंका उद्भवतील हें उघड असल्यामुळें सूज्ञजन तसा अर्थ कधींही करीत नाहींत. ) ॥ १० ॥

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।
मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ ११ ॥**

त्रैविद्यानामपि मोक्षसद्भावात् कोविशेषःत्वामुपाश्रितानामित्यत आह । यथेति । ये यथामामुपासते तांस्तथैव तदनुसारिफलदानरूपेणाहं भजामि अतोममसेवानुसारेण फलदत्वात्सेवायाश्च वैषम्यान्न ज्ञानिनां त्रैविद्यानां च फलसाम्यमितिभावः त्रैविद्यानामन्यदेवता याजित्वात्कथमुच्यते मां प्रपद्यंत इत्यतआह । ममेति ॥ ११ ॥

वेदत्रयोक्त कर्मविधीच्याठायीं निरत अशा त्रैविद्यांलाही मोक्ष मिळत असल्यानें, तुझ्या सेवेनेंच मोक्ष प्राप्त होतो, या तुझ्या ह्मणण्यांत विशेषता काय आहे? असें अर्जुन विचारील ह्मणून सांगतात:-हे अर्जुना, जे पुरुष मला ज्याप्रमाणें भजतात त्या प्रमाणेंच मीं त्यांना फळ देतों; कोणत्याही रीतीनें इंद्रादिदेवांच्या उद्देशानें कर्म केलें तरी, तें मलाच अनुसरून असून, तें अंतीं मला अर्पण करण्याचा हेतू ठेविल्यानें, कर्मकर्त्यांच्या योग्यतेप्रमाणें फळ देणारा मीच आहें. याकरितां त्रैविद्यांपेक्षां निरंतर माझ्याच स्मरणांत रत असलेले ज्ञानि श्रेष्ठ होत; यावरून ज्ञान्यांस जी फलप्राप्ती होते ती, त्रैविद्यांस होत नाहीं. ॥ ११ ॥

**कांक्षन्तः कर्मणां सिद्धिं यजन्त इह देवताः ।
क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ १२ ॥**

अन्यदेवता यजंतोपि कर्मणां सिद्धिंकांक्षंतोपि मम वर्त्मानुवर्तंते इत्यर्थः । कर्मफलकांक्षित्वेपि कुतस्त्वन्मार्गानुवर्तनमित्यत आह । क्षिप्रंहीति । यस्मात्कर्मजा सिद्धिः क्षिप्रं भवति तस्मान्मम वर्त्मानुवर्तंत इतिबोद्धव्यं । मद्वर्त्माननुवर्तनेच कर्मफलंनस्यादिति । तदुक्तम् । अन्यदैवतपूजापि यस्मिन्नंते समर्पिता । स्वर्गादिफलहेतुःस्या न्नान्यथा तंभजेद्धरिमिति ॥ १२ ॥

वेदोक्त कर्मांचे ठिकाणीं रत झालेले असे, जर तीं कर्में तुलाच अर्पण करण्याच्या हेतूनें करितात, तर तुला अतिशय संतोष देणारा जो ज्ञानमार्ग

त्याचाच ते स्विकार कां करीत नाहींत ? असें अर्जुन विचारील ह्मणून, कर्ममार्ग सुलभ असून शीघ्र फळ देणारा आहे अशाविषयीं सांगतातः—मनुष्यलोकांत कर्मं केल्यानें लवकर सिद्धि मिळते ह्मणून, त्या सिद्धीची इच्छा करणारे, अनेक देवतांच्या उद्देशानें कर्मं करितात; त्या कर्मांची सिद्धि ज्ञानसिद्धिपेक्षां कमी होय; तथापि, तीं सर्व कर्मं मलाच अर्पण केल्यानें त्यांच्या योग्यतेप्रमाणें फळ देणारा मीच आहे, असें समज. ॥ १२ ॥

**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।**
**तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३ ॥**

भगवद्भजनं विना कुतोन तत्फलमित्यतस्तस्य पितृत्वादिना विशिष्टत्वात्तत्त्यागेनान्यदेवतायजंतः कथं महाफलभाजोभवेयुरित्याशयेनाह । चातुर्वर्ण्यमिति । राजससात्विकेषु सात्विको ब्राह्मणः । सत्वमधिकं यतो रजसस्तद्वान् क्षत्रियः । समसत्वरजोवान् वैश्यः । रजोपेक्षयाधिकतमोवान् शूद्रः । चतुर्वर्णसमुदायः । सात्विको ब्राह्मणः । सात्विकराजसः क्षत्रियः । राजसतामसो वैश्यः । तामसः शूद्रः । सत्वसत्वाधिकरजोरजोभिस्तमसा तथा । वर्णाविभक्ताश्चत्वारः सात्विकाएववैष्णवाइति गुणविभागः । कर्मविभागः शमोदमइत्यादिना वक्ष्यते । यथा भगवान् सर्वकर्ता एवं भवतोप्यन्यः कर्तास्ति किमित्यपेक्षायामाह । तस्येति । तस्य चातुर्वर्ण्यस्य कर्तारं । जीववत्तवापि कर्मलेपः स्यादित्यतः कर्मलेपाभावं वक्तुं हेतुं तावदाह । तस्येति । कर्तारमपि मां जीवविलक्षणकर्तृत्वादकर्तारं विद्धि । उक्तंच । अप्रयत्नात्स्वतंत्रत्वात्फलानां च विवर्जनात् । क्रियायांच स्वरूपत्वादकर्तेति च तं विदुरिति ॥ १३ ॥

भगवंताला ( कर्मं )अर्पण केल्याशिवाय त्याचें फळ मिळत नाहीं याचें कारण असें कीं, ज्या परमात्म्याच्या प्रसादानें, हें सर्व जग उत्पन्न झालें असतां, त्याला विसरून भलत्याच देवास संतोष देणारें असें यजन ( हवन ) केल्यानें त्याचें फळ मिळावें कसें ? यावरून सर्व जगाचा पिता ( उत्पन्नकर्ता ) जो श्रीहरी त्याला अर्पण करण्याचे हेतूनें कर्मं करावीं अशा अभिप्रायानें, भगवान् सर्वांचा पिता आहे असा संबंध दाखवितात—राजस सात्विकांमध्यें

ब्राह्मणांत सत्वगुण अधिक असतो ह्मणून त्यांनीं शमदमादिक कर्में करावीं; सात्विक राजसांमध्यें क्षात्रियांचेठायीं रजोगुण अधीक असतो ह्मणून त्यांनीं शौर्य दानादिक कर्में करावीं; आणि वैश्यांत तमोगुणापेक्षां रजोगुण अधीक किंवा रज आणि सत्व हे गुण सारखे वास करीत असल्यामुळें त्यांनीं गोरक्षण, शेती आणि व्यापार हीं कर्में करावीं; शूद्रांत रजोगुणापेक्षां तमोगुण अधीक असल्यानें त्यांनीं ब्राह्मण, क्षत्रीय व वैश्य या तीन वर्णांतील लोकांची सेवा करावी; याप्रमाणें हे चार वर्ण मीच उत्पन्न केले आहेत. या चार वर्णांचा कर्ता मीच असून, मला उत्पत्ति किंवा नाश हीं नाहींत असें जाण. ॥ १३ ॥

**न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा ।**
**इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बद्ध्यते ॥१४॥**

ततः किमित्यतआह । नमामिति । इतश्च न लिंपतीत्याह । नम इति । स्पृहाऽभिनिवेशः इच्छामात्रंत्वस्ति । तदुक्तं । आकांक्षन्नपि देवेशो नेच्छते लोकवत्परः। न ह्याग्रहस्तस्य विष्णोर्ज्ञानं कामोहितस्य-त्विति । यस्यालिप्तत्वंजानन्नपि सर्वकर्मलेपान्मुच्यते । नमांकर्माणि-लिंपंतीति किं वर्णनीयमित्याशयेनाह । इतीति । प्रकरणात्सिद्धेपि पुनर्मामिति । विशेषणं जीवाभेद निवृत्यर्थं ॥ १४ ॥

मला कर्में स्पर्श करीत नाहींत तसेंच, मला कर्मफलाची इच्छाही नाहीं. हें जो जाणतो, त्याला कर्माची बाधा होत नाहीं. मग मला कर्मलेप कसा होईल ? कर्मफलाची इच्छा न करणारा जो मीं त्या मला जो पूर्णपणें जाणतो तो सर्व कर्मबंधापासून मुक्त होतो. ॥ १४ ॥

**एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।**
**कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५ ॥**

एवं ज्ञात्वा यदि ज्ञानीकर्मभिर्नबध्यते तर्हि ममापि ज्ञानित्वेन कर्मबंधाभावात्कथं कर्मविधानमित्याशंक्य ज्ञानिनामप्यधिक मोक्षा-कांक्षायां कर्मकरणे आचारोप्यस्तीत्याह । एवमिति । पूर्वतरंततोपि पूर्वैः कृतत्वेन पूर्वभावीत्यर्थः ॥ १५ ॥

याप्रमाणें तुला जाणल्यानेंच जर कर्मापासून बंध प्राप्त होत नाहीं. तर, मीही तुला जाणत असल्यामुळें अर्थात् मला कर्मबंधनाची भीति नाहीं; मग मी युद्धरूप कर्म तरी कशाला करावें? अशी अर्जुनास शंका येईल ह्मणून भगवान् सांगतातः—मोक्षांतील आनंदाभिवृद्धीची इच्छा करणारे जनकादिक राजे किंवा, त्यांच्या पूर्वींचेही ज्ञानी पूर्वोक्तप्रकारें मला जाणत असूनच कर्म करीत होते; ह्मणून तूंही कर्म करावेंस. ॥ १५ ॥

**किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।**
**तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥१६॥**

कर्मकुर्वित्युक्तं तस्य कर्मणोजिज्ञासाजननार्थं दुर्विज्ञेयत्वं वदन् प्रकर्षेण वक्तुं प्रतिजानीते । किं कर्मेति । अकर्म शब्देन कर्माभावो-विरुद्धकर्म चोच्यते । अकर्मादिकं हेयत्वेन ज्ञेयं । अतउपादेयत्वेन कर्मणः प्राधान्यात्तत्ते कर्मेत्याह । यद्वा । ते कर्मेत्यत्र अकर्मेति पदच्छेदः । अशुभात्कर्मबंधनात् ॥ १६ ॥

कर्म कर असें अर्जुनास सांगितलें परंतु चांगलीं वाईट कर्में कोणतीं तीं सांगितल्याशिवाय कळणें अशक्य; ह्मणून सांगतातः—कर्म कोणतें आणि अकर्म कोणतें? ह्याबद्दल कवि ( ज्ञानी ) सुद्धां भ्रमांत पडले आहेत; ह्मणून तुला, तूं कोणतें योग्य कर्म करावेंस तें सांगतों. ज्याच्या ज्ञानानें तूं अशुभरूप कर्मबंधनापासून मुक्त होशील. ॥ १६ ॥

**कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।**
**अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥**

न केवलं तज्ज्ञात्वा मोक्ष्यसे अपितु ज्ञात्वैवेत्याशयेनाह । कर्मण इति । पूर्वश्लोकात्कर्माकर्मग्रहणमनुवर्तते । कर्मादिपदाध्याहारोवा । कर्मणोविविच्यविकर्मादि बोद्धव्यं । विकर्मणोविविच्यकर्मादिबोद्धव्यं । अकर्मणश्च विविच्य कर्मादिबोद्धव्यमित्यर्थः । अथवा प्रतिज्ञातं कर्मादि-स्वरूपमनेनोच्यते । कर्मणइत्यादौ न इति पृथक्पदं द्रष्टव्यम् । असमान-पदस्य रेफोत्तरस्य नस्य णत्वं । ब्रह्मणइंद्रोपयाहीत्यादौ दृष्टं । ततश्च

कर्मादिकमस्मदीयमस्मदधीनमेवेति बोद्धव्यमित्यर्थः । न इतिबहुवचनेन जीवाधीनत्वं निवारयति । एकस्यबोध्दुरबोध्दृत्वादीश्वरवद्बहुरूपत्वादमुख्यत्वादिति । नच शापादिना कवयोप्यत्र मोहिताः अशक्यं तज्ज्ञातुमित्याह । गहनेति ॥ १७ ॥

हे अर्जुना, कर्मादिकांचें स्वरूप शापादि दोषरहित अशा ऋषींलासुद्धां कळणें कठीण आहे ह्मणून तुला सांगतों:—कर्मापासून भिन्न अकर्म होय, अकर्मापासून कर्म भिन्न आहे असें जाणावें व विकर्मापासून भिन्न कर्म व अकर्म जाणावें. कर्मांचें ज्ञान होणें फार कठीण आहे. अनेकरूपी जो मीं त्या माझे स्वाधीन सर्व कर्में आहेत असें जाणावें. ॥ १७ ॥

**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।**
**स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥१८॥**

कर्मादिस्वरूपं प्रपंचयन्नेव तद्बोधं स्तौति । कर्मणीति । यः कर्मणि क्रियमाणेसत्यकर्म विष्णोरेव कर्म सदाहंचित्प्रतिबिंबः स्वातंत्रेण न किंचित्करोमीति स्वस्य कर्माभावं पश्येत् । अकर्मणि सुप्त्यादावकरणावस्थायां कर्म परमेश्वरः सर्वदा सर्व सृष्ट्यादि करोतीति परमेश्वरस्य कर्म यः पश्येत् । अथवा कर इति शब्दः कर्मवाची सोस्मिन्विषयीकारित्वेन । प्रतिष्ठित इति कर्म जीवः तद्वैपरीतत्वादकर्मेश्वरः । करोस्मिन्मीयत इति कर्म जीव उदाहृतः । विधिशब्देनामितत्वादकर्मा भगवान् हरिरितिवचनात् । ततश्च कर्मणि जीवेऽस्वातंत्र्यादकर्मकर्माभावं यः पश्येत् । अकर्मणि विष्णौ स्वातंत्र्यात्कर्म यः पश्येदित्यर्थः । अनेन भगवतः परानपेक्षया कर्तृत्वंजीवस्य तदधीनकर्तृत्वं च ज्ञात्वा तदर्थत्वेन वर्णाश्रमविहितानुष्ठानं कर्म तदकरणमकर्म तद्विपरीतकरणं विकर्मेत्युक्तं भवति । एवं यः पश्यति स बुद्धिमान् ज्ञानी स एव योगेनयुक्तः । सर्वाकरणात्सएव कृत्स्नकर्मकृत् स्वयोग्य कृत्स्नकर्मफलस्य मोक्षस्य नियतत्वात् ॥ १८ ॥

कर्मांचें स्वरूप जास्त विस्तार करून सांगावें ह्मणून कर्मांची स्तुति करितात—जो मनुष्य कर्म करते वेळीं, मी हें कर्म स्वतंत्रतेनें करीत नसून, मी

केवळ बिंबरूप, परमात्म्याचे आधिन असून, तोच ( परमात्मा ) माझ्याकडून हें कर्म करवितो. असें समजतो; किंवा, सुषुप्ति आदिकरून अवस्थेंत सुद्धां, सर्व सृष्टिकर्ता श्रीहरीच पूर्वसंस्कारानें उत्पन्न झालेले विषय दाखवितो, असें जाणतो, तो बुद्धिमान् योगयुक्त ज्ञानी भगवत्प्रीत्यर्थ सर्व कर्मं करणारा होय असें समजावें. स्वतंत्रपणानें जीवांस कर्म करण्याची शक्ति नाहीं, ईश्वर हाच स्वतंत्र असून मुख्य कर्ता आहे. हें तात्पर्य होय. ॥ १८ ॥

## यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ।
## ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः ॥ १९ ॥

न केवलं कर्तृत्वाभिमानत्यागेनैव कृत्स्नकर्मकर्तृत्वादि अपितु कामादित्यागेनापि भाव्यमित्याह । यस्येत्यादि श्लोकपंचकेन । समारंभाः आरभ्यमाणानि कर्माणि । कामः फलासंगः संकल्पः कर्मसंगः ताभ्यां वर्जिताः । अतएव ज्ञानाग्निदग्धकर्माणम् ॥ १९ ॥

मीं स्वतंत्रपणानें कर्म करीत नाहीं एवढें जाणल्यानेंच भागत नाहीं तर, कामादिकांचा त्यागही करणें अवश्य आहे, ह्मणून सांगतात–ज्याच्या सर्व कर्मांचे आरंभ काम-संकल्परहित ह्मणजे कर्मफलाची इच्छा मनांत न आणतां होतात; त्याचीं सर्व कर्मं ज्ञानरूप अग्नीनें दग्ध झालेलीं असतात; अशाला विद्वान् लोक ( ज्ञानी ) पंडित असें ह्मणतात. ॥ १९ ॥

## त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः ।
## कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति सः ॥ २० ॥

नच कामसंकल्पाभावेनालं फले आसंगं स्नेहंच त्यक्त्वा । ज्ञानस्वरूपं पुनरप्याह । नित्यतृप्त इति । नित्यतृप्त निराश्रयेश्वरस्वरूपोस्मीति ज्ञानवान् अनिराश्रयोवा भगवदाश्रयत्वात् ॥ २० ॥

केवळ काम-संकल्परहित झाल्यानेंही पूर्णता प्राप्त होत नाहीं; तर, कर्मफलाच्या आसक्तीचा त्याग करून ज्ञानयोगानें भगवत्स्वरूप जाणिलें पाहिजे अशा अर्थाचें भाषण करितात–कर्मफलाची आसक्ती सोडून जो नित्य तृप्त होऊन, परमात्म्याला ज्याप्रमाणें कर्मबंधन संभवत नाहीं, त्याचप्रमाणें

मीही त्या परमात्म्याचा आश्रय केल्यामुळें मलाही कर्मबंध नाहींच असें समजतो, तो कर्म करण्यास प्रवृत्त झाला तरी, तो कांहींच कर्म करीत नाहीं. ॥ २० ॥

**निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।**
**शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ २१ ॥**

कामादित्यागोपायमाह । निराशीरिति । आत्मा मनः । यतचित्तमना भूत्वानिराशीः त्यक्त सर्वपरिग्रहश्च भवति । परिग्रहत्यागोऽनभिमानं । तथात्युक्तम् । सुसुखंबतजीवामि यस्य मे नास्ति किंचन । मिथिलायां प्रदीप्तायां न मे दह्यति किंचनेति । ननूक्तोपायेन यस्त्यक्तकामादिः सर्वकर्मण्यभितः सर्वतः प्रवृत्तौ नैव किंचित्करोतीत्येतद्विरुद्ध मित्याशंक्य तस्याभिप्रायमाह नाप्नोतिकिल्बिषमिति । कर्मफलसंगाभावात्तन्निबंधन दोषराहित्यमेव सेंद्रियशरीरनिर्वर्त्य कर्म कारिणोऽकर्तृत्वमिति भावः ॥ २१ ॥

कामादिकांच्या त्यागाचा उपाय सांगतातः—ज्यानें आपलें मन स्वाधीन ठेविलें आहे, कर्मफळाची ज्याला इच्छा राहिली नाहीं, ज्यानें प्रपंचसंबंधीं वस्तू ( देह, घर, स्त्री, पुत्र, इत्यादिकांचा ) च्या संग्रहाचा त्याग केला आहे. अशा पुरुषानें केवळ शरीरनिर्वाहार्थ कर्में केलीं तरी, त्या कर्मांच्या ठिकाणीं तो स्नेह ठेवीत नसल्यानें तो दोषी होत नाहीं. ॥ २१ ॥

**यदृच्छालाभसन्तुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः ।**
**समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबध्यते ॥२२॥**

कामाद्यहंकार त्यागाद्युपायभूत यतचित्तात्मवतोलक्षणमाह । यदृच्छेति । कथम् द्वंद्वातीतत्वमित्यत आह । समइति ॥ २२ ॥

कर्मांचे ठायीं अभिमानादिकांचा त्याग करून कोणत्या उपायानें जितचित्त होतां येतें त्याचें लक्षण सांगतात—कोणा जवळ कांहीं मागितल्याशिवाय मिळेल तितक्यानेंच संतुष्ट असतो; शीतोष्ण सुखदुःखादि द्वंद्वापासून ( लाभहानि, जयपराजय इत्यादि ) हर्ष किंवा खेद ज्यास होत नाहीं. कोणत्याही कार्याची सिद्धि झाली तरी ज्यास हर्ष होत नाहीं व सिद्धि न झाली तरी दुःख

होत नाहीं ह्मणजे सिद्ध व असिद्ध या दोन्ही प्रसंगीं समबुद्धि धारण करणारा, अशा पुरुषानें कांहीं कर्म केलें तरी तो त्या कर्मानें बांधला जात नाहीं. २२

गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ।
यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥ २३ ॥

उपसंहरति । गतसंगस्येति । गतसंगस्य फलस्नेहरहितस्य स्वातंत्र्याभिमानाच्छरीराभिमानाद्वा मुक्तस्य । मुक्तसदृशस्य वा ज्ञानावस्थितचेतसः परमेश्वरज्ञाननिष्ठचितस्य यज्ञाय भगवते आचरतः कर्म समग्रं प्रविलीयते बंधकं न भवति । उक्तंच । एवं नृणां क्रिया योगाः सर्वे संसृति हेतवः । तएवात्म विनाशाय कल्पंते कल्पिताः परइति २३

फलस्नेहरहित किंवा शरीराभिमानरहित असा परमात्मा सर्वोत्तम असून, आपण त्या परमात्म्याचे सदैव स्वाधीन आहों असें जाणून, परमात्म्याचे प्रीति करितांच कर्म करणारा जो, त्यास तीं सर्व कर्में बंधनकारक होत नाहींत. २३

ब्रह्मार्पणं ब्रम्ह हविर्ब्रम्हाग्नौ ब्रम्हणा हुतम् ।
ब्रम्हैव तेन गंतव्यं ब्रम्हकर्मसमाधिना ॥ २४ ॥

कीदृशं परमेश्वरज्ञानम् कथं वाऽभिमानत्यागः किं यज्ञार्थमित्यत आह । ब्रह्मार्पणमिति । अर्प्यतेऽनेनेत्यर्पणं जुव्हादिब्रह्म हविर्ब्रह्म ब्रह्मण्येवाग्नौ ब्रह्मणाकर्त्रा हुतं । तेन ब्रह्मैव गंतव्यं प्राप्यं समाधिना सह कर्मापि ब्रह्मेत्यर्थः । तदधीनत्वेन सर्वं ब्रह्मेत्युच्यते । न तु तत्स्वरूपत्वेन तदुक्तम् । त्वदधीनं यतः सर्वमतः सर्वभवानिति । वदंति मुनयः सर्वे नतु सर्व स्वरूपत इति । अथवा ब्रह्मण्यर्पणं ब्रह्मणो हविः ब्रह्मणोग्नौ ब्रह्मणः कर्म समाधिनासह समाधिरपि तदधीन इत्यर्थः । अनेन सर्वस्य ब्रह्माधीनत्वेन ब्रह्मणः स्वातंत्र्य ज्ञानं भगवज्ज्ञानं स्वस्यास्वातंत्र्यज्ञानं अभिमानत्यागः ब्रह्मार्पणं यज्ञार्थत्वमित्युक्तम् भवति ॥ २४ ॥

ईश्वर ज्ञान ह्मणजे काय? किंवा अभिमानाचा त्याग करणें ह्मणजे काय? व यज्ञार्थ कर्म कोणतें? याविषयीं सांगतातः—ब्रह्म ह्मणजे अनंतगुण-

परिपूर्ण जडजीवात्मक प्रपंचापासून विलक्षण ( भिन्न ) मुक्त आणि अमुक्त यांचें नियमन करणारें असें; तें नारायणरूप होय. त्यास कर्म अर्पण करणें किंवा होम करण्याला साधन अशीं जीं स्रुवादिक व हविष्य द्रव्यें व तीं जेथें हवन करावयाचीं तो अग्नि, हीं सर्व ब्रह्माचे स्वाधीन आहेत असें समजणें व हवनही त्याच्याच अधीन आहे असें जाणतो; किंवा ज्याचें कर्म व समाधि-योगही ब्रह्मनिमित्तक आहेत, असा ज्ञानी ब्रह्म ( विष्णु ) लोकास जातो. तात्पर्य, हविष्यादि सर्व पदार्थ हे आपल्या स्वाधीन नसून केवळ परमात्म्याचे स्वाधीन आहेत. तोच ( ब्रह्म ) परमात्मा मजकडून हें यज्ञादिक कर्म करवितो व मी त्याच्याच प्रेरणेनें, त्याला संतोष व्हावा ह्मणून हें सर्व सत्कर्म करितों असें जो समजतो त्याला ब्रह्म ( विष्णु ) पदाची प्राप्ति होते. ॥ २४ ॥

**दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।**
**ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ २५ ॥**

एतत्प्रपंचनपूर्वकमाश्रमचतुष्टयस्यापि यज्ञोस्तीति ज्ञापयितुं यज्ञ-भेदानाह । दैवमित्यादिना । दैवं भगवंतं । यज्ञमिति क्रियाविशेषणम् । भगवदुपासनमेव यतीनां यज्ञइत्यर्थः । यद्वा स्वरूपमेवानंदादि हविः स्वयमेवाग्निर्भगवान् भुङ्क्तइति यज्ञः । यज्ञं संतं विष्णुमुपासते विष्णु-रेव यज्ञः । तस्य तथोपासनं यज्ञकरणमित्युक्तं भवति । उक्तंच । ते नैव तं पूजयेद्वा विहितैर्वान्यसाधनैः। स एव विष्णोर्यज्ञः स्यान्मानसो-वाथबाह्यकइति । ब्रह्मण्यग्नौ यज्ञं भगवंतं प्रसिद्धेन यज्ञेनोपजुह्वति । यथादध्ना जुहोतीत्यत्र दधिप्रक्षेपेण होमनिष्पत्तिस्तथा त्रापि यज्ञार्पणे-नेत्यर्थः । यद्वा क्रियायज्ञं यज्ञेन विष्णुना हेतुना सर्वं तदधीनमिति ज्ञात्वा समर्पयंति ॥ २५ ॥

हें सर्व विस्तारानें सांगावें ह्मणून, ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास या चारही आश्रमांस यज्ञ करणें विहित आहे ह्मणून, यज्ञाचे प्रकार सांगतातः–कित्येक यती परामात्मा हाच यज्ञ होय असें समजून उपासना करितात. त्यांस ईश्वराची उपासना करणें याशिवाय इतर यज्ञ ह्मणून नाहीं. कित्येक गृहस्थ प्रसिद्ध यज्ञ करून ब्रह्मरूप अग्नीचेठायीं ब्रह्मप्रीत्यर्थ लौकिक

यज्ञ ( यजन ) प्रसिद्ध यज्ञास हविष्य असी कल्पना करून तेथेंच ( होम ) समर्पण करितात हा एक यज्ञ होय. ॥ २५ ॥

**श्रोत्रादीनींद्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति ।**
**शब्दादीन्विषयानन्य इन्द्रियाग्निषु जुह्वति ॥ २६ ॥**

तत्पूजात्वेन प्रत्याहारात् श्रोत्रादिनिग्रहं कुर्वंति । तत्पूजात्वेन विषयान् भुंजते ॥ २६ ॥

कोणी श्रोत्रादिक इंद्रियांचा इंद्रियनिग्रहरूप अग्नि कल्पून त्या अग्नीवर होम करितात व हीच परमात्म्याची पूजा असें समजतात; कोणी शब्दादि विषयांचा ( शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध, हे शब्दादि पांच विषय ) इंद्रियाग्नीवर होम करून इंद्रियांनीं विषयांचा उपभोग करतात व हीच त्या परमात्म्याची पूजा असें समजतात. ॥ २६ ॥

**सर्वाणीन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।**
**आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ २७ ॥**

तत्पूजात्वेनैवेंद्रियादिव्यापारान् आत्मनो मनसः आत्मसंयमाख्योयोगउपायः स एवाग्निस्तस्मिन् जुव्हति । विष्णवधीनत्वज्ञानं सर्वत्रावश्यकम् ॥ २७ ॥

कोणी, सर्व इंद्रियकर्मव्यापारांचा व प्राणापानादिक वायूंचे व्यापारांचा ज्ञानानें प्रदीप्त झालेल्या मनोनिग्रहरूप अग्नीवर होम करितात; ह्मणजे मनानें सर्व इंद्रियें व प्राण यांचा निरोध करतात. त्यांच्या वृत्ति स्वाधीन ठेवितात. सर्वत्र भगवदधीनत्व जाणणें आवश्यक आहे. ॥ २७ ॥

**द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथाऽपरे ।**
**स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ २८ ॥**

द्रव्यं जुव्हतीति द्रव्ययज्ञाः । तपः परमेश्वरार्पणबुध्या तत्र जुव्हतीति तपोयज्ञाः एवं योगयज्ञाः स्वाध्याययज्ञाः ज्ञानयज्ञाश्च । यतयः प्रयतमानाः । सम्यक् शितं तीक्ष्णं व्रतं येषां ते संशितव्रताः २८

कित्येक योगी घृतादि द्रव्यानें हवन करितात; कित्येक तपश्चर्या करून तिचें परमात्म्याचे ठायीं हवन करितात; कित्येक योगाभ्यासरूप हवन करितात. कित्येक प्रयत्न करणारे व अत्यंत कठीण ( दृढ ) व्रतें करणारे व कित्येक वेदाध्ययन करणारे त्या त्या व्रतांचें व अध्ययनाचें परमेश्वराचेठायीं हवन करितात व कित्येक ज्ञानयोगानें हवन करितात. ॥ २८ ॥

**अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथापरे ।**
**प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥ २९ ॥**

अपरे प्राणनियमनतत्पराः प्राणापानगतीरुध्वा प्राणमपाने जुव्हति । अपानं च प्राणे कुंभकस्था एव भवंतीत्यर्थः ॥ २९ ॥

कित्येक प्राणायामाचा अभ्यास करून, शरीरांतील अधोगमन करणाऱ्या अपानवायूचे ठिकाणीं प्राणवायूचा होम करितात, ह्मणजे रेचक, पूरक रीतीनें वायूचा निरोध करून कुंभकरूप धारणा करितात. दुसरे कित्येक प्राणवायूमध्यें अपानवायूचा, तसेंच प्राण आणि अपानवायूचा निरोध करितात. ॥ २९ ॥

**अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति ।**
**सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥**

नियताहारत्वेनेंद्रियेषु तद्वृत्तिसंकोचात्प्राणान् प्राणेषुजुव्हति । यदस्याल्पाशनं तेन प्राणाः प्राणेषु वैहुता इति वचनात् । यच्छेद्वाङ्मनसीप्राज्ञइत्यादिश्रुत्युक्तप्रकारेणावराणामिंद्रियदेवताना मुक्तमेंद्रियदेवता नियतत्वचिंतनात्त्विद्रियाणामिंद्रियेषु होमः । अस्मिन्पक्षे नियताहाराइति पृथग्यज्ञो ज्ञातव्यः । एवं यज्ञभेदान् ज्ञात्वा अनुतिष्ठतां फलमाह सर्वेपीति ॥ ३० ॥

कित्येक नियमित आहार ठेवून इंद्रियवृत्तीला इंद्रियांचेठायीं हवन करितात; हे सर्व यज्ञानुष्ठानानें दोषरहित होऊन, यज्ञ नामक परमात्मा, सर्वांतर्यामी आहे असें समजतात. इंद्रियाभिमानी कनिष्ठ देव त्या इंद्रियाभिमानी उच्च देवतांच्या आधीन आहेत असें समजणें हाच इंद्रिय होम होय. ॥ ३० ॥

**यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रम्ह सनातनम् ।**
**नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥ ३१ ॥**

यज्ञाकरणे दोषमाह नायमिति । अयमल्पसुखोऽपि मनुष्यलोकः अयज्ञस्य यज्ञानुष्ठानशून्यस्य नास्ति कुतोऽन्यः स्वर्गादिः अतोयज्ञाः सर्वथा कर्तव्याइत्यर्थः ॥ ३१ ॥

यज्ञ केल्याचें फळ काय व तो न केल्यानें दोष कोणता, तें सांगतातः—हे कुरुकुलोत्पन्ना अर्जुना, अमृत ह्मणजे यज्ञ करून राहिलेलें शेष त्याचें भोजन करणारे अविनाशी अशा ब्रह्मलोकांत जातात. जे कोणी आपल्या योग्यतेप्रमाणें हे यज्ञ करीत नाहींत, त्यांस अल्प सुख प्राप्य असा हा मनुष्य लोकही मिळत नाहीं. तर, जो पुष्कळ सुख देणारा परलोक तो कोठून प्राप्त होणार? होणार नाहीं. याकरितां आपापल्या योग्यतेप्रमाणें यज्ञ करून, त्याच्या फळाविषयीं निरिच्छ होऊन, तो यज्ञ श्रीहरी परमात्म्याला अर्पण करणें हें योग्य होय. ॥ ३१ ॥

**एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।**
**कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥३२॥**

उक्तान् यज्ञभेदानुपसंहरति । एवमिति । श्रोत्रादीनित्यादिष्वीज्यानुक्तेरीज्योऽन्यइति शंकास्याशां वारयति । विततान्रह्मणोमुखइति । ब्रह्मणः परमात्मनोमुखे विततइति सर्वयज्ञभोक्तृत्वाद्विष्णवाख्यं ब्रह्मैव यज्ञैरीज्यत इत्यर्थः । यद्येवमनेके यज्ञास्तर्हि ज्ञानादियज्ञेनैवालं किं कर्मात्मकेन युद्धेनेत्यत आह । कर्मजानिति । मानासिकवाचिककायिक कर्मजानित्यर्थः । ततः किमित्यत आह । एवमिति । यदि सर्वेऽपि यज्ञाः कर्मजाइति जानासि तर्हि ततोविशेषाभावात् स्वविहितयुद्धादिकं करिष्यसि ततो मुक्तोभविष्यसि कर्मजत्वेनज्ञानाभावे युद्धादिकं परित्यज्य मोक्षार्थं ज्ञानादिकमेवानुतिष्ठतो भवतोविहितातिक्रमादनर्थएव स्यान्न मोक्ष इत्याशयः विमोक्षसे इतिपाठे सन्नंतान्मुचः कर्मकर्तरि । यद्वा मोक्षे कर्मीभूतस्यैवात्मनः कर्तृत्वादेवंज्ञात्वा यदि सर्वेऽपियज्ञाः

कर्मजाइति जानासि तर्हि तानि युद्धादीनिस्वविहितानि कर्माणि कृत्वैव मोक्षसे संसारादात्मानं मोक्तुं इच्छासि। सर्वेषां कर्मजत्वज्ञाने तवैव मोक्षार्थं युद्धादिकं कर्तव्यमितीच्छा भविष्यतीत्यर्थः ॥ ३२ ॥

ह्या सर्व यज्ञांचा भोक्ता **श्रीनारायण** आहे असें सांगितलें; आतां अनेक प्रकारचे यज्ञ असतांनां ते करण्याचें सोडून मी युद्धच कां करावें? अशी अर्जुनास शंका येईल तिचें निरसन करितातः–हे ( मागें सांगितलेले ) अनेक प्रकारचे यज्ञ वेदमुखानें प्रसिद्ध झाले आहेत; ह्मणजे वेदांनीं ते विहित मानिले आहेत; परंतु, ते कायिक, वाचिक, मानसिक कर्मापासून उत्पन्न होतात, असें समजून, तूं स्वधर्मोचित ( युद्धरूपी ) यज्ञ करून, तो मला अर्पण केल्यानें मुक्त होशील. तुझ्या धर्माला उचित अशा युद्धाचा त्याग करून, इतर रीतीनें उपासना करशील तर, तूं आपल्या धर्माचा त्याग केल्यासारखें होईल; तो तूं कदापि करूं नकोस; तूं क्षात्रकुलोत्पन्न असल्यामुळें तुला युद्ध केल्याशिवाय मुक्ति नाहीं. ॥ ३२ ॥

**श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परन्तप ।**
**सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥**

उक्तेषु यज्ञेषु को यज्ञः श्रेष्ठ इति जिज्ञासायामाह। श्रेयानिति। द्रव्यमयादिति यज्ञांतराणामप्युपलक्षणार्थं श्रेष्ठत्वेहेतुः सर्वमिति। सर्वं कर्म अखिलं तांध्यायेद्भषट्करिष्यन्नित्याद्युपासनाद्यंगसहितं ज्ञाने ज्ञानोत्पत्तौ परिसमाप्यते उपक्षीणं भवति। ज्ञानफलमेवेत्यर्थः। अथवा आसमंतात्खिलं अल्पं ज्ञाने जाते परिसमाप्यते पूर्यते ज्ञानिना कृतमल्पमपि कर्म संपूर्णफलं भवतीत्यर्थः। उक्तंच। अल्पमात्रकृतो धर्मो भवेज्ज्ञानवतो महान्। महानपिकृतोधर्मो ह्यज्ञाना न्निष्फलो भवेदिति ॥ ३३ ॥

पूर्वीं सांगितलेल्या सर्व यज्ञांमध्यें कोणता यज्ञ श्रेष्ठ आहे तें सांगतातः— हे शत्रुसंहारका पृथापुत्रा **अर्जुना**, द्रव्ययज्ञापेक्षां ज्ञानयज्ञ श्रेष्ठ होय. कारण, सर्व कर्मे ज्ञानयज्ञानेंच सफल होतात; अथवा, कर्म हें अल्पसुखाचें साधन आहे परंतु तेंच ज्ञानानें विशिष्ट सुखाला साधन होतें; कारण, कर्मरूप-धर्म

अल्प असला तरी, ज्ञान्याला विशिष्ट फल देणारा होतो; परंतु मोठा कर्मरूप-धर्म असला तरी, ज्याला श्रीहरीचें ज्ञान नाहीं. अशाला तो निष्फळच होतो. ॥ ३३ ॥

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥**

कर्मणोज्ञानमधिकमित्युक्त्वा तद्वेदनम् संपादयेत्याह । तदिति । दंडप्रणामादिना प्रपन्नस्य गुरूपदेशो ज्ञानसाधनं । भगवतैवोपदिष्टत्वा दुपदेक्ष्यमाणत्वाच्च सएवात्रानेकरूपः परोक्षतया निर्दिश्यते । अर्जुनस्य ज्ञानित्वा दुत्पन्नज्ञानतिरोभावनिवृत्त्यर्थमुपदेशः ॥ ३४ ॥

कर्मापेक्षां ज्ञानाची योग्यता अधिक आहे, ह्मणून तें ज्ञान कसें संपादन करावें तें सांगतातः—तें अपरोक्ष ज्ञान गुरूला संतोष होईल अशी सेवा केल्यानें, किंवा त्यांना साष्टांग प्रणिपात केल्यानें, अथवा सविनय प्रश्न केल्यानें, ते अपरोक्षज्ञानी ( गुरू ) माझ्याकडून प्रेरित होऊन, तुला ( ज्ञानाचा ) उपदेश करतील. ॥ ३४ ॥

**यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पाण्डव ।**
**येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ ३५ ॥**

मदुपदेशानंतरं ज्ञानस्यतिरोभावोनभविष्यति तेनाशेषतत्वार्थावगतिश्च भवतीत्याह । यदिति । येन ज्ञानेन मय्यात्मनि नियामके सति सर्वाणिभूतान्यशेषेण कार्त्स्न्येन अथो तस्मात् मोहनाशात् द्रक्ष्यसि । यद्वा आत्मनि व्याप्ते मयि अथो तस्माद्व्याप्तत्वादेव द्रक्ष्यसीत्यर्थः ॥ ३५ ॥

मी उपदेश केलेल्या या ज्ञानाचा कधींही नाश होत नसून, तुला बाकी राहिलेलें ज्ञानही होईल अशा अर्थानें सांगतातः—हे पंडुपुत्रा अर्जुना, जें ज्ञान तूं जाणलेंस ह्मणजे आतांसारखा पुन्हां बांधवादिकांच्या वधरूप मोहांत पडणार नाहींस, कां कीं, त्या ज्ञानाचे योगानें तूं पहाशील कीं, सर्वव्यापक किंवा सर्वप्रेरक जो मीं त्या माझेठायीं सर्व भूतें आश्रय करून असतात; असें समज. ॥ ३५ ॥

**अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।**
**सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं सन्तरिष्यसि ॥ ३६ ॥**

कारणभूतंज्ञानं पुनस्तौति । अपिचेत्यादि श्लोकत्रयेण । पापेभ्यः पापकृद्भ्योपि पापकृत्तमः अतिशयेन पापकृत्तमः अतिशयेन पापकारी असि चेत्तथापि सर्वं वृजिनं पापं ज्ञानप्लवेन ज्ञानाख्येन योगेनैव सम्यक् तरिष्यसि ॥ ३६ ॥

' अपिचेत्यादि ' तीन श्लोकांनीं कारणभूत ज्ञानाची पुनः स्तुति करितातः–सर्व पाप्यांमध्यें तूं जरी अतिशय मोठा पातकी असलास तरी, या अपरोक्षज्ञानाचे योगानें, पापरूप समुद्राला उल्लंघून जाशील. ॥ ३६ ॥

**यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ।**
**ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥ ३७ ॥**

एधांसि दारूणि समिद्धः प्रदीप्तः । भस्मसात् भस्मीभूतानि । सर्वाणि प्रारब्धव्यतिरिक्तानि । कर्माणिक्षपयेद्विष्णुरप्रारब्धानि विद्यया । प्रारब्धानितु भोगेन क्षपयेत्स्वपदं नयन्निति वचनात् ॥ ३७ ॥

हे अर्जुना, जसा प्रदीप्त अग्नि लांकडें जाळून त्यांची राख करून टाकितो, तसा ज्ञानरूपअग्नि प्रारब्धकर्मांवांचून निषिद्ध असलेलीं सर्व कर्में जाळून टाकितो. प्रारब्धकर्म मात्र, भोगल्यानंतर, भगवत्प्रसादानें मुक्ति प्राप्त होते. ॥ ३७ ॥

**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।**
**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति ॥३८॥**

तज्ज्ञानयोगसंसिद्धः सिद्धोपायः कालेन बहुना विंदति प्राप्नोति३८

ह्या लोकांत परलोक प्राप्तीचीं साधनें पुष्कळ आहेत. परंतु आत्मज्ञानासारखें पवित्र असें दुसरें कांहीं नाहीं. तें प्राप्त झालें असतां संसाररूप वज्रापासून रक्षण होतें; ह्मणून तें ज्ञान उपायसिद्ध असलेला पुरुष कांहीं काळानें जाणतो. ॥ ३८ ॥

**श्रद्धावांल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः ।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ॥३९॥**

ज्ञानस्यांतरंगसाधनमाह । श्रद्धावानिति । आस्तिक्यबुद्धिमान् तदेकनिष्ठोजितेंद्रियश्च ज्ञानं लभते । ज्ञानफलमाह ज्ञानमिति । शांतिं-मोक्षम् ॥ ३९ ॥

ज्ञानाचें अंतरंगसाधन सांगतातः—आस्तिक्यबुद्धियुक्त, इंद्रियें स्वाधीन ठेवणारा, आणि भगवंताचे ठिकाणीं निष्ठा ठेवणारा, अशालाच ज्ञानप्राप्ति होते; व तें ज्ञान प्राप्त झाल्यावर, सर्व सुखांत उत्तम असें जें मुक्तिसुख तें त्याला प्राप्त होतें ( मोक्षप्राप्त होतो. ) ॥ ३९ ॥

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ४०**

ज्ञानतत्साधनाभावे तद्विरोधेचानिष्टमाह । अज्ञश्चेति ॥ ४० ॥

परंतु अज्ञानी असून श्रद्धारहित व ज्याचें चित्त सदोदित संशयग्रस्त असतें, असा पुरुष नष्ट होतो. संशयखोरास हा लोक किंवा परलोक प्राप्त होत नाहीं व सुखही होत नाहीं. ॥ ४० ॥

**योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् ।**
**आत्मवंतं न कर्माणि निबध्नंति धनंजय ॥ ४१ ॥**

ज्ञानसाधनमनुवदन् ज्ञानफलं प्रपंचयति । योगेति । योगेन विष्णौ समर्पितं कर्म येन स तथा तं । ज्ञानेन संछिन्नःसंशयो येन स तथा तं । आत्मवंतं परमात्मभक्तम् कर्माणि न निबध्नंति ॥ ४१ ॥

ज्ञानसाधन सांगून त्याचें फळही सांगतातः—हे अर्जुना, ईश्वराचें आराधन करून, कर्म ईश्वरार्पण करणारा, ज्ञानप्राप्तीमुळें ज्याचे सर्व संशय नाहींसे झाले आहेत, अशा आत्मनिष्ठास ( परमेश्वरभक्तास ) कर्में बद्ध करूं शकत नाहींत. ॥ ४१ ॥

अपेक्षा ( इच्छा ) मनानेंच आवरून धरावी; कारण मनाशिवाय ती इच्छा आवरणें, इतर इंद्रियानां शक्य नाहीं. ॥ २४ ॥

**शनैःशनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया ।**
**आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत् ॥२५॥**

बुद्ध्या उपरमेत् विषयेभ्योनिवर्तयेत् । आत्मनि रमेतेतिवा २५

ह्मणून धैर्यानें स्वाधीन करून घेतलेल्या बुद्धीनें आपलें मन, परमात्म्याचेठायीं दृढ करून अभ्यासानें तें हळुहळू विषयांपासून फिरवावें; व परमात्म्याशिवाय कोणतेही विषय अल्पसुद्धां मनांत आणूं नयेत. ॥ २५ ॥

**यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम् ।**
**ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥ २६ ॥**

मध्येअनवस्थितंचेन्मनस्तदा प्रत्याहारेण वशीकुर्यादित्याह । यतइति । यतो यतो यत्र यत्र । अस्थिरं योगसमये चंचलं सत् मनो-निर्गच्छति एतन्मनस्ततोनियम्य प्रत्याहृत्यात्मन्येव वशं नयेत् । आत्मविषयएव वशीकुर्यादित्यर्थः ॥ २६ ॥

एखाद्याचें मन स्थिर न होतां मध्येंच चंचल होत असेल तर, त्याला—मनाला—प्रत्याहार योगानें वश करावें याविषयीं सांगतातः—जें स्वभावतःच चंचळ असलेलें, धैर्यानें आवरून धरलें तरी स्थिर होत नाहीं असें मन, ज्या ज्या विषयांकडे जात असेल त्या त्या विषयांपासून प्रत्याहार योगानें त्याचें आकलन करून, ( स्वाधीन करून ) तें परमात्म्याचेठायीं स्थिर करावें ॥२६॥

**प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।**
**उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ २७ ॥**

एवं सांगयोगमभिधाय तदनुष्ठातुः फलं प्रपंचयति । प्रशांतमनसमिति । विगतरजोदोषं ब्रह्मणिस्थितं एनं योगिनं उत्तमं सुखं कर्तृ स्वयमुपैति ॥ २७ ॥

असें ( वर सांगितलेलें ) योगाचें पूर्ण लक्षण सांगून, त्याप्रमाणें योगसाधन करणारास फळ काय मिळतें तें सांगतातः—शांत झाला आहे

रजोगुण ज्याचा, परमात्म्याचेठायीं स्थिर झालें आहे मन ज्याचें, व त्या परमात्म्याविषयीं अत्यंत पूज्यबुद्धि झाली आहे ज्याची, अशा योग्याला उत्तम प्रकारचें समाधिसुख आपोआप प्राप्त होतें. ॥ २७ ॥

**युंजन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः ॥**
**सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते ॥ २८ ॥**

**तत्सुखं किं प्रयासेनभवति कीदृशं चेत्यतउक्तं प्रपंचयति । युंजन्निति । सुखेनाक्लेशेन भगवत्संसर्गाभिव्यक्तं ॥ २८ ॥**

तें समाधिसुख प्रयत्नानें मिळण्यासारखें आहे किंवा नाहीं? व तें कोणास मिळतें, या विषयीं सांगतातः—या प्रमाणें आपलें मन निरंतर परमात्म्याचेठायीं ठेवून, मनोदोषरहित—निर्दोष—झाल्यावर, ब्रह्माविषयीं अपरोक्षज्ञान ज्यास उत्पन्न झालें आहे, असा ज्ञानी—योगी—सर्वोत्कृष्ट अशा समाधि सुखाचा उपभोग घेतो. ॥ २८ ॥

**सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ॥**
**ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ २९ ॥**

**इदानीं ध्येयमाह । सर्वभूतस्थमित्यादिनासर्वभूतेषु स्थितं परमात्मानं परमेश्वरं सर्वभूतानिचात्मनि परमेश्वरे तं च परमेश्वरं सर्वत्र ब्रह्मतृणादौ ऐश्वर्यादिना साम्येन पश्यतीति समदर्शनः ॥२९॥**

आतां ध्येयाचें स्वरूप सांगतातः—ज्याचें अंतःकरण ध्यानयोगानें युक्त झालें आहे असा योगी, सर्व प्राण्यांचेठायीं नियामकत्वानें परमात्माच आहे असें पहातो; तसेंच परमात्म्याचेठायीं सर्व प्राण्यांस पहातो, म्हणजे ब्रह्मादिदेवांपासून तृणापर्यंत सर्व भूतांचेठायीं नियामकत्वानें असणारी परमात्म्याचीं स्वरूपें, स्वातंत्र्य ऐश्वर्यादिगुणांनीं सम आहेत, असें जाणतो; हें समदर्शन ( सारखें पहाणें ) परमात्म्याच्या अभिन्नांशरूप रामकृष्णादि अवतारांविषयींच आहे; कारण, परमात्म्याच्या स्वरूपांत किंवा त्याच्या स्वरूपांश जे मत्स्यकूर्मादि अवतार त्यांत, भेद आहे असें मानणें हें केवळ अधोगतीला कारण आहे. त्यांवांचून भिन्न असे अंशभूत जीव, त्यांच्या त्यांच्या अनादि योग्यता व

वासना यानीं श्रेष्ठ कनिष्ठ अशा अनेक भेदानीं युक्त आहेत; ह्मणून त्यांस परस्पर समान मानणें हें अनुचित होय; किंवा, अल्पज्ञ, परतंत्र, अपूर्ण, अवरत्वादि अनेक दोषयुक्त जीवांला व नित्य मुक्त, सर्वज्ञ, स्वतंत्र इत्यादि सर्व गुणसंपन्न अशा श्रीहरीला समान मानणें हें प्रत्यक्षानुमानागमविरुद्ध असल्यानें तसें मानतां येत नाहीं ॥ २९ ॥

**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ॥**
**तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥३०॥**

अस्य ध्यानविशेषस्य फलमाह । योमामिति । तस्याहं न प्रणश्यामि सर्वदा योगक्षेमवहःस्यामीत्यर्थः । सच मे न प्रणश्यति सर्वदा मद्भक्तोभवति ॥ ३० ॥

ध्यानयोगानें कोणतें विशेष फळ मिळतें तें सांगतातः—जो अधिकारी, सर्व भूतांचे ठायीं मी ( परमेश्वर ) आहें असें पहातो, किंवा सर्व भूतें माझ्याच आश्रयानें आहेत असें पहातो, अशा त्या सत्पुरुषास मी कधींही दूर होत नसून, त्याचा योगक्षेम मींच चालवितों. आणि तो ( सत्पुरुष ) ही माझ्या-ठायीं आसक्त राहून मला विसरत नाहीं. ॥ ३० ॥

**सर्वभूतस्थितं योमां भजत्येकत्वमास्थितः ॥**
**सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥ ३१ ॥**

एतदेवस्पष्टयति । सर्वभूतस्थितमिति । एकत्वमास्थितः सर्वत्रैकएव परमात्मेति स्थितः । सर्वप्रकारेण न्यायेनान्यायेन वर्तमानोमय्येव वर्तते । एवमधर्माचरणेप्यपरोक्षं पश्यतोज्ञानफलं नियतमित्यर्थः । प्रायेण ज्ञानिनां नाधर्मेबुद्धिः प्रामादिकंतु पापं भस्मीभवति । महच्चेदुःखसूचकं भवतीतिभावः । उक्तंच । कदाचिदपिनाधर्मे बुद्धिर्विष्णुदृशां भवेत् । प्रमादात्तुकृतं पापं स्वल्पं भस्मी भविष्यति । आदिराजैस्तथादेवै ऋषिभिः क्रियते कियत् । बाहुल्यात्कर्मणस्तेषां दुःखसूचकमेवतदिति । ३१ ॥

मागील श्लोकांचा अर्थ अधिक स्पष्ट करून सांगतातः—जो अधिकारी, ब्रह्मारंभ करून तृणजीवपर्यंत अशेष जीवनियामकत्वानें असणारा परमात्मा

एकच आहे असें मजला समजतो, तो योगी न्यायानें वागो अथवा अन्यायानें वागो, तो मजवर विश्वास ठेवितो ह्मणून त्यास मोक्ष प्राप्त होण्यास अडचण पडत नाहीं. विष्णुप्रिय अशा विष्णुभक्तांस अधर्माचरण करण्याची बुद्धि कधींही होत नाहीं. एखाद्या प्रमादानें त्यांचे हातून थोडेंसें पाप घडलें तरी, भगवत्प्रसादानें त्या पापाचें भस्म होतें. तें पाप जास्त केलें तर दुःखसूचक होतें ह्मणून समजावें. ॥ ३१ ॥

**आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।**
**सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥३२॥**

साम्यं प्रकारांतरेण व्याचष्टे । आत्मौपम्येनेति । अतो विष्णवनुवर्तिषु स्ववत्स्नेहः कर्तव्य इत्याशयः ॥ ३२ ॥

या प्रकारानें साम्य सांगतातः–हे अर्जुना, जो मनुष्य जसें आपण सुखी, निरोगी असावें असें इच्छितो त्याप्रमाणें सर्व विष्णुभक्तही दुःखरहित ह्मणजे सुखी असावेत असें ज्याला वाटतें, तो समदर्शी, परम ( मोठा ) योगी होय. ॥ ३२ ॥

अर्जुन उवाच ।

**योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन ।**
**एतस्याहं न पश्यामि चंचलत्वात्स्थितिं स्थिराम् ३३**
**चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ।**
**तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ ३४ ॥**

मनसश्चंचलत्वेन वायोरिव निग्रहीतुमशक्यत्वात् । साम्येनैतस्य योगस्य स्थिरा स्थितिः कर्तुमशक्येत्यर्जुनउवाच । योयमितिद्वाभ्यां ॥ ३३ ॥ ३४ ॥

याप्रमाणें भगवंतांचें बोलणें ऐकून, वर सांगितलेली स्थिति प्राप्त होण्यास फार कठीण असें वाटल्यामुळें अर्जुन प्रश्न करितोः–अर्जुन ह्मणतो, हे मधुसूदना श्रीकृष्णा, तूं जो सर्वत्र समान पाहण्याचा योग सांगितलास, तो

योग माझें मन चंचल असल्यामुळें मजकडून होईल असें वाटत नाहीं. हे कृष्णा, मन हें स्वभावतःच चंचल असल्यामुळें तें, देह व इंद्रियें यांस उच्चाटण ( क्षोभित ) करण्यास समर्थ आहे. जसा आकाशांत संचार करणारा वायु कोणत्याही प्रयत्नानें आवरतां येणें कठीण आहे तसेंच, हें मन आवरून धरणें अत्यंत दुःसाध्य होय. ॥ ३३ ॥ ३४ ॥

श्री भगवानुवाच ।

**असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।**
**अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥ ३५ ॥**

यद्यपि मनोनिगृहीतुमशक्यं तथाप्यभ्यासवैराग्याभ्यां तन्निरोधः कर्तुं शक्यएवेति । श्रीभगवानुवाच । असंशयमिति ॥ ३५ ॥

जरी मन हें आवरून धरण्यास कठीण आहे, तथापि अभ्यास व वैराग्यानें त्याचा निग्रह करितां येतो, अशा अभिप्रायानें श्रीकृष्ण बोलतातः— भगवान् ह्मणतात हे अर्जुना, मन हें स्वभावतःच चंचल असल्यानें तें आवरणें अशक्य आहे, असें तूं ह्मणतोस, तें बरोबर आहे; परंतु निरंतर ध्यानाभ्यास केल्यानें किंवा वैराग्यानें तें आवरून धरितां येतें. ॥ ३५ ॥

**असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः ।**
**वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥ ३६ ॥**

यथा मत्तमातंगः स्वयमेव श्रांतः शांतो भवति तथा विषयैस्तृप्तं मनः कदाचित्स्वयमेव नियतं भवति किमभ्यासादिनेत्यतआह । असंयतात्मनेति । अवशीकृतचित्तेन योगः सर्वात्मना मनोवृत्तिनिरोधः । विषयैर्मनसोभिवृद्धिरेव न कदाचिच्छांतिरित्याशयः । उक्तंच । न जातु कामः कामानामुपभोगेनशाम्यति । हविषा कृष्णवर्त्मेव भूयएवाभिवर्धतइति ॥ ३६ ॥

ज्याप्रमाणें हत्ती मदांध होऊन श्रम पावतो व नंतर स्वतःच शांत होतो, तसें विषयोपभोगानें तृप्त झालेलें मन, स्वतःच शांत होतें. मग या अभ्यासादिकांचें कारण काय? अशी शंका येईल तिचें निवारण करितातः—

ज्याचे चित्ताचा निग्रह झालेला नाहीं, अशा पुरुषाला ध्यानयोग साधणें अशक्य आहे. अभ्यास किंवा वैराग्य इत्यादिकानें चित्त वश झालें असेल तर त्यास ध्यानयोग हा सुलभ उपाय होय, असें मला खरोखर वाटतें. विषयोपभोग सेवनानें मनाची शांति न होतां त्याची तृष्णा अधिकच वाढतें. हविर्भाग दिल्यानें अग्नि जसा प्रदीप्त होतो, तो हविर्भागानें कधींही शांत होत नाहीं, तसें मन हें विषयोपभोगानें कधींही शांत होत नाहीं. ह्मणून वैराग्यानेंच मनाची शांति करावी. ॥ ३७ ॥

अर्जुन उवाच ।

**अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः ।**
**अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ।३७।**

योगभ्रष्टस्य गतिं जिज्ञासुरर्जुनउवाच । अयतिरिति । अयतिरप्रयत्नःश्रद्धयोपेतः आस्तिक्यबुध्यायुक्तः योगस्य संसिद्धिं संपूर्तिमप्राप्य ॥ ३७ ॥

अशा तऱ्हेचा दुःसाध्य असा योग, आरंभ केल्यानंतर एखादा अल्पमति त्या योगापासून भ्रष्ट झाला तर त्याला कोणती गति मिळते तें समजावें ह्मणून अर्जुन प्रश्न करितो:–हे भगवान् श्रीकृष्णा, आस्तिक्यबुद्धीनें युक्त असून केवळ प्रयत्नरहित झाल्यामुळें एखादा त्या योगापासून चंचल चित्त होऊन भ्रष्ट झाला तर त्याला योगसिद्धि ( योगाचें फल–मोक्ष. ) प्राप्त होत नाहीं तर त्याला कोणती गति प्राप्त होते ? ॥ ३७ ॥

**कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति ।**
**अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ॥ ३८ ॥**
**एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः ।**
**त्वदन्यः संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते ॥ ३९ ॥**

वायुनाद्वेधाकृतमेघइव किं नश्यति आहोस्वि न्न नश्यति । अप्रतिष्ठोनिराश्रयः ॥ ३८ ॥ ३९ ॥

हे महाबाहो श्रीकृष्णा, निराश्रय होऊन प्रवृत्ति किंवा निवृत्ति मार्गाची

ज्यास आसक्ति नाहीं असा—या दोन्ही मार्गांपासून भ्रष्ट झालेला—असा आकाशांत असणारा मेघसमुदाय जसा वाऱ्याच्या योगानें वितळून जातो त्याप्रमाणें तो ( योगभ्रष्ट ) मोक्षमार्गाविषयीं विमूढ होऊन नष्ट होतो किंवा नाहीं, याविषयीं मला समजेल असें सांग ! हे श्रीकृष्णा, या योगभ्रष्टास कोणती गति प्राप्त होते याविषयीं मीं संशयांत आहें; तर तो माझा संशय नाहींसा करण्यास तूंच समर्थ आहेस. तुझ्याशिवाय, हा संशय नाहींसा करण्यास दुसरा कोणीही समर्थ नाहीं. ॥ ३८ ॥ ३९ ॥

श्री भगवानुवाच ।

**पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते ।**
**न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ॥४०॥**

अत्र परिहारं श्रीभगवानुवाच । पार्थेत्यादिना ॥ ४० ॥

वरील शंकेचें निरसन श्रीकृष्ण करितात—श्रीकृष्ण ह्मणतात हे अर्जुना, त्या योगभ्रष्ट अशा योग्याला, उभय मार्ग ( प्रवृत्ति व निवृत्ति ) भ्रष्ट झाल्यानें, या लोकीं पातित्य दोष नाहीं, किंवा परलोकीं नरकप्राप्तीही नाहीं. ज्यानें शुभकर्म केलें आहे असा कोणताही प्राणी दुर्गतीस जात नाहीं. ॥ ४० ॥

**प्राप्य पुण्यकृताँल्लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ।**
**शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥ ४१ ॥**

लोकान्प्राप्य तेषु अनेकेषु संवत्सरेषु उषित्वा ॥ ४१ ॥

अल्प कालांत योगभ्रष्ट झालेला अधिकारी, अश्वमेध यज्ञ केल्यानें प्राप्त होणारे जे स्वर्गादिलोक, तेथें जाऊन, पुष्कळ काळपर्यंत त्या लोकींच वास्तव्य करून, किंचित् सत्कर्म राहिलें ह्मणजे सदाचारी अशा भाग्यवंताच्या कुळांत ( या लोकीं ) जन्म घेतो. ॥ ४१ ॥

**अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ॥**
**एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ॥ ४२ ॥**

ईदृशं शुचीनां श्रीमतां योगिनां वा कुले भवेत् ॥ ४२ ॥

अथवा तो योगी पुष्कळ काळपर्यंत योगाभ्यास करून, त्यापासून

भ्रष्ट झाला असेल तर तो योगनिष्ठ अशा ज्ञान्याच्या कुळांत जन्म घेतो. तेथें मोक्षसाधन करतो. असा जन्म प्राप्त होणें हें दुर्लभ आहे असें समज. ।४२।

**तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।**
**यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ॥ ४३ ॥**

संसिद्धौ योगसंसिसिद्धिविषये ॥ ४३ ॥

हे कुरुकुलोत्पन्ना अर्जुना, उभय कुळांतही जन्म घेतलेला योगी, पूर्वजन्मीं अभ्यास केलेल्या ब्रह्मविषयक बुद्धीनें युक्त होऊन योगप्राप्ति करून घेतो, किंवा त्यायोगानें मोक्षप्राप्तिविषयीं पुन्हा प्रयत्न करितो. ॥ ४३ ॥

**पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ।**
**जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥ ४४ ॥**

ननु कथं योगभ्रष्टस्य पुण्यलोकादिकमित्यत आह । जिज्ञासुरिति । योगस्येति । द्वितीयार्थे षष्ठी । योगं जिज्ञासुरपि ज्ञातव्योमया योगइति । यस्यातीवेच्छा सोपि विधिनिषेधात्मकं शब्दाख्यं ब्रह्मातिवर्ततेऽतिक्रामति परंब्रह्म प्राप्नोतीत्यर्थः ॥ ४४ ॥

योगभ्रष्टाला पुण्यलोकादिकांची प्राप्ति कशी होते तें सांगतातः—आपल्यास योग समजला पाहिजे अशी इच्छा करणारा मनुष्यही, विधिनिषेधापासून दूर होऊन त्यास क्रमशः ज्ञानप्राप्ति होऊन, तो मुक्तिप्रत जातो. तर योगाचें आचरण करणारा मुक्त होईल ह्मणून काय सांगावें ? तो मुक्तच होय; यावरून तो भ्रष्ट झालेला योगी पूर्वाभ्यासरूप संस्कारानें पराधीन होऊन, त्याच योगमार्गांत निरत होतो. ॥ ४४ ॥

**प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः ।**
**अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ ४५ ॥**

योगजिज्ञासामात्रेण परब्रह्मप्राप्तिश्चेद्योगानुष्ठानादिवैयर्थ्यं स्यादित्यतआह । प्रयत्नादिति । योगं जिज्ञासुर्ज्ञात्वा प्रयत्नं करोति ततः संशुद्धकल्मषोयोगी अनेकजन्मभिः संसिद्धः अपरोक्षज्ञानी भूत्वा परां गतिं याति । उक्तंच । अतीव श्रद्धयायुक्तोजिज्ञासुर्विष्णुतत्परः ।

ज्ञात्वा ध्यात्वा तथा दृष्ट्वा जन्मभिर्बहुभिः पुमान् । विशेन्नारायणं देवं नान्यथातु कथंचनेति । यद्वा जिज्ञासुरपि मुच्यते किमुत ज्ञानादिमानिति योज्यं । उक्तंच । मोक्षोपायस्य जिज्ञासुरपि केवलपाठकात् । विशिष्टः किमु तद्विद्वान् किं पुनर्यः सदास्थितइति ॥ ४५ ॥

योगाची इच्छा केली असतांच जर ब्रह्मप्राप्ति होते, तर योगानुष्ठान तरी कशाला करावें? अशी शंका येईल तिचें निरसन करितातः—योग जाणावा अशी इच्छा असून, जास्त प्रयत्नानें, पापरहित होऊन, अनेक जन्म घेऊन त्यांत अपरोक्षज्ञान प्राप्त करून घेऊन, त्या ज्ञानाच्या योगानें उत्तम गति ह्मणजे मोक्ष त्यातें पावतो. योगाची इच्छा झाली ह्मणजे योगाचें अनुष्ठान करितो, त्यामुळें ज्ञान प्राप्त होऊन त्या ज्ञानाच्या योगानें मोक्षप्राप्ति होते. याकरितां योगानुष्ठान अवश्य करावें. ॥ ४५ ॥

**तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।**
**कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥ ४६ ॥**

योगं स्तौति । तपस्विभ्यइति । कृच्छ्रादिचारिभ्यः । योगज्ञानिभ्यः यज्ञादिकारिभ्यः योगी अधिकः । तस्माद्योगी भव ॥४६॥

योगाचें श्रेष्ठत्व सांगतात—हे अर्जुना, कृच्छ्र चांद्रायणादिक तपाचरण करणारापेक्षां ध्यान करणारा योगी श्रेष्ठ; जो ध्यानयोग करीत नसून त्याचा प्रकार मात्र जाणतो, त्यापेक्षां, तो प्रकार जाणून ध्यानयोग करितो तो श्रेष्ठ; यज्ञादिक कर्म करणारापेक्षां ध्यानयोगनिष्ठ असा योगी श्रेष्ठ आहे असें समज; ह्मणून तूं ध्यानयोगनिष्ठ होऊन तो योग स्वतः कर. ( तूं योगी हो. ) ४६

**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना ।**
**श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः॥ ४७॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सुब्रह्मविद्यायां**
**संन्यासयोगो नाम षष्ठोऽध्यायः ॥६॥**

योगेष्वपि तारतम्यमाह । योगिनामिति । सर्वेषामपि योगिनां

मध्ये श्रद्धाशब्दोदित मद्भक्तिमान् यः स एव युक्तोमतः । तत्रापि यो मां भजते स युक्ततरोमतः । तत्रापि मद्गतेनांतरात्मना फलकामनां विना यो मां भजते स युक्ततमोमतः । तदुक्तम् । तपसश्चैवयज्ञादेर्ध्यानमेव विशिष्यते । अज्ञानिध्यानतोज्ञानं ध्यानं सज्ञानमप्यतः । तत्रापि मय्य-भक्तस्य नान्यंज्ञानं प्रयोजकं । अन्यसामान्य विद्योमेयश्चान्यन्नेति पश्यति । अवरत्वद्दगुदासीनोविद्वेषीचेत्यभक्तयः । मद्भक्तोपिहिकार्यार्थे योध्यायेदन्यदेवताः । परिवारतामृतेतस्मात्केवलं मदुपासकः । वरो-न्यान्मदधीनांश्च सर्वान् जानन्सशुद्धधीरिति ॥ ४७ ॥

इति श्रीमद्भगवद्गीताविवृतौ विद्याधिराजभट्टो-
पाध्यायविरचितायाम् श्रीमध्वमतानुवर्तिनी
व्याख्योपेतायाम् षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

आतां त्या योगांतही तारतम्य आहे ह्मणून सांगतात-ध्यानयोग कर-णाऱ्या योग्यांमध्यें, जो माझें भजन करीत नसून, केवळ फलाच्या इच्छेनें माझी भक्ति करणारा, तो अधम योगी होय; जो भक्तियुक्त असून फलाच्या इच्छेनें माझें भजन करणारा असतो तो मध्यम योगी होय; जो फलाच्या इच्छेचा त्याग करून, माझे ठायीं भक्तियुक्त सेवन करणारा तो उत्तम योगी होय; या तिघांपैकीं जो माझी भक्ति करीत नसून माझ्याशिवाय अन्य देवतांची भक्ति करीत असतो ती निष्फळ जाणावी. माझे भक्त झाले तरी, कार्यपरत्वें सर्व देव माझे आज्ञाधारक आहेत असें जाणून जो त्यांची सेवा करितो, तो यथोक्त फळ पावतो. केवळ माझ्यासारखे किंवा माझ्यापेक्षां श्रेष्ठ दुसरी कोणतीही वस्तु ब्रह्मरुद्राद्यखिल जीवगणादि प्रपंचांत नाहीं असें जाणून, मलाच सर्वोत्तमत्वाद्यखिल सद्गुणसंपन्नत्वानें पहातो, तो योगी शुद्धबुद्धीचा ह्मणून उत्तम जाणावा; असें असतां, सर्व जीवादि प्रपंचाला ऐक्य किंवा ब्रह्मरुद्रादि देवांस माझेसमान मानणें, हें केवळ नित्य दुःखात्मक अधोगतीस साधन असून, अज्ञानाचें द्योतक आहे असें जाणावें. ॥ ४७ ॥

येथें श्रीमदिन्दिराकान्ततीर्थ श्रीपादविरचित प्राकृत टीकेचा
सहावा अध्याय समाप्त झाला.

# अथ सप्तमोऽध्यायः

श्रीभगवानुवाच ।

**मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन्मदाश्रयः ।**
**असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥ १ ॥**

**श्रीगुरुभ्योनमः । ज्ञानसाधनं प्राधान्येनोक्तमतीतैरध्यायैः षड्भिः । षष्ठांते प्रस्तुतभक्त्युत्पादनार्थं भगवन्माहात्म्यं प्राधान्येनोच्यतेऽस्मिन्नध्याये । तत्र तावच्छ्रोतारमभिमुखीकुर्वन् भगवान् ज्ञानं वक्तुं प्रतिजानीते मयीतिद्वाभ्यां । आसक्तमनाः अतीव स्नेहयुक्तमनाः योगं युंजन् ज्ञानोपायमनुतिष्ठन् मदाश्रयः भगवानेवमया सर्वंकारयति स एव मे शरणं तस्मिन्नेवाहं स्थितइति स्थितः । संशयंविना त्वं च समग्रं यथा मां ज्ञास्यासि तत् श्रुणु ॥ १ ॥**

मागील सहा अध्यायांत मुख्यत्वें करून ज्ञानसाधनाचें निरूपण करून, सहाव्या अध्यायाचे शेवटीं, लोकांत उक्त भक्ति उत्पन्न व्हावी ह्मणून भगवन्माहात्म्याचें केलेलें वर्णन या अध्यायांत पुढें सांगतात; आतां, ऐकणारा जो **अर्जुन** त्यास उद्देशून, मी भगवज्ज्ञान सांगतों अशी प्रतिज्ञा करितातः—हे **अर्जुना,** माझा आश्रय करून, सर्व कर्म करविणारा श्रीहरी परमात्मा असून तोच माझें रक्षण करणारा आहे, असें समजून, माझ्याठायीं अत्यंत स्नेहयुक्त मन ठेवून, कर्म व ध्यानयोग करणारा होऊन कर्मरहित ज्ञानानें तो ( ज्ञानी ) जसा मला जाणतो, त्याप्रमाणें तुझ्या योग्यतेस योग्य असें ज्ञान मी तुला सांगतों. ऐक; ॥ १ ॥

**ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः ।**
**यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ २ ॥**

**इदं मद्विषयं ज्ञानं सामान्यज्ञानं सविज्ञानं विशेषज्ञान सहितं वक्ष्यामि यज्ज्ञात्वा पुनरन्यत् ज्ञातव्यं नावशिष्टं समस्तमपि ज्ञातप्रायमेव ॥ २ ॥**

आतांपर्यंत सांगितलेलें जें सामान्य ज्ञान त्याचेंच विशेष रीतीनें विवेचन करितातः—जें जाणलें असतां पुनः या लोकांत जाणण्याची दुसरी वस्तु ह्मणून रहात नाहीं, अशा प्रकारचें हें माझें विज्ञान ऐक. ॥ २ ॥

**मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।**
**यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥ ३ ॥**

**प्रतिज्ञातज्ञाने लिप्सामुत्पादयितुं तस्य दुर्लभत्वमाह । मनुष्याणामिति । कश्चित्पुण्यवान् पुरुषः सिद्धये ज्ञानाय यतते । सिद्धानां सहस्रेषु कश्चिदेव भगवत्कृपावान् तत्वतोयाथार्थ्येन वेत्ति ॥ ३ ॥**

प्रतिज्ञात ज्ञानाविषयीं लोकांस इच्छा उत्पन्न व्हावी याकरितां, तें ज्ञान दुर्लभ ह्मणून सांगतातः—सहस्रावधि मनुष्यांत त्या ज्ञानप्राप्तीचा प्रयत्न करणारा एखादा पुण्यवान् मनुष्य असतो; त्या प्रयत्न करणाऱ्या सहस्रावधि सिद्ध मनुष्यांत एखादा पुण्यवान् माझ्या कृपेला पात्र होऊन, मला सर्वोत्तमत्वादिकेंकरून यथार्थ जाणतो. ॥ ३ ॥

**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।**
**अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥**

**प्रतिज्ञातं ज्ञानमाह । भूमिरित्यादिना । महतोहंकारएवांतर्भावः । पृथिव्यादिकार्यरूपेण प्रकृतिरष्टधाभिन्नेत्यर्थः ॥ ४ ॥**

प्रतिज्ञात ज्ञानाचें वर्णन करितातः—माझ्याहून भिन्न अशा जड प्रकृतीचे आठ प्रकारचे भेद आहेत ते असेः—पृथ्वी, उदक, अग्नि, वायु, आकाश, मन, बुद्धि आणि अहंकार; महत्तत्वाचा, अहंकार तत्वांतच अंतर्भाव आहे. ४

**अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।**
**जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५ ॥**

**अपरां वक्ष्यमाणामपेक्ष्यानुत्तमा । जडत्वादित्यर्थः । परामुत्तमां जीवभूतां जीवानां प्राणधारिणीं चिद्रूपभूतां सर्वदाविद्यमानां नित्यां श्रियं विद्धि । परत्वे हेतुः । ययेति । मे शब्दाभ्यामुभयोः प्रकृत्योर्भगवद्वशत्वमाचष्टे ॥ ५ ॥**

हे महाबाहो अर्जुना, पूर्वी सांगितलेली जड प्रकृति ही, वक्ष्यमाण चित्प्रकृति ( भगवत्परिग्रहरूप लक्ष्मी ) पेक्षां कनिष्ठ आहे. आणि ब्रह्मरुद्रादि सुरगणांहून श्रेष्ठ, व सर्व जीवांला प्राणधारणभूत असून माझ्या स्वाधीन असणारी चित्प्रकृति लक्ष्मी, सर्वदा विद्यमान आहे असें जाण; जिनें ( ज्या चित्प्रकृतीनें ) हें सुरासुर नरादिजगत् धारण केलें आहे. ॥ ५ ॥

**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।**
**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥**

**तयोरेव कारणत्वाच्छरीरेंद्रियविषयलक्षणस्य कार्यस्य जीवानांच यथायोगमंतर्भावइतिदर्शयति । एतद्योनीनीति । भवतु प्रकृत्योर्भगवद्वशत्वं जगज्जन्मादिकं तु ताभ्यामेव भविष्यतीत्यतो जगज्जन्मादिकमपि भगवदधीनसत्ताकमित्याह । अहमिति । प्रभवादेः सतांप्रतीत्यादिकारणत्वात् । पित्रादेः पुत्रादिप्रभव रिपु प्रलयोपलब्धिजनित सुखभोक्तृत्ववज्जगत्प्रभवाद्युपलब्ध्यभिव्यक्तिविशेषवत्सुखभोक्तृत्वाच्च प्रभवइत्याद्युक्तं । भूमिरित्याद्युक्तार्थ प्रमाणं । अचेतनाचेतनेतिद्विविधाप्रकृतिर्मता । त्रिगुणाचेतनातत्रचेतनाश्रीर्हरिप्रिया । ते उभे विष्णुवशगेजगतःकारणेपते । पिताविष्णुः स जगतोमाताश्रीर्यात्वचेतना । उपादानंचजगतःसैवविष्णुबलेरितेति ॥ ६ ॥**

त्यांपैकीं, चित्प्रकृति जी महालक्ष्मी तिच्या आधारानें सर्व ब्रह्मरुद्रादि जीवगण असतात; किंवा शरीरेंद्रिय विषयादि कार्यप्रपंच, भगवत्प्रसादानें जडप्रकृतीपासून होतात; यावरून सर्व भूतें त्या उभय प्रकृतींच्या स्वाधीन आहेत, ह्मणून सांगतात:—त्या उभय प्रकृति भगवंताचे स्वाधीन असल्या तरी जगाची उत्पत्ति वगैरे होणें ती त्या उभय प्रकृतींपासूनच होते, अशी शंका घेऊं नये. कारण, सर्व जगाची उत्पत्ति, स्थिति, संहार, नियमन, ज्ञान, अज्ञान, बंध, मोक्ष इत्यादि सर्व कार्यें, माझ्या स्वाधीन असलेल्या लोकांकडून त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें करवून, मीच क्रीडा करितों. प्रकृति ही, चेतन आणि अचेतन अशा दोन प्रकारची आहे. त्यांमध्यें अचेतन प्रकृति ही त्रिगुणात्मक असून, सर्व जगाला उपादानभूत व मातृस्थानीं आहे. चेतना-

चित्प्रकृति–लक्ष्मी श्रीहरिप्रिया ही श्री भगवंताच्या आज्ञेनें अचेतन प्रकृतीस आपण प्रेरणा करून जगत्सर्जनरूप कार्याविषयीं तयार ( कार्योन्मुख ) करणारी आहे. आणि सर्व जगाला निमित्तकारणीभूत असा, पितृस्थानीं श्रीहरी परमात्माच होय. या उभय प्रकृति ( चेतना व अचेतना ) ह्या त्याच्याच स्वाधीन असतात. ॥ ७ ॥

**मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय ।**
**मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥**

**परापरप्रकृत्योः स्वाधीनत्वोक्त्या स्वस्य परत्वमुक्तप्रायम् । तत्रापरतत्वं यथा भूम्यादिभेदेनानेकं यथाच परतत्वं श्री ब्रह्मादिभेदेनानेकं तथा परतरमपि किमनेकं उतत्वेकमेवेति जिज्ञासायामाह । मत्त इति । मत्तोऽन्यत्परतरं किमपिनास्ति । परतरस्त्वहमेवेत्यर्थः । अथवा कृत्स्नस्यप्रभवइत्यादिकमनेनोपपाद्यते । जडापेक्षया चेतनानां परत्वं तेषामपि श्रीपर्यंतमवरपरत्वं सैवसर्वतः परतरा तस्या अपि परतरोहमेव । नान्योमत्सदृशः । अतोमत्तएव जगत्सृष्ट्यादिकं युक्तमित्याशयः । परस्यान्यस्याभावात्तमबर्थेतरप्रत्ययः । न केवलं प्रभवप्रलयौ मदधीनौ । अपितु स्थितिरपिमदधीनेत्याह । मयीति ॥ ७ ॥**

दोन्ही प्रकृति परमात्म्याचे स्वाधीन आहेत, असें ह्मटल्यानें परमात्मा हा परतर आहे, असा उघड अर्थ होतो. तथापि, अचेतन प्रकृति ही भूमि आदिकरून अनेक प्रकारची निराळी आहे. तशीच चेतन प्रकृति लक्ष्मी, किंवा ब्रह्मरुद्रादि जीव–चेतनसमुदाय–अनेक प्रकारचे आहेत, त्याप्रमाणें श्रीहरी परमात्माही अनेक प्रकारचा असतो, किंवा तो एकच प्रकारचा आहे ? अथवा त्याच्यासमान किंवा त्यापेक्षां अधीक अशा कांहीं वस्तु आहेत किंवा नाहींत ? या शंकेचें स्पष्टपणें निरसन करितातः–हे धनंजया, माझ्या बरोबरीचा अथवा माझ्याहून श्रेष्ठ असा दुसरा कोणीच नाहीं, कारण ब्रह्मरुद्रादि जीवजडात्मक प्रपंच हा, सर्वही माझाच आश्रय करून असतो. या बोलण्यानें दुर्मति प्रवर्तित अभेदाभास ( दुर्मतीनें उत्पन्न केलेला अभेदाभास ह्मणजे जीव व परमेश्वर एकच आहेत असा संशय ) होईल, ह्मणून दृष्टांत सांगून, भेदाचें

( जीव व परमेश्वर यांत भेद आहे ) दृढीकरण करितातः-ज्याप्रमाणें एकाच दोऱ्यांत अनेक मणी ओंवलेले असावेत, त्याप्रमाणें माझ्या आधारानें ब्रह्मरुद्रादि सर्व जगत् आहे. जरी दोरा व मणी हे जडरूप जातिविशेषानें समान आहेत ( दोरा हा जड व मणीही जडच आहेत, ह्मणून ते एकाच जातीचे-जडरूप-आहेत ) तरी, जड असा जो दोरा त्याचा आश्रय जड अशा अनेक मण्यांनीं केला असल्यामुळें, त्या मण्यांपेक्षां दोऱ्याला श्रेष्ठत्व आहे हें उघड दिसतें. तसेच, चेतनत्व जातीनें माझ्या बरोबरीचे श्री, ब्रह्मरुद्रादि देवगण हे आहेत असें कदाचित् असलें तरी, मी जगाचा उत्पत्तिकर्ता वगैरे अशेष शक्तीनें विशिष्ट आहें ह्मणून हे ( ब्रह्मादिक ) माझ्या बरोबरीचे होत नाहींत. असें असतां ते माझ्याहून अधीक ( श्रेष्ठ ) होणारच नाहींत हें कशास सांगावें ? असे हे चेतन जीवगण थोडेसे माझ्यासारखेच आहेत असें भासलें तरी, ते माझ्या बरोबरीचे होतच नाहींत. जातीनें किंवा गुणानें अथवा स्वरूपानेंही अनेक भेदयुक्त असलेला जड प्रपंच तर माझ्या अधीन असणाऱ्या जीवगणांच्या देखील समान होणार नाहीं. हें मंदमति जनांस सुद्धां माहीत आहेच. असें असतां मनास वाटेल तसें ( स्वकपोलकल्पित ) भेदाभास बनवून तोच खरा असें मानून प्रत्यक्षादि प्रमाणावरसुद्धां दृष्टि न देतां सर्व जीवजडाद्यशेष प्रपंचापासून विलक्षण असें परमात्मतत्व आपणच आहों अशी मोठी अनर्थकारक अभेदोपासना करून निरतिशय दुःख प्राप्त करून देणारी अशी आपणास कोणती अधोगति प्राप्त होईल हें समजत नाहींत. ते फुकट फुकट नष्ट होतात, अहाहा ! कष्ट ! ! कष्ट ! ! ! अथवा जडप्रपंचापेक्षां जीव श्रेष्ठ; जीवापासून ब्रह्मापर्यंत आपापल्या योग्यतेप्रमाणें तारतम्यानें एकापेक्षां एक श्रेष्ठ आहेत. त्या सर्वांपेक्षां चित्प्रकृति—भगवद्गृहिणी लक्ष्मी—अति श्रेष्ठ होय. लक्ष्मी आदिकरून जें सर्व जग, त्याचा नियंता परतम असा जो, तो मीच आहें असें समज. ॥ ७ ॥

**रसोऽहमप्सु कौंतेय प्रभास्मि शशिसूर्ययोः ॥**
**प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ८ ॥**

**एवं ज्ञानान्युक्त्वाविज्ञानमाह । रसइत्यादिना । अत्राद्यपेक्षया**

रसादिषु तेषामबादिधर्मत्वेन तद्धर्मेष्वपि सारत्वे रसादित्वेच पृथक् प्रयत्नवान् । विशेषतोरसादिभोक्ता विशेषेण रसादिषु उपास्यश्चेति रसोहमित्याद्युक्तम् । उक्तंच । रसादीनां रसादित्वे स्वभावत्वे तथैवच । सारत्वे सर्वधर्मेषु विशेषेणापिकारणम् । सारभोक्ताच सर्वत्र यतोऽतो-जगदीश्वरः । रसादिमानिनां देहे स सर्वत्र व्यवस्थितइति ॥ ८ ॥

याप्रमाणें ज्ञानाचा प्रकार सांगून आतां विज्ञानाचा प्रकार सांगतातः— हे कुंतिपुत्रा अर्जुना, उदकांत असणारे रस किंवा सूर्यचंद्राची कांति, ह्या माझ्या स्वाधीन असून, तीं माझ्या प्रतिमास्थानींच होत; आकाशांतील शब्दास श्रेष्ठत्व मींच नियमित केलेलें आहे. मनुष्यांत असणारे पराक्रम मीच उत्पन्न केलेले असून, ते माझ्याच स्वाधीन आहेत. सर्व पदार्थांस श्रेष्ठत्वगुण मींच दिला असून, त्या गुणाच्या साराचा भोक्ता मीच आहें. हें माझ्या ह्मणण्याचें तात्पर्य होय. ॥ ८ ॥

**पुण्यो गन्धः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ ।**
**जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥**

पुण्यएव गंधे भगवानुपास्यइत्येवमर्थं पुण्यइति विशेषणं। पुण्य-गंधमेव भुंक्ते न दुर्गंधमिति ज्ञापयितुं च । शुभं पिबत्यसौ नित्यं ना-शुभं सहरिः पिबेत् । पूर्णानंदमयस्यास्य चेष्टा न ज्ञायते क्वचित् । आगमिष्यत्सुखं चापि तच्चास्त्येव सदापि तु । तथाप्यचिंत्यशक्तित्वा-ज्जातं सुखमतीवचेति । विभावसावग्नौ ॥ ९ ॥

पृथ्वींतील सर्व सुगंध माझ्याच प्रेरणेनें उत्पन्न झालेला असून त्यास श्रेष्ठत्व मींच दिलेलें आहे; आणि त्याचा भोक्ताही मींच आहें. त्यांतील सुगंध मात्र परमात्मा भोगतो असें जाणून त्यांत परमात्म्याचें ध्यान करावें. दुर्गंध त्या ( परमात्म्या ) नेंच दिला असला तरी, तो परमात्मा स्वतंत्र असल्यामुळें त्या दुर्गंधाचा तो अनुभव घेत नाहीं, असें जाणून त्यांत त्याचें ध्यान करूं नये; अग्नीच्याठायीं असलेलें तेज माझ्या स्वाधीन होऊन राहतें. सर्व लोकांचें तेजही माझ्याच स्वाधीन आहे. परमात्मा नित्य सुखी असल्यानें त्यास नवीन सुगंधादि प्राप्त होणें आहे असें नाहीं. तो पूर्णच आहे तथापि त्याचेठायीं

अघटितघटक अचिंत्यशक्ति असल्यामुळें गंधानुभव घेतो अशा अर्थाचीं वेदादि वचनें आहेत, त्यामुळें गंधादि सुखानुभव परमात्मा घेतो ह्मणून तो परमात्मा अपूर्ण आहे अशी शंका सूज्ञ जनानीं घेऊं नये. ॥ ९ ॥

**बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् ।**
**बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥ १० ॥**

**सर्वभूतानां मां बीजं विद्धि । व्यंजनाज्जगतोविष्णुर्बीजं न परिणामतइतिवचनाद्व्यक्तिकारणत्वाद्बीजं । न परिणामे बीजं ॥ १० ॥**

हे अर्जुना, सर्व प्राणीरूप समुदायास शश्वदेक प्रकार—बीजरूपानें उत्पन्न करणारें बीज, माझ्या स्वाधीन असून मीच त्याला उत्पत्तिविषयीं अभिव्यक्त करितों. बुद्धिमानाची बुद्धि आणि तेजस्व्यांचें तेज माझ्या स्वाधीन असून, त्यांना तें माझ्यापासूनच प्राप्त झालेलें आहे, अशा वचनानें ( बोलण्यानें ) जीव हे परमात्म्याचेच विकार आहेत, असें मात्र समजूं नये; कारण परमात्मा निर्विकार असल्यानें, जीवांस देहोत्पत्तीस ( देह-शरीर-प्राप्त होण्यास ) कारण असणारे पदार्थ, त्याच्या ( परमात्म्याच्या ) स्वाधीन आहेत, व जीव जीं कर्तव्यें करितात. तीं त्या त्या काळीं त्यांजकडून तो—परमात्मा—करवितो, असें असल्यामुळें सर्व जगाला परमात्मा निमित्तकारण आहे. विकारी कारण नव्हे. जगाची अभिव्यक्ति करतो ह्मणूनच बीज असें त्यास नांव आहे. ॥ १० ॥

**बलं बलवतामस्मि कामरागविवर्जितम् ।**
**धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥ ११ ॥**

**कामरागविवर्जितत्वं धर्माविरुद्धइत्यादिविशेषणमुपासनार्थं प्रायोहिकामिताअर्था धर्माह्नन्युर्हरिः पुनः । न धर्महानिकृत्किंतु कामितोधर्मकृद्भवेदिति च धर्माविरुद्धकामः ॥ ११ ॥**

हे भरतश्रेष्ठा अर्जुना, बळवान् लोकांचें बळ ( शक्ति ) किंवा सर्व भूतांचेठायीं स्नेहरहित व धर्माला विरोध न करणारा असा योग्य काम हे सर्व माझ्याच स्वाधीन असून त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें मीच त्यांनां ( बळादिक ) दिले आहेत. ॥ ११ ॥

**ये चैव सात्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।**
**मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥१२॥**

न केवलं रसादिधर्मप्रेरकः किंनाम सर्वप्रेरकश्चेत्याशयेनाह । येचैवेति । यथा भगवदधीनमिदं एवं भगवानपि तदधीनोस्तु भू भूधरवदित्यत आह । नत्विति । नाहं जगदायत्तः तत्तु मदायत्तमित्यर्थः ॥ १२ ॥

मी केवळ रसादि धर्मांचाच प्रेरक आहें असें नाहीं; तर सर्वांचा प्रेरक मीच, अशाविषयीं सांगतातः—त्या पदार्थांचेठायीं सात्विक, राजस व तामस असे भिन्न भिन्न प्रकार असतात, ते सर्वही त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें माझ्यापासून उत्पन्न झालेले आहेत; पण, मी त्यांचा आश्रय करून नाहीं, ते मात्र सर्व माझ्या सत्तेखालीं असतात. ॥ १२ ॥

**त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।**
**मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥१३॥**

सर्वे भावादृश्यमानागुणमयाइति दर्शयति । त्रिभिरिति । एभिः देहादिभिः ज्ञानिव्यावृत्त्यर्थमुक्तं । इदमितिव्यवहारपतितमित्यर्थः । एभ्योगुणमयेभ्यः परं व्यतिरिक्तं गुणमयब्रह्मादिदेहादीन्दृष्ट्वा मायामोहिताः विष्णोरपीदृशः देहादिरितिमन्यंतइत्यर्थः । उक्तंच । गौणान् ब्रह्मादिदेहादीन्दृष्ट्वा विष्णोरपीदृशः । देहादिरितिमन्वानोमोहितोज्ञोजनोभृशमिति ॥ १३ ॥

ब्रह्मरुद्रादि सुरगण यांस सत्व, रज, तम, या गुणांचा संबंध आहे ह्मणून सांगतातः—ह्या ( सत्वादिक ) गुणत्रयात्मक पदार्थांनीं मोहित झालेलें हें सर्व जग, त्या पदार्थांपासून भिन्न व नाशरहित असा मी आहें असें, जाणत नाहींत. कारण ब्रह्मरुद्रादि जीवगणाचे सर्व दृश्यमान् देह त्रिगुणात्मक असल्यामुळें, त्यांचे देह पाहून माझाही देह त्याच प्रकारचा ( त्रिगुणात्मक ) आहे, असें अज्ञ लोक समजतात; पण तसा प्रकार नसून केवळ सच्चिदानंदमूर्ति व स्वतंत्र असा, मी अनित्य सुखदुःखप्रद अशा त्या त्रिगुणसंसर्गापासून निरतिशय भेदयुक्त आहें असें समज. ॥ १३ ॥

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।**
**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥ १४ ॥**

कथमनादिकालेमोहानत्ययोबहूनामित्यतआह । दैवीति । क्रीडादिगुणसंपन्नस्य ममसंबंधिनी दैवी । तदेवस्पष्टयति । मम मायेति । गुणमयी त्रिगुणात्मिका । दुरत्यया । अत्येतुमशक्या यदि भगवती माया मोहिकात्येतुमशक्या च तर्हि कस्यापि ज्ञानं नस्यादित्यत आह । मामेवेति । अन्यत्सर्वंपरित्यज्य मामेव ये प्रपद्यंते गुर्वादिवंदनं च मय्येव समर्पयंति । मत्संपत्त्यातु गुर्वादीन् भजंते मध्यमाजनाः । मदुपाधितयातांश्च सर्वभूतानिचोत्तमाइत्याद्युक्तरीत्या स एवच तत्र स्थित्वा गुर्वादिर्भवति इत्यादिपश्यंति तएतां मायां तरंति । उक्तंच । लक्ष्म्यावशगयालोकाविष्णुनैव विमोहिताः । येतु विष्णुं प्रपद्यंते ते मायां तां तरंतिहि ॥ १४ ॥

अनादिकालापासून ब्रह्मरुद्रादि जीवगणांस जो मोह आहे, त्याचें त्यांनीं आजपर्यंत निरसन करून घेतलें नाहीं, याविषयीं सांगतात:–जगत्सृष्ट्यादि विचित्र-क्रीडायुक्त, अशा मला, अति प्रिय तमोगुणाभिमानी व माझ्या स्वाधीन असलेल्या लक्ष्मीनें प्रेरणा केलेली दुर्गारूप शक्ति, अतिक्रमण करण्यास अशक्य होय; कारण विचित्र शक्ति असा जो मी त्या मला, ती अतिप्रिय झाल्यामुळें, तिचीही शक्ति विचित्र आहे. ती या सर्व जीवगणांला मिथ्या ज्ञान उत्पन्न करून मोहित करिते, तर तिचें अतिक्रमण–उल्लंघन–कोणाकडूनही होत नाहीं त्यामुळें, कोणालाही ( योग्य ) ज्ञानोत्पत्ति न होतां, कोणीही मुक्त होणार नाहींत, असें समजूं नये; कारण, जो ( मनुष्य ) या संसारबंधापासून मुक्त करणारा माझ्याशिवाय दुसरा कोणी नाहीं असें समजून, माझें भजन ( भक्ति ) करितो, तो अज्ञानापासून दूर होऊन मुक्तिप्रत जातो. जे मध्यम भक्त आहेत, ते माझ्या संतोषार्थ गुरु व आचार्य इत्यादिकांची पूजा करून ती मला अर्पण करितात. किंवा जे उत्तम भक्त आहेत, ते गुरु, आचार्य इत्यादि पूजास्थानें माझ्या प्रतिमेप्रमाणें आहेत असें मानून, तदंतर्गत ( असणारा जो मीं त्या )

माझी पूजा करितात; आणि त्यायोगानें अज्ञानाचें निरसन करून घेऊन भवबंधापासून मुक्त होतात. ह्मणजे ज्ञानेच्छूंला ( ज्ञानाची इच्छा करणारांला ) सदुपदेश करणारे सद्गुरु, ब्रह्मादि अनेक उत्तम जीवगण असले तरी, अलौकिक अशा परमात्म्याच्या ज्ञानाचा उपदेश करणें हें कृत्य दुर्घट असल्यानें, तो परात्मा दीनदयाळू होत्साता आचार्य इत्यादिकांचे ठायीं राहून स्वतःच ( आपल्या ) स्वरूपाचा उपदेश त्या ( आचार्यादिकां ) कडून करवितो. याकरितां, मुख्य गुरु परमात्मा श्रीहरी नारायणच होय, असें या ह्मणण्याचें तात्पर्य. ॥ १४ ॥

**न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः ।**
**माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥ १५ ॥**

**यदित्वत्प्रतिपत्तिर्माया तरणोपायः । तर्हि किमिति सर्वे त्वां प्रतिपद्य तां मायां नात्याययन्नित्यत आह । न मामिति । दुष्कृतित्वान्मूढाः अतएव नराधमाः अपहृतज्ञानाः । अभिभूत ज्ञानस्वभावाः अतश्च मूढाः अतएव असुराः असुष्विंद्रियेषु रता असुराः ज्ञानप्रधानादेवास्तु असुरास्तुरताअसावित्युक्तेः । तदीयं भावं स्वभावमाश्रिताः मां न प्रपद्यंते ॥ १५ ॥**

जर तुझें ज्ञान, हें अज्ञानाचें निरसन करण्याला मुख्य साधन आहे; तर कोणत्या कारणानें ( जीव हे ) तुझें ज्ञान संपादन करून ( आपल्या ) अज्ञानाचें निरसन करून घेत नाहींत? या शंकेच्या निरसनार्थ सांगतातः— केवळ इंद्रियसुखांचे ठायींच आसक्त, दुष्कर्म करणारे, मूढ व आसूर स्वभाव ह्मणजे दैत्य स्वभावातें आश्रय केलेले, असे मनुष्याधम, माझ्या स्वाधीन असलेली तमोमय शक्ति जी दुर्गा, त्या शक्तीच्या योगानें, त्यांच्या ज्ञानाचा नाश होऊन, ते मला शरण येत नाहींत; ह्मणूनच त्यांचें अज्ञान नाश पावत नाहीं व ज्ञान प्राप्त होत नाहीं. ॥ १५ ॥

**चतुर्विधा भजन्ते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ।**
**आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ १६ ॥**

**स्वदोषादेव न मां प्रपद्यंते न तु मत्प्रतिपत्तेर्मायातरणोपायत्वाभावादित्यत आह । चतुर्विधाइत्यादिना । आर्तो दुःखी जिज्ञासुरात्मज्ञानेच्छुः अर्थार्थीभोगलुब्धः ज्ञानीआत्मतत्ववित् ॥ १६ ॥**

सर्व जीवगण हे, आपापल्या प्राक्तन कर्मापासून उत्पन्न झालेले जे दोष त्या दोषांमुळेंच मला शरण न येऊन, ज्ञानप्राप्ति करून घेत नाहींत. यावरून अज्ञान नाश करण्याचें सामर्थ्य माझ्या ज्ञानाचे ठायीं नाहीं असें नाहीं ह्मणूनच, पूर्वजन्मींच्या सुकृतानें—पुण्यानें युक्त असे चार प्रकारचे लोक माझें भजन करितात, ह्मणून त्यांचा ( त्या चार प्रकारचे लोकांचा ) विस्तार सांगतात:—हे भरतर्षभ अर्जुना, संसाररूप रोगानें पीडलेला, परमात्मविषयक ज्ञानाची अपेक्षा ( इच्छा ) करणारा, या लोकाचे व परलोकाचे भोगसाधन जे विषय त्यांची इच्छा करणारा, आणि परमात्मज्ञान ज्यास आहे असा, असे हे चार प्रकारचे लोक, प्राक्तन—सुकृतानें युक्त होऊन, इतर ( माझ्याशिवाय ) जे ब्रह्मरुद्रादिक देव त्यांस भजत नाहींत; तर मलाच भजतात. ॥ १६ ॥

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ॥**
**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥१७॥**

**नित्ययुक्तः सदा भगवत्समाधिमान् एकस्मिन् मय्येव प्राधान्येन भक्तिर्यस्य स एकभक्तिः । तदुक्तम् । यादृशीतत्रभक्तिःस्यात्तादृश्यन्यत्रनैवचेत् । अनन्यभक्तिः सा ज्ञेया विष्णावेवतुसाभवेत् । अन्यत्रवैष्णवत्वेन लक्ष्मीब्रह्महरादिषु । कुर्याद्भक्तिं नान्यथातु तद्वशाएव ते यतइति ॥ १७ ॥**

वरील श्लोकांत सांगितलेल्या चार प्रकारचे लोकांपैकीं, निरंतर माझ्याच ध्यानांत निरत असलेला व माझेठायीं प्राधान्येंकरून भक्ति करणारा असा ज्ञानी श्रेष्ठ होय; कारण त्या ज्ञान्यास मी प्रिय आहे, व तो ज्ञानीही मला अति प्रिय आहे. येथें " एकभक्ति " या शब्दानें परमात्म्याच्याठायीं ज्या प्रकारानें सर्वोत्तमत्वरूप भक्ति होते त्या प्रकारची भक्ति, लक्ष्मी व ब्रह्मादिकांचेठायीं करूं नये, ते लक्ष्मी व ब्रह्मादिक हे केवळ विष्णुभक्त असून आपआपल्या तारतम्यानेंयुक्त आहेत असें समजून, ते विष्णुभक्त असल्यानें, ते भगवंताचे परिवार

आहेत ह्मणून, भगवंताचे प्राप्तीकरितां, त्यांची भक्ति व पूजा इत्यादिक करितो तोच ' एकभक्ति ' करितो असें समजावें. याशिवाय परमात्मा व मी एकच आहें असें समजून, भक्ति करणारा तो " एकभक्ति " ( करितो ) असा अर्थ करणें केवळ लौकिकांतसुद्धां विरुद्ध होय. ज्याप्रमाणें एखादा कोणी ( साधारण मनुष्य ) राजापुढें जाऊन, मी राजा आहे असें ह्मणूं लागेल तर, त्यावर राजा संतुष्ट होणें एका बाजूस राहून तो राजाचे अवकृपेस मात्र पात्र होऊन राजा करील तें शासन भोगणें त्यास भाग पडतें; याप्रमाणें अनेक आगम विरोधही, श्रीमदानंदतीर्थ भगवत्पादाचार्यप्रणीत ब्रह्मसूत्रभाष्यादि ग्रंथांत दाखविलेले उघड दिसतात; यावरून हा ऐक्यार्थ ( जीव व परमेश्वर एकच असा ) कदापीही संभवत नाहीं. ॥ १७ ॥

**उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ॥**
**आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥ १८ ॥**

**अन्यदेवताभक्तेभ्यएते भक्तावराः । ज्ञानीत्वात्मा अहमेवेति मे मतं सिद्धांतः । अतिप्रियत्वादभेदोपचारः अथवा आप्नोतीत्यात्मा यच्चाप्नोतियदादत्तइतिवचनात् । ज्ञानी मां प्राप्नोतीत्यर्थः । हि यस्माज्ज्ञानी अनुत्तमां परां गतिं मां प्रति युक्तात्मा मामेवास्थितः ॥ १८ ॥**

मागें सांगितलेले माझे सर्व भक्त इतर देवांस भजणाऱ्यापेक्षां श्रेष्ठ होत; तथापि त्यांत जो ज्ञानी तो मला अति प्रिय असल्यामुळें तो मीच आहे, असें माझें मत आहे. अथवा मत्स्थानरूप नित्य सुखात्मक मुक्तींत, जनन व मरण नाहींसें झाल्यामुळें तो मीच आहे असें, बोलणें औपचारिक मात्र होय. ज्याप्रमाणें, लोकांत आपल्या जिवलग मित्राला, तूं माझा केवळ प्राण आहेस असें ह्मणण्याचा परिपाठ आहे; तेवढ्यावरून ते दोघे ( मित्र ) अभिन्न ह्मणजे एकच आहेत असें ह्मणतां येत नाहीं; ( त्याप्रमाणेंच ज्ञानी हा मीच आहे असा श्रीकृष्णांच्या बोलण्याचा अभिप्राय समजावा. ) ज्यापेक्षां तो माझ्या चरणीं चित्त लावून मीच सर्वोत्तम अशी गति देणारा आहे असें समजून माझाच आश्रय करितो, ह्मणून तो श्रेष्ठ जाणावा. ॥ १८ ॥

**बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते ॥**
**वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥ १९ ॥**

एवंविधो ज्ञानी दुर्लभइत्याह । बहूनामिति । बहूनां जन्मनामंते ज्ञानवान्भवति कीदृश ज्ञानवान् । वासुदेवः सर्वः पूर्णवास्त्विति । ततोमां प्रपद्यते । उक्तंच । जन्माभिर्बहुभिर्ज्ञात्वा ततोमां प्रतिपद्यतेइति । अतः समहात्मा ज्ञानी दुर्लभः ॥ १९ ॥

अशा प्रकारचा ( वर सांगितलेला ) ज्ञानी दुर्लभ आहे ह्मणून सांगतातः-सर्व भूतांत रहाणारा जो परमात्मा **वासुदेव** त्याच्या सत्तेखालीं हा ब्रह्मरुद्रादि जीवजडात्मक प्रपंच आहे, असें ज्ञान पुष्कळ जन्मीं प्रयत्न केल्यानें प्राप्त होते, अशा ज्ञान्याला माझी प्राप्ति होते. असा ज्ञानी दुर्लभ होय; " वासुदेवः सर्वमिति " या वाक्यानें तो परमात्मा सर्वगूणपूर्ण-क्रिडादिगुणविशिष्ट सर्व जीवजडादि प्रपंचांत नियामकरूपानें राहून, त्याचें नियमन करणारा, स्वतंत्र आहे व हा सर्व जीवगणादि प्रपंच अस्वतंत्र त्या परमात्म्याच्या स्वाधीन आहे, असा या ह्मणण्याचा अर्थ होय. यावांचून सच्चिदानंदमूर्ति परमात्म्याला, दुःखी, बद्ध व अवर अशा जीवगणानी किंवा ज्ञानशून्य अशा तृणकाष्टपाषाणादि जडसमूहानी अभेद मानणें ( जडजीव व परमात्मा यांत भेद न मानणें) हें प्रत्यक्ष अनुमान व आगमरूपप्रमाणत्रयांस अत्यंत विरुद्ध असल्यानें, सुज्ञजन तसा अभेदार्थ कदापि घेणार नाहींत. ॥ १९ ॥

**कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः ॥**
**तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ॥२०॥**

लोके भगवज्ज्ञानिनोलभ्यमानत्वात्कथं दुर्लभत्वमित्यतआह । कामैरिति । तत्तत्कामापहृतज्ञानास्तत्तदागमोक्तं नियममाश्रित्य स्वस्वभावेन वशीकृताअन्यदेवता भजंते । अतोदृश्यमानानां सर्वेषां मिश्रयाजित्वाच्छुद्धो भागवतोदुर्लभइतिभावः ॥ २० ॥

लोकांत जिकडे पहावें तिकडे ज्ञानी व ब्रह्मज्ञानी दिसतात, असें असून ते दुर्लभ कां? या शंकेचें निवारण करितातः—पुत्र, कीर्ति, किंवा शत्रूवर

जयप्राप्ति इत्यादिकांच्या इच्छेनें विवेकज्ञानरहित होऊन आपापल्या स्वभावाला अनुसरून, सर्वोत्तम असा जो मीं त्या मला टाकून, ब्रह्मरुद्रादि भूतप्रेतनाथांचें भजन करून, त्यांना संतोष व्हावा ह्मणून उपवासादि व्रतें आचरितात; अशा आचरणानें ते पुष्कळ ( मोठे ) ज्ञानी आहेत असें दिसतें, तरी ते मिश्रितोपासनायुक्त झाल्यानें केवळ माझा भक्त असा शुद्ध ज्ञानी मिळणें दुर्लभ होय.२०

**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।**
**तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥२१॥**

ननु मिश्रयाजिनोपि क्रमेण भागवता भवंत्येवेत्यतआह । योयइति । यां यां ब्रह्मरुद्रादिरूपां तनुं ॥ २१ ॥

ते मिश्रितोपासना करणारे असले तरी, क्रमानें पुढें ( तरी ) भगवद्भक्त कां होऊं नयेत ? या शंकेचें निवारण करितातः–जो जो भक्त आपापल्या प्राग्जनित ( मागील जन्मांच्या ) वासनायोगानें ज्या ज्या ब्रह्मरुद्रादि मूर्तींची श्रद्धापूर्वक पूजा करण्यास इच्छितो, त्याच्या त्याच्या योग्यतेनुसार ती ती श्रद्धा, मीच त्याचे अंतर्यामीं असून ती ( श्रद्धा ) उत्पन्न करितों; याकरितां ते ती श्रद्धा सोडून माझे भक्त होण्याचा संभव नाहीं. ॥ २१ ॥

**स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते ।**
**लभते च ततः कामान्मयैव विहितान्हि तान् ॥२२॥**

ततः किमित्यतआह । सतयेति । एतच्च मिश्रयाजिविषयं । ननु कथं मिश्रयाजिनां कर्मफलप्राप्तिः । पूजितानामन्यदेवतानां फलदाने सामर्थ्याभावादित्यत आह । लभंतेचेति ॥ २२ ॥

तर त्यापासून ( मिश्रोपासनेपासून ) काय होतें तें सांगतातः—मी दिलेल्या श्रद्धेनेंयुक्त होऊन, आपल्या इच्छेप्रमाणें त्या त्या देवांचें आराधन करितो; परंतु परमात्म्याशिवाय सर्व देव स्वतंत्रपणानें फल देण्यास असमर्थ असल्यामुळें, त्यांस ( त्यांचे भक्तांस ) फलप्राप्ति होणार नाहीं, अशी शंका घेऊं नये. कारण सर्व देवांचे अंतर्यामीं मीच असून फल देणाराही मीच असल्यामुळें माझ्यापासूनच त्यांनां ( इतर देवांचे भक्तांस ) फल मिळतें. ॥२२॥

अन्तवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ।
देवान्देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि ॥२३॥

कथं तर्हि भगवद्दत्तस्य फलस्यांतत्वमित्यत आह । अंतवदिति । मम सर्वयज्ञभोक्तृत्वात्फलप्रदत्वादिकं तत्वेनाजानतामल्पबुद्धित्वात्तेषां फलमंतवदित्यर्थः । भगवद्भक्तानामनंतं फलं अन्येषांत्वंतवदित्येतत्स्पदर्शनायोभयेषां फलं दर्शयति । देवानिति । देवान्यजंतीति देवयजः । तदुक्तम् । ज्ञात्वा परत्वं विष्णोस्तु पृथक् देवान्यजन्नरः । याति देवांस्तदज्ञात्वा तमएव प्रपद्यते । तथापि यावदन्यैस्तु साम्यं हीनत्वमेकतां । न निश्चिन्वंति जायंते संसारे ते पुनः पुनरित्यादि ॥ २३ ॥

तर सर्व फलदाता भगवान् तूंच झालास, मग त्यांस ( इतर देवतांचे भक्तांस ) जें फळ मिळतें तें अनित्य कसें होईल ? या शंकेचें समाधान करितातः—मी सर्व यज्ञांचा भोक्ता व फलदाता असून, माझी उपेक्षा करणाऱ्या अल्पबुद्धि मनुष्यांला नाशवंत ( अनित्य ) असेंच फळ मिळतें. जरी फळदाता मीच असलों तरी माझ्यावर त्यांची भक्ति नसते; ह्मणून मी प्रेरणा केलेल्या ब्रह्मरुद्रादि देवांनीं दिलेलें फळ, त्यांच्या यजन पूजनादिकांनीं पावतात आणि जे माझे भक्त आहेत ते नित्य सुखानें पूर्ण अशा मुक्तीस जातात. ब्रह्मरुद्रादि सर्व देव अल्पज्ञानी व अस्वतंत्र आहेत असें असून त्यांचेठायीं पूर्ण शक्ति आहे असें समजून त्यांस काम्यकर्मेंकरून भजतात, ते क्रमाक्रमानें त्या ( काम्यकर्मां ) तच निरत होऊन ( शेवटीं ) अधोगतीस जातात. तरी जोंपर्यंत त्यांनां अन्य ब्रह्मरुद्रादि जीवजड प्रपंचासमान मी आहें किंवा त्यापेक्षां लहान आहें, अथवा त्यांपासून अभिन्न आहें, अशा प्रकारच्या अयथार्थ ज्ञानाचा निश्चय होत नाहीं, तोंपर्यंत ते अभेदोपासना-निरत होऊन, वारंवार या जन्ममरणरूप समुद्रांत बुचकळ्या खातात, जर दुर्जनसंसर्गानें या अभेदज्ञानाचा निश्चय झाला, तर त्यांस त्यानंतर अंध तम—नामक नित्यदुःखात्मक अशा नरकावांचून अन्य ( गती ) नाहीं. ॥ २३ ॥

अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः ।
परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम् ॥ २४ ॥

को विशेषस्तवान्येभ्योयेन तान्प्राप्तानामंतवत्फलत्वेपि त्वां प्राप्तानामनंतफलत्वमित्यत आह । अव्यक्तमिति । अज्ञानिनः परमितरविलक्षणमनुत्तमं स्वोत्तमरहितं मम भावं याथार्थ्यमजानंतः अव्यक्तं कार्यदेहादिवर्जितम् । मां व्यक्तिं कार्यदेहादिकमापन्नं मन्यंते अज्ञानिदृष्ट· कार्यदेहादिराहित्याद्देवेभ्योविशेषइति भावः । अथवा केचन भागवताः पुरुषाः केचन त्रैविद्याः संति तेषां च मोक्षादिकं फलमित्युक्तं । अथ केवलद्वेषिणोपि संति इत्याह । अव्यक्तमिति । यद्वा एवं प्रेरकत्वादिमाहात्म्यवांश्चेद्भगवान् तत्कथं भवतः केचिज्जीवाभेदं मन्यंतइत्यतआह । अव्यक्तमिति । सर्वात्मना ज्ञेयत्वाज्ञेयत्वाभ्यां जीवेश्वरयोर्व्यक्तत्वाव्यक्तत्वेन ततोवैलक्षण्यात्तयोरभेदं मन्यमाना असुराइत्यर्थः । उक्तंच । अव्यक्तः परमात्मासौव्यक्तोजीवउदाहृतः । मन्यते यस्तयोरैक्यं स तु यात्यधंतमइति ॥ २४ ॥

तुला सर्वांपेक्षां श्रेष्ठत्व असण्याचा हेतु काय? तुझ्याशिवाय इतर देवांची उपासना करणारांस अनित्य फल मिळतें आणि तुझी उपासना करणारांस मात्र नित्य फल मिळतें, असें तूं सांगतोस याचा हेतु काय? अशी अर्जुनास शंका येईल असें वाटून श्रीकृष्ण त्या शंकेचें समाधान करितातः— जे अज्ञानी आहेत ते मला जगद्विलक्षण, नाशरहित, माझ्यासारखा दुसरा कोणी नाहीं, अथवा माझ्यापेक्षां श्रेष्ठ—अधीक—ही कोणी नाहीं, असें समजत नसून, प्रकृतिजन्य—देह—रहित अशा मला, माझा देह प्राकृतच आहे असें समजतात; खरें पाहिलें तर सच्चिदानंदमूर्ति असा जो मी, त्या मला प्राकृत देह नाहीं. माझ्याहून भिन्न अशा ब्रह्मरुद्रादि देवांस मात्र प्राकृत देहाची प्राप्ति व त्याचा वियोग हीं आहेत, याकारणानेंच माझे ठिकाणीं श्रेष्ठत्व आहे. अथवा कित्येक भगवद्भक्त किंवा कर्मनिरत अशांसही नित्य किंवा अनित्य फल मिळण्यास माझ्याविषयीं ( अनुक्रमें ) खरोखर ज्ञान, किंवा ज्ञानाचा अभाव, हेंच कारण आहे ह्मणून सांगितलें; अथवा मला सर्वोत्तम, सर्वकर्ता, सच्चिदानंदमूर्ति, असें समजत नाहींत ते अंधतमरूप नरकांत जातात. ह्मणून सांगितलें; अथवा पूर्वीं सांगितल्याप्रमाणें प्रेरकत्वादि माहात्म्यविशिष्ट जर तूं आहेस तर, कित्येक अज्ञ जन तुला व सर्व जीवांला अभेद कसा जाणतात

( जीव आणि तूं एकच आहेत असें कसें समजतात. ) या शंकेचें निवारणही याच श्लोकानें करितात, तें असें:—सर्व प्रकारानें, आपली जीवयोग्यता आपल्यास समजत असून, केवळ पूर्णपणें ज्याचें ज्ञान होत नाहीं, अशा अनंतगुणपरिपूर्ण, अलौकिक परमात्म्याला—मला—आपल्यासारखा मानणारे ते, केवळ माझ्या अनंतऐश्वर्यादिभोगांची इच्छा करणारे, इंद्रियनिरत, असे असुरच होत. असे जे असतील त्यांस, माझ्या अवकृपेनें अंधतमाचीच प्राप्ति होणार असें समजावें. ॥ २४ ॥

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।**
**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥२५॥**

**येनाज्ञानेन मामन्यथा मन्यंते तदज्ञानंच मदिच्छाधीनमेव । अतोनतत्स्वतोनिवर्तते नाप्यज्ञानकृतया निंदया मम खेदइत्याह । नाहमिति । योगेन स्वसामर्थ्यलक्षणोपायेन मायया च देव्या समावृतोहं सर्वस्य न प्रकाशः । अतोमय्येव मूढोलोकोमामजादिरूपं नाभिजानाति । उक्तंच । आत्मनः प्रवृतिंचैव लोकचित्तस्य बंधनं । स्वसामर्थ्येन देव्याच कुरुते च महेश्वरइति ॥ २५ ॥**

अज्ञानी, ज्या अज्ञानामुळें मला आपल्यासारखाच समजतात, तें अज्ञान माझ्या स्वाधीन असल्यामुळें माझ्या कृपेशिवाय त्यांचें अज्ञान जात नाहीं. अथवा त्या अज्ञजनांनीं सर्वैश्वर्यमूर्ति अशा मला, अज्ञजीवासारखा समजून, माझी निंदा केली तरी मला खेद होत नाहीं. ह्मणून सांगतात:—योगरूप माझ्या सामर्थ्यानें किंवा दुर्गादेवीच्या अज्ञानानें आपल्या योग्यतेप्रमाणें मोहित झालेले लोक, मीं उत्पत्तिनाशशून्य सच्चिदानंदमूर्ति आहें असें जाणत नाहींत, त्यांनां नित्य सुखरूप मुक्तीचा अनुभव घेण्याची योग्यता नसल्यामुळें मी त्यांस प्रकाशमान होत नाहीं. ( स्पष्टपणें दिसत नाहीं. ) ॥ २५ ॥

**वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।**
**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥२६॥**

**यवनिकाद्युभयभागवर्तिनोः परस्पराज्ञानवत्तवापि न सर्वविषये**

ज्ञानंस्यादित्यतआह । वेदेति । मदधीनया मायया ममाबद्धत्वादहं सर्वं जानामि तर्हि भवंतमपि कश्चिद्ब्रह्मादिर्ज्ञास्यतीत्यत आह । मांत्विति । मांतु कश्चनातिसमर्थोपि स्वसामर्थ्यात् साकल्येन न वेद तदुक्तम् । यथात्मानं हरिर्वेत्ति तथान्ये नैव तं विदुः । जानंति केचित्क्रमशोरमाद्यास्तत्प्रसादतइति ॥ २६ ॥

ज्याप्रमाणें मध्यें पडदा असतां पडद्यांतील मनुष्यास बाहेर व बाहेरील मनुष्यास पडद्यांत काय चाललें आहे हें दिसत नाहीं तसें अज्ञानानें मोहित झालेल्या या जीवगणास तुझें ज्ञान होत नाहीं, त्याप्रमाणें जीवगणांचें ज्ञान तुला नाहीं कीं काय ? अशी शंका येईल तिचें निरसन करितातः—हे अर्जुना, मी भूत, वर्तमान व भविष्य या तिन्हीं काळांतल्या जीवांनां जाणतों व मोह पाडणारी जी माया तीही माझ्याच स्वाधीन आहे. याकरितां मला अज्ञान हें कधींही संभवत नाहीं. तर मला ब्रह्मरुद्रादि जीवगणांपैकीं कोणी जाणणारे असतील अशी शंका घेऊं नको; कारण माझ्या प्रसादावांचून चित्प्रकृति लक्ष्मी किंवा ब्रह्मादि जीवगणांतील कोणीही स्वतः व पूर्णपणें मला जाणण्यास समर्थ नाहीं. ॥ २६ ॥

**इच्छाद्वेषसमुत्थेन द्वन्द्वमोहेन भारत ।**
**सर्वभूतानि संमोहं सर्गे यान्ति परन्तप ॥ २७ ॥**

भगवांस्तदधीना माया च मुख्यं भगवद्विषयमोहस्य कारणमित्युक्तम् । इच्छाद्वेषप्रवृत्तिजनितद्वंद्वमोहोप्यवांतरकारणमित्याह । इच्छेति । सुखदुःखादिविषयोमोहो द्वंद्वमोहः । जीवेश्वरैक्यविषयोवा । जीवधर्मानीश्वरेतु योजीवेष्वैश्वरानपि । विंद्याज्जीवेश्वरैक्यंवा द्वंद्वमोही स उच्यतइतिवचनात् । संमोहंतुसदामोहं महामोहं तदाग्रहम् । तमस्तु शार्वरींविंद्यात् मोहश्चैवविपर्ययः । तदाग्रहो महामोहस्तामिस्रः क्रोधउच्यतइतिवचनात् सर्गे सर्गकाल एव ननु सर्गात्प्राक् । तदानीमज्ञानस्य केवलेश्वरेच्छाद्यधीनस्य सत्वात् । इच्छाद्वेषजनितद्वंद्वमोहोऽवांतरकारणमित्यर्थः ॥ २७ ॥

भगवान् किंवा त्याचे स्वाधीन असलेली माया हीं ब्रह्मरुद्रादिजीवगणांस

मोह पाडण्याला साधनें आहेत, असें सांगितलें. त्याप्रमाणें इच्छा व द्वेष यांच्या प्रवृत्तीनें उत्पन्न होणारे द्वंद्वमोहही त्या जीवगणांच्या अज्ञानाला कारण आहेत ह्मणून सांगतात:—हे भरतकुलोत्पन्ना, शत्रुसंतापका अर्जुना, इच्छा आणि द्वेष या उभयतांपासून उत्पन्न होणारीं सुखदु:खादि द्वंद्वें यांच्या मोहानें सृष्टीच्या उत्पत्तीकाळापासून, सर्व प्राणिमात्र मोह पावलेले असतात; अथवा जीवांचे धर्म ईश्वराचेठायीं व ईश्वराचे धर्म जीवांचेठायीं आहेत असा आरोप करून, जीव व ईश्वर यांचें ऐक्य आहे असें जाणणाऱ्याला द्वंद्वमोही असें ह्मणतात. तादृशज्ञानानें सर्व भूतेंही सृष्टीच्या उत्पत्तिकाळापासून मोहयुक्त आहेत; सृष्टिकाळीं, शरिराचा संयोग झाल्याकारणानें इच्छा-द्वेषादि उत्पन्न होतात ह्मणून, तेव्हांपासून सर्व भूतें मोहित होतात, असें या ह्मणण्याचें तात्पर्य; सृष्टिकाळाच्या पूर्वी सर्व जीवांस या प्राकृत शरीराचा संबंध नव्हता. इच्छा-द्वेषादि-दोषरहित सच्चिदानंदमूर्ति तो परमात्माच स्वतंत्र असून त्याच्या अधीन जीवाला मोह करणारें अज्ञान आहे त्यामुळें त्या मोहास परमात्माच कारण होय, आणि इच्छा द्वेषादिकांपासून उत्पन्न झालेले द्वंद्वमोह हें अवांतर कारण होय. । २७ ।

**येषां त्वन्तगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ॥**
**ते द्वन्द्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रताः ॥ २८ ॥**

सर्वभूतानां संमोहश्चेत् लुप्तोमुक्तिमार्ग इत्याशंक्य द्वंद्वमोहविरहिताश्च केचित्संतीत्याह । येषांत्विति । अंतं नाशं गतं प्राप्तं ॥ २८ ॥

सर्व भूतें जर मोहित झालेलीं असतात तर मुक्तिमार्गाचा लोपच होईल, अशी शंका घेऊन त्या ( भूतां ) पैकीं कित्येक ज्ञानी मोहरहित असतात ह्मणून सांगतात:-पुण्यकर्मांनीं युक्त व निश्चयानें व्रत करणारे असे ज्ञानी पापरहित होऊन, इच्छा व द्वेष यांपासून उत्पन्न होणाऱ्या सुखदु:खांपासून किंवा जीव व ईश्वर हे एकच आहेत असें जें अज्ञान त्यापासून मुक्त होऊन माझें भक्तीनें भजन करितात. आणि या माझ्या आश्रयापासून मिळणाऱ्या प्रसादानें, दुस्तर असा जो हा भवसमुद्र तो तरून जातात. ॥ २८ ॥

**जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतन्ति ये ॥**
**ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ।२९।**

मां भजंत इत्युक्तानुवादेन उक्तमेव भगवद्भजनस्य विज्ञानाख्यं फलं पुनरन्योपायनिवृत्त्यर्थमाह। जरेति। जरामरणमोक्षायेत्येतल्लक्षणया स्वर्गादिकामानिवृत्त्यर्थं तदपेक्षया च मोक्षापेक्षास्तुत्यर्थं नतु भजनविधौ मोक्षस्योद्देश्यता। एकांतिनां मोक्षापेक्षाया अभावात्। उक्तंच। सर्वे-वेदास्तु देवार्था देवा नारायणार्थकाः। नारायणस्तुमोक्षार्थे मोक्षोनान्यर्थ-इष्यते। एवं मध्यमभक्तानामेकांतानां न कस्यचित्। अर्थे नारायणो देवः सर्वमन्यत्तदर्थकमिति। ये मामाश्रित्य यतंते तएव तद्ब्रह्मविदुः। न भगवद्भजनाद्यन्यस्तज्ज्ञानोपायोस्तीतिभावः॥ २९॥

" मां भजंते " या पदाच्या अर्थाचा अनुवाद करून, उक्त अशा भगवद्भजनापासून अधिकाऱ्याला विज्ञाननामक फळ मिळतें ह्मणून सांगतातः— जरा ( वृद्धदशा ) व मरण यांपासून सुटावें ह्मणून, माझा आश्रय करून जे प्रयत्न करितात, तेच परब्रह्म ह्मणजे काय तें जाणतात, व जीवांतःकरणरूप समस्त अध्यात्मही जाणतात; भजन केल्यानेंच परमात्म्याचें ज्ञान होतें. ज्याचे ठायीं अनित्यसुख आहे अशा स्वर्गादि लोकांची इच्छा करूं नये. त्यांची इच्छा करणाऱ्यांपेक्षां मोक्षाची इच्छा करणारे श्रेष्ठ होत. अशा अभिप्रायानें जरामरण यांपासून सुटण्याकरितां जे भजन करितात असें सांगितलें, यावरून मोक्षाची इच्छा करूनच परमात्म्याचें भजन करावें असा अर्थ नाहीं. कारण वेदाध्ययन हें सगळें देवांच्याप्रीत्यर्थ असतें. ब्रह्मादिदेवांची पूजाही श्रीहरीला संतोष व्हावा ह्मणून आहे. नारायण हा मोक्षप्राप्तीस साधन आहे. मोक्षप्राप्ती झाल्यावर आणखीं प्राप्त होणारी दुसरी वस्तु नाहीं असें मध्यम भक्त जे आहेत ते जाणतात. जे एकाग्रचित्तानें भगवन्निष्ठच असतात त्यांस नारायणच सर्व परमार्थ होय. त्यावांचून ते मोक्षादि फळाची इच्छा करीत नाहींत. यावरून जरामरणापासून सुटावें ह्मणूनच भजन करावें असें ह्मणतां येत नाहीं. तात्पर्य इतकेंच कीं, भगवद्भजनावांचून ज्ञानप्राप्तीस दुसरें मुख्य साधन नाहीं. ।२९।

साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः॥
प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः॥ ३०॥

## इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां ज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

तद्ब्रह्मेत्युक्ते भगवतो ब्रह्मणोन्यत्वशंका स्यात् । तां निवारयति । साधिभूताधिदैवं मामिति ॥ ३० ॥

इति श्रीमद्भगवद्गीताविवृतौ विद्याधिराजभट्टोपाध्यायविरचितायाम् श्रीमध्वमतानुवर्तिनी व्याख्योपेतायाम् सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

तें ब्रह्म असें सांगितल्यानें श्रीकृष्णभगवान् स्वतः आपण ब्रह्म नसून त्याशिवाय दुसरेंच ब्रह्म आहे, अशी मंदमति जनांस शंका येईल, तिचें निवारण करितात–जे लोक अधिभूत, अधिदैव, अथवा अधियज्ञ यांनीं युक्त असा मी ब्रह्मशब्दानें वाच्य आहें असें जाणतात, ते माझे ठायीं आसक्तचित्त होऊन मरणकाळींही माझें स्मरण करतात. यामुळें, माझ्या भक्तांला योगभ्रंश होत नाहीं, ह्मणून तूंही माझी आज्ञा शिरसा मान्य करून, मला संतोष होईल असें स्वधर्माचरणरूपी युद्ध कर; त्या युद्धामुळें उत्पन्न होणाऱ्या पापापासून निर्लिप्त होत्साता माझ्या अनुग्रहास पात्र होशील व विशिष्टसुख भोगण्यास अधिकारी होशील, याविषयीं संशय धरूं नको. ॥ ३० ॥

येथें श्रीमदिन्दिराकान्ततीर्थ श्रीपादविरचित प्राकृत टीकेचा सातवा अध्याय समाप्त झाला.

स्वर्गादि अनित्य लोकीं जाऊन, पुनःपुनः जन्ममरणाचें दुःख भोगितात; सर्व प्रकारें माझें ज्ञान त्यांना नसून, किंवा जीवेशाभेदरूप ( जीव आणि ईश्वर हे एकच आहेत असें समजणें ) मिथ्याज्ञान असेल तर, त्यांना स्वर्गादिकांची प्राप्ति न होतां उलट अंधतमरूप नरकाचीच प्राप्ति होईल. जरी त्या त्रैविद्यांनीं श्रीविष्णूचें सर्वोत्तमत्व सामान्यतः जाणलें तरी ब्रह्मरुद्रादिक हे त्या विष्णूचे परिवार आहेत, असें न समजल्यानें त्यांस, ज्याला पुनरावृत्ति नाहीं असा मोक्ष मिळणार नाहीं; तर अनित्य अशा स्वर्गादिकांचीच प्राप्ति होते, असें तात्पर्य. ॥ २४ ॥

**यान्ति देवव्रता देवान्**
**पितॄन्यान्ति पितृव्रताः ।**
**भूतानि यान्ति भूतेज्या**
**यान्ति मद्याजिनोऽपि माम् ॥ २५ ॥**

त्रैविद्यभागवतयोस्तेपुण्यमासाद्येति योगक्षेमंवहाम्यहमिति चोक्तफलभेदं प्रपंचयति । यांतीति ॥ २५ ॥

त्रैविद्यांला सांगितलेल्या अनित्य फळाचा व भक्तांचा योगक्षेम मी चालवितों असें जें सांगितलें, त्या फलभेदांचें विस्तारानें वर्णन करितातः— इंद्रादि देवतांच्या उद्देशानें कर्मांचेठायीं आसक्त असलेले, नाशवंत अशा इंद्रादि देवांकडेच जातात; पितरांच्या उद्देशानें केलेल्या श्राद्धादि कर्मांचेठायीं निष्ठा ठेवणारे विनाशवंत अशा पितरादि देवांकडे जातात; विनायकादि भूतगणाचेठायीं निष्ठा ठेवून, त्यांची पूजा वगैरे करणारे नाशवंत अशा विनायकादि भूतांकडे जातात; आणि या सर्व देवतागणांच्या अंतर्यामीं राहणारा मीच सर्वोत्तम श्रीहरी आहें असें जाणून, सर्व देवांची पूजा करून, सर्व देव माझे परिचारक आहेत असें जो जाणतो, तो माझें जें स्थान वैकुंठ, त्या वैकुंठांत जातो. ॥ २५ ॥

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ २६ ॥**

अन्यदेवताभजनस्याल्पफलत्वेपि तदेव करोमि सुशक्यत्वात् । त्वं तु दुर्बलैः पूजयितुमशक्योमहत्वादित्याशंक्याह । पत्रमिति । अनिषिद्धं पत्रादि यो भक्त्या मह्यं ददाति तन्निर्मलचित्तस्य भक्त्या समर्पितमश्नामि भक्त्यैवाहंतुष्ये न द्रव्यादिनेतिभावः ॥ २६ ॥

तुझ्याशिवाय इतर देवतांच्या भजनानें ( भक्तीनें ) थोडें फळ मिळालें तरी, माझ्यासारख्या अशक्तांनीं ( शक्तिहीनांनीं ) तेंच ( इतर देवांचें भजन–भक्ति ) करणें सुलभ होय; कारण माझ्यासारखेच अशक्त आहेत ते, निखिल सुरनर–तिर्यगादि जगद्विलक्षण विचित्रशक्ति अशा तुझी पूजादिक क्रिया कशी करतील ? अशी शंका येईल तिचें समाधान सांगतात:–जो मनुष्य अनिषिद्ध असलेलें पत्र, फूल, फळ अथवा पाणीही, मला भक्तिपूर्वक अर्पण करितो तें, मी जरी नित्यानंदपूर्ण आहें तरी, भक्तीनें अर्पण केलेलें ह्मणून, प्रीतीनें स्वीकारितों. एक भक्ती नसून मोठ्या थाटामाटानें– द्रव्य खर्चून, माझी मोठी पूजा केली तरी, ती पूजा मला संतोषकारक होत नाहीं. परंतु, भक्तिमान् मनुष्यानें, अनिषिद्ध असें ( पुष्पफलादिक ) अल्पस्वल्प जरी मला अर्पण केलें, तरी मी तेवढ्यानेंच संतुष्ट होऊन, त्यास अनंत फळ देतों. ॥ २६ ॥

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**
**यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ २७ ॥**

सामान्यमुक्त्वा विशेषेण निगमयति । यदिति । ब्राह्मणेभ्यो-हिरण्यादि यद्ददासि ॥ २७ ॥

सामान्यतः सांगितलेलें विशेषेंकरून सांगतात:–हे कुंतिपुत्रा अर्जुना, तूं जें स्वभावतः किंवा शास्त्रोक्त विधिनिषेधानें बद्ध होऊन करतोस, जें खातोस, हवन करतोस, पितोस, जें तप आचरतोस, तें सर्व, मी अस्वतंत्र असून परमात्म्यानें प्रेरणा केल्यामुळें करितों, असें समजून, मला अर्पण करशील तर, त्यापासून मला संतोष होईल; मला संतोष होण्याला विशेष समृद्धीच पाहिजे असें नाहीं. ॥ २७ ॥

**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबन्धनैः ।**
**संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ॥२८॥**

ततः किमित्यतआह । शुभेति ॥ २८ ॥

याप्रमाणें केलेलें सर्व सत्कर्म मला अर्पण केल्यानें, तूं शुभ व क्षुद्र अशा स्वर्गादि फल व अशुभ आणि दुःखसाधनीभूत, अशा दोन्ही कर्मबंधांपासून मुक्त होशील. कर्मफलाची इच्छा न करितां, केलेलें कर्म मला अर्पण केल्यानें, त्या कर्मानें तूं बद्ध होणार नाहींस. अशा या कर्मसमर्पणरूप संन्यास–योगानें तूं भवबंधापासून मुक्त होऊन, माझें स्थान जें वैकुंठ त्या वैकुंठांत जाशील. ॥ २८ ॥

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।**
**ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥२९॥**

तर्हि स्नेहादिमत्वादल्पभक्तायापि कस्मैचिद्बहुफलं ददासि विपरीतायापि कस्मैचिद्विपरीतमित्यतआह । समइति । तर्हि न भक्त्याप्रयोजनमित्यत आह । येइति । मय्यायत्तास्ते तेष्वहमायत्तः यद्यपि मदायत्ताएते सर्वदा तथापि बुद्धिपूर्वकत्वाबुद्धिपूर्वकत्वेनभेदः । उद्धवादिवच्छिशुपालादिवच्च । मयि ते प्रीत्या वर्तते तेष्वहं प्रीत्या वर्तइति । उक्तंच । नास्यभक्तोपि यद्वेष्यो नचाभक्तोप्रियाप्रियः । किंतु भक्त्यनुसारेण फलदोतः समोहरिरिति ॥ २९ ॥

वर सांगितल्याप्रमाणें अल्प भक्तांच्या अल्प पूजेनें त्यांस तूं भक्तस्नेहामुळें महत्फल देतोस, तर विशिष्ट भक्तांला क्वचित् कमीच फल देशील, अशी अर्जुनास शंका येईल तिचें समाधान सांगतातः–मी सर्व भूतांला, त्यांनीं केलेल्या भक्तीप्रमाणें समबुद्धीनें फळ देणारा आहें. मी कोणाचाही द्वेष करीत नाहीं. परंतु जो माझा द्वेष करितो व जो माझी भक्ति करितो, त्यास मी त्याच्या कृतीप्रमाणें फळ देऊन, आपला असंतोष किंवा संतोष दाखवितों. जे प्राणी माझें भजन करितात, ते, आम्हीं अस्वतंत्र असून, परमात्म्याचे स्वाधीन आहोंत, असें समजतात, त्यांस त्यांच्या इच्छेप्रमाणें सर्व फळ मी देतों. जे अभक्त असतात, ते आम्हीं स्वतंत्र आहों असें समजून फसतात; जरी ते कसेंही समजले तरी, सर्वदा सर्व जग हें माझ्या स्वाधीन असल्यामुळें, त्यांच्या समजण्यानें माझें कांहींच नुकसान होत नाहीं. परंतु, मी सर्वोत्तम

आहे असें समजून माझ्यावर दृढ भक्ति ठेवल्यानें, मी त्यांच्या स्वाधीन झाल्याप्रमाणें होऊन, त्यांस इच्छित फळ देणें मला भाग पडतें. अशी भक्ती नसून उलट माझा द्वेष केल्यानें तदनुसार त्यांनां दुर्गति प्राप्त होते. हाच काय तो विशेष आहे असें जाणावें. याशिवाय विनाकारण मला कोणी प्रिय अथवा अप्रिय नाहीं. असें याचें तात्पर्य होय. ॥ २९ ॥

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥३०॥**

**भगवद्भक्तिं प्रशंसति । अपिचेत्यादिना । न भवत्येवप्रायस्तद्भक्तोदुराचारः । अपि तथापि स्वयोग्यातिरिक्त पुण्येन सुदुराचारः अनन्यभाक् प्राधान्येनान्यदेवताः न भजन् मां भजतेचेत्तर्हि स साधुरेव मंतव्यः कुतः हि यस्मात्सम्यक् व्यवासितः समीचीनव्यवसायवान् ॥ ३० ॥**

भगवद्भक्तीची प्रशंसा करितातः—जे भगवद्भक्त आहेत ते कधींही दुराचरणी होत नाहींत, तर त्यांतील एखादा आपल्या योग्यतेपेक्षां अधिक पुण्य करण्यास आरंभ करील व देव किंवा ऋषि यांच्या अंशांपैकीं असून तो भागवत धर्मापासून च्युत होऊन, दुराचरणी होईल तर, आणि माझ्यावांचून इतर देव सर्वोत्तम नाहींत असें जाणून, मलाच सर्वज्ञ, स्वातंत्र्याद्यखिलगुणसंपन्नत्वानें समजून, माझें भजन करील तर, निश्चयानें यथार्थबुद्धि प्राप्त झाल्यामुळें, तो साधु—भागवतच—आहे असें जाणावें. जो कोणी देव किंवा ऋषी यांच्या अंशांपैकीं नसून, तो दुराचारी होईल तर, त्यास सज्जन असें समजूं नये. कारण जे सज्जन भगवद्भक्त आहेत, ते आपल्या योग्यतेपेक्षां जास्त पुण्य करण्यास प्रवृत्त झाले तर त्या पुण्याचा ऱ्हास करण्यासाठीं, परमात्मा त्यांच्याकडून दुराचरण करवितो; हें इतरांस ह्मणजे जे देव किंवा ऋषि यांचे अंश नाहींत त्यांस होत नाहीं (?) ॥ ३० ॥

**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति ।**
**कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥३१॥**

अतएव क्षिप्रं भवति धर्मचित्तः शश्वच्छांतिं मोक्षं गच्छति। देवदेवांशविषयमेतत् नाविरतोदुश्चरितान्नाभक्तोनासमाहितः। सम्यग्भक्तो भवेत्कश्चिद्वासुदेवे मलाशयः। देवर्षयस्तदंशाश्च भवंति क्वचज्ञानतइतिवचनात् देवादिभ्योन्यः भक्तिलिंगवान् स दुराचारश्चेत् दांभिकएव। अल्पभक्तिमतः। दुराचारस्य सत्संगात्कथंचिन्महत्यपि भक्तिर्युज्यतएव हि। कौंतेय मे भक्तः दुराचारोपि न प्रणश्यतीति प्रतिजानीहि डिंडिमघोषपूर्वकं बाहुमुध्दृत्य प्रतिज्ञां कुरु ॥ ३१ ॥

मी सांगितलेल्या यथार्थ मताचा अंगिकार न करितां विवाद करणाऱ्या लोकांच्या सभेंत, तूं मुद्दाम जाऊन, तूं आपला हात उचलून, भेरीताडनादि कार्यपूर्वक अशी प्रतिज्ञा कर कीं श्रीहरीचा भक्त कदाचित् अंतराय योगानें (भक्तींत अंतर पडल्यामुळें) दुराचारी झाला तरी, तो नाश पावत नाहीं. तर त्याच्या इच्छेप्रमाणें तो महत्सिद्धि पावतो. या प्रकारें तूं प्रतिज्ञा केल्यानें अल्प भक्ति ज्यांस आहे असे क्वचित् दुराचारी झाले तरी, तुझें निश्चयाचें भाषण ऐकून, दुराचरणाचा त्याग करून, आपापल्या योग्यतेप्रमाणें भक्ती करतील; आणि ते तुलाच गुरु समजून, संशय सोडून, भगवद्भक्त होतील. ३१

## मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः। स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ३२

ये पापादियोनयोऽस्वाभाविकाः स्त्रियोवैश्यास्तथाशूद्राः ब्राह्मणाराजर्षयश्च ममातिभक्ताः स्युः तेपि यांति परां गतिम् ॥ ३२ ॥

हे अर्जुना, अस्वाभाविकच पुण्यपापें ज्यांच्या जन्माला कारण आहेत अशा स्त्रिया, वैश्य आणि शूद्र हे, पुण्यशाली असे माझे भक्त ब्राह्मण आणि राजर्षि यांच्या कुळांत, त्या (स्त्रीवैश्यादिक) नीच वर्णांतील लोकांनां, त्यांच्या पुण्याच्यायोगानें जन्म प्राप्त होतो; आणि उत्तम वर्णांतील लोकांस पापाचरणानें नीच कुळांत जन्म प्राप्त होतो. पुण्य व पाप यांच्या योगानें स्त्री, वैश्य आणि शूद्र इत्यादिकांचे जन्म ज्यांनां प्राप्त झाले आहेत, असे लोक, भक्तिपूर्वक माझा आश्रय करून, उत्तम गतीस जातात. मग स्वाभाविकच जे स्त्रीशूद्रादिक ते भक्तियुक्त होऊन, माझी सेवा करून, क्रमाक्रमानें प्राप्त झालेल्या ज्ञानाच्यायोगानें मोक्षास जातात ह्मणून काय सांगावें? ॥ ३२ ॥

**किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।**
**अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥३३॥**

किं पुनः पुण्याः स्वाभाविका एतेस्त्र्यादयो ब्राह्मणादयश्च अत्र पापयोनयः स्त्रियइतिवत् पुमांसइत्यनुक्तिः पापादिकारितपुंसामभावात् । तदुक्तं । पापादिकारिताश्चैव पुंसांस्वाभाविकाअपि । विप्रत्वाद्यास्तत्र पुण्याः स्वाभाव्याएव मुक्तिगाः । यांति स्त्रीत्वं पुमांसोपि पापतः कामतोपि वा । न स्त्रियोयांति पुंस्त्वं तु स्वभावादेव याः स्त्रियः । पुंसा सहैव पुंदेहे स्थितिःस्याद्वरदानतः । तज्जन्मानि वराः पाप जाताभ्योनिजसत्स्त्रियः । सर्वेषामपि जीवानामंत्यदेहोयथानिजः । मुक्तौ च निजभावःस्यात्कर्मभोगात्ततोपिच । अतोभक्तेः साधनोत्तमत्वादनित्यं नश्वरमसुखं सुखरहितं इमं भक्त्यादिसाधनलोकं देहं प्राप्याविलंबेन मां भजस्व ॥ ३३ ॥

पापामुळें ज्यांना स्त्रीजन्म प्राप्त झाला आहे, असे जीवसुद्धां, क्रमानें भक्ति केल्यानें, आपापल्या योग्यतेप्रमाणें उत्तम असें जें मुक्तिसुख त्याचा अनुभव घेतात; मग पुण्यकर्मांत रत झालेले, स्वभावतःच ब्रह्मनिष्ट ह्मणजे ब्राह्मण आणि राजर्षि मुक्त होतीलच. ह्मणून भक्ति हीच मोक्षप्राप्तीला कारण होते. तर अनित्य व दुःखमिश्रित असें स्वर्गादिकांतलें सुख तें क्षुद्र आहे, अशी त्या सुखाची उपेक्षा करून, सुखलेशविधुर अनित्य शरीर प्राप्त झालें असतां, नित्य सुखप्राप्तीला साधन असलेलें ज्ञान प्राप्त करून घेऊन, माझ्या सेवेंत तत्पर असावें. हे अर्जुना, हें तुझें शरीरही अनित्य ( नाशवंत ) असल्यामुळें, विलंब न करितां, अनित्य सुखप्राप्तीचा उद्योग सोडून, नित्यसुख प्राप्त व्हावें ह्मणून, माझें भजन कर; मागील श्लोकांत 'पापयोनयः' या शब्दांनीं, पापामुळें ज्यांना स्त्रीजन्म प्राप्त झाला आहे असे पुरुष जीव, असा अर्थ घेतला आहे. परंतु, येथें स्त्री जीव पापामुळें पुरुषजन्म पावले असा अर्थ घेतला नाहीं. कारण पापादिकांचे निमित्तानें स्त्री जीवांला पुरुषजन्म प्राप्त होत नाहीं. एखाद्या पुरुषांत स्वाभाविक पुरुषत्व असलें तरी, पापादिकांमुळें त्यांस स्त्रीत्व प्राप्त होतें. अशांनीं उत्तम असे जे ब्राह्मण व क्षत्रिय त्यांच्या कुळांत जन्म घेतला तर तें स्त्रीत्वच पुण्याला साधन होतें. मुक्तीस जातांना

त्यांचें स्वाभाविक पुरुषत्व त्यांस प्राप्त होतें. पुरुषाला पापामुळें किंवा स्त्रीजन्माची इच्छा करून देहत्याग केल्यामुळें, स्त्रीत्व प्राप्त होत असलें तरी, स्वाभाविक ज्या स्त्रिया त्यांस पुरुषत्व कधींही प्राप्त होत नाहीं. एखाद्या देव, किंवा ऋषी इत्यादिकांच्या वरदानानें स्त्रियांस पुरुषत्व प्राप्त होण्याचा संभव आहे तरी त्या पुरुषजीवांच्या देहांत राहून वरदानाचें फळ भोगिल्यावर त्यांस पुनरपि स्त्रीत्व प्राप्त होतें. याशिवाय स्त्रियांस स्वतंत्र असा पुरुषदेह प्राप्त होत नाहीं, असें जाणावें.॥३३॥

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ॥**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥**

**इति श्रीमद्भगवद्गीता सूपनिषत्सु राजविद्या-राजगुह्ययोगोनाम नवमोऽध्यायः ॥९॥**

भजनप्रकारंदर्शयंस्तस्यफलमाह । मन्मनाइति । मन्मनस्त्वादिप्रकारैः मत्परायणः सन्मय्यात्मानं मनोयुंक्त्वा मामेवैष्यसि ॥ ३४ ॥

इति श्रीमद्भगवद्गीताविवृत्तौ विद्याधिराजभट्टोपाध्यायविरचितायाम् श्रीमध्वमतानुवर्तिनी व्याख्योपेतायाम् नवमोऽध्यायः ॥ ९ ॥

भजनाचे प्रकार सांगून त्याचें फळ सांगतातः--हे **अर्जुना**, माझे ठायींच मन ठेवून, माझ्या भक्तींत रत होऊन, परात्पर वस्तु मीच आहे असें जाणून, मला उद्देशून, यज्ञयागादि सत्कर्में करीत जा. चराचरात्मक सर्व जगांत राहणारा, सर्व जीवजडापासून अत्यंत भेदयुक्त, ( अगदीं निराळा, ) अलौकिक, सच्चिदानंदमयमूर्ति असा मीच आहे असें समजून, सर्व ठिकाणीं भक्तियुक्त अंतःकरणानें, त्या त्या तारतम्यानुसार--शास्त्रोक्त विधिप्रमाणें--मला नमस्कार करीत जा, असें पूर्वीं सांगितलें आहे त्याप्रमाणें माझें कीर्तन, श्रवण, स्मरण, ध्यान इत्यादिकांत चित्त ठेविल्यानें रमा किंवा ब्रह्मरुद्रइंद्रादिक जीवजडात्मक सर्व प्रपंच विलक्षण, सच्चित्सुखमूर्ति असा जो मीं ज्या ठिकाणीं राहतों तेथें ह्मणजे पुनरावृत्तिरहित, निर्दोष, अशा नित्यसुखात्मक मुक्तिस जाशील. ह्मणून मला संतोष देणारें आणि तुझ्या वर्णाश्रमाला योग्य असें युद्धरूप जें सत्कर्म, तें करण्याकरितां आळस सोडून तयार हो. ॥ ३४ ॥

येथें श्रीमदिन्दिराकान्ततीर्थ श्रीपादविरचित प्राकृत टीकेचा नववा अध्याय समाप्त झाला.

# अथ दशमोऽध्यायः

श्रीभगवानुवाच ।

**भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः ॥**
**यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥ १ ॥**

श्रीगुरुभ्यो नमः । षष्ठोक्तं ज्ञानं नवमांते मन्मनाभवेति स्मारितं ध्यानार्थं रसोहमित्यादिना ऋतुरित्यादिना चोक्त्वा भूयोत्र प्राधान्येन प्रपंच्योच्यते । तत्रादौ भगवतोबुद्ध्यादिमहर्ष्यादि विशेषकारणत्वं प्रतिज्ञापूर्वकं प्रतिपादयन्नाह । भूयएवेत्यादिना । प्रीयमाणाय श्रुत्वा संतोषं प्राप्नुवते । हितकाम्यया हितेच्छया यद्वक्ष्यामि तद्वचः शृणु॥१॥

सहाव्या अध्यायांत सांगितलेलें जें ज्ञान तें व नवव्या अध्यायाचे शेवटीं "मन्मनाभव" या वाक्यानें स्मारित (स्मरण दिलेलें) जें ध्यान त्याचें विशेषेंकरून या दहाव्या अध्यायांत वर्णन करितात; प्रथमतः श्रीहरी नारायण हे, बुद्ध्यादिकांस किंवा महर्ष्यादिकांस मुख्य कारण मीच आहे, ह्मणून प्रतिज्ञापूर्वक प्रतिपादन करितातः-श्री भगवान् कृष्ण ह्मणतात, हे बाहुशाली अर्जुना, ज्या अर्थी माझें वचन ऐकून तुला संतोष होतो, त्या अर्थी माझें माहात्म्य दाखविणारें असें माझें वचन तुझ्या हिताकरितां मी सांगतों तें ऐक; ते ऐकल्यानें तुझें निरंतर कल्याण होईल. ॥ १ ॥

**न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ।**
**अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥ २ ॥**

उपलक्षणार्थं सुरगणा इत्यादि प्रभवं प्रभावं मद्वशां जगदुत्पत्तिं वा यद्वा प्रभवं ममोत्पत्तिं न विदुः अभावादेव यद्यस्ति तर्हि देवादयः सामान्यतोपि जानीयुः सामान्यतः सर्वज्ञत्वात् न च जानंति अतोनास्तीति भावः तत्र हेतुरहमिति आदिरुत्पत्तिरित्यर्थः । सर्वस्यापि देवादेरुत्पत्तिरपि यदधीना कुतस्तस्योत्पत्तिरितिभावः । भगवत्प्रभावतदधीनजगदुद्भवौच सामान्यतोदेवादिभिर्ज्ञाताविति श्रुत्यादिसिद्धत्वात्तयोरभावोन शंकनीयः ॥ २ ॥

माझें सामर्थ्य देवगण किंवा भृगुआदिकरून ऋषीही जाणत नाहींत, किंवा ह्या सर्व जगाची उत्पत्ति, स्थिति आणि लय हीं करणारा मीच आहें, असें ते निश्चयानें पूर्णपणें समजत नाहींत; मी देव, ऋषी, गंधर्व इत्यादिकांचा उत्पत्तिकर्ता आहें, परंतु माझी उत्पत्ति ते देवादिक सामान्यपणानेंही जाणत नाहींत. जर खरोखरच मला उत्पत्ति असती तर,—जरी सर्वज्ञ कोणीच नाहीं तरी—त्यांतले कोणीतरी साधारणपणें माझी उत्पत्ति जाणत असते. परंतु ज्यापेक्षां ते माझ्या उत्पत्तिविषयीं कांहींच जाणत नाहींत त्याअर्थी मला उत्पत्ति नाहीं असें होतें. सर्व देवादिकांस उत्पन्नकर्ता जो मीं त्या मला उत्पन्न करणारा कोण आहे, मी सदोदित स्वतंत्र आहें; आणि हें जग अस्वतंत्र असून तें माझ्यापासूनच उत्पन्न झालेलें आहे. देवादिक हे सर्वज्ञ नसलें तरी आपआपल्या योग्यते प्रमाणें त्यांनां प्राप्त झालेलें जें ज्ञान, त्या ज्ञानानें सामान्येंकरून ही गोष्ट जाणणार होते, हा विषय वेदशास्त्रादिकांनीं सिद्ध झालेला आहे. ह्मणून त्याविषयीं तूं अगदीं शंका घेऊं नको. ॥ २ ॥

## यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् ॥
## असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥ ३ ॥

अनश्चेष्टयिता आदिश्च सर्वस्येत्यनादिः । अनस्य मुख्यप्राणस्याप्यादिर्वा तं भ्रांतिरहितः मर्त्येषु मनुष्येषु ॥ ३ ॥

जो मनुष्य मला, सर्व जगाचा प्रेरक, जगदादिकालीं मुख्य प्राणचेष्टक, ( प्रेरक ) उत्पातिनाशादि दोषरहित, सर्व लोकांचा स्वामी असें समजतो, तो मोहरहित होऊन, सर्व पापांपासून मुक्त होतो. ॥ ३ ॥

## बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः ॥
## सुखं दुःखं भवो भावो भयं चाभयमेव च ॥ ४ ॥

सर्वं कारणत्वं प्रथयति । बुद्धिरित्यादिना । बुद्धिरंतःकरणं बुद्धिर्बोधनिधित्वातदंतःकरणमुच्यत इत्यभिधानात् कार्याकार्यविनिश्चयोवा ज्ञानं प्रतीतिः । ज्ञानं प्रतीतिर्बुद्धिस्तु कार्याकार्यविनिर्णयइत्यभिधानात् असंमोहोऽकार्येच्छाराहित्यं मिथ्याज्ञानाभावोवा । क्षमा

क्रोधाभावेन सहापकर्तुरनपकरणं । अक्रोधदोषकृच्छत्रोः क्षमावान्स-निगद्यतइत्यभिधानात् । सत्यं यथार्थभाषणं यथार्थज्ञानपूर्वकरणंवा ऋतं-यथार्थ विज्ञानं सत्यं तत्पूर्विकाकृतिरितिवचनात् । दमइंद्रियनिग्रहः शमःपरमात्मनिष्ठा शमोमन्निष्ठताबुद्धेर्दमइंद्रियनिग्रहइतिवचनात् सुखम-नुकूलवेदनीयं भवउत्पत्तिः अभावोऽसत्यं भयंत्रासः अभयं तद्विपरीतम् ४

सर्वांला कारण मीच आहें असें ह्मटलें त्याचें विस्तारानें वर्णन करि-तातः—माझ्यापासूनच सर्व भूतांला, अंतःकरण व कार्याकार्याचा निश्चय, वस्तूंचे यथार्थज्ञान, अकार्याविषयीं बुद्धी न होणें, क्रोधद्वेषादिक नसल्यानें शत्रूंससुद्धां न दुखवितां त्याला क्षमा करणें, यथार्थ--सत्य—भाषण, यथार्थज्ञान-पूर्वक कर्म करणें, इंद्रियनिग्रह हाच दम, भगवंताचेठायीं निष्ठा ठेवणें हाच शम, अनुकूल—वेदनीय—सुख व प्रतिकूल वेदनीय दुःख, उत्पत्ति, नाश, त्रास, आणि अभय, हीं सर्व प्राप्त होतात असें समज. ॥ ४ ॥

**अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः ॥**
**भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥ ५ ॥**

अहिंसा परपीडानिवृत्तिः समता द्वंद्वादिराहित्यं तुष्टिरलंबुद्धिः । अलंबुद्धिस्तथातुष्टिरित्यभिधानात् तपोब्रह्मचर्यादि ब्रह्मचर्यादिकंतप-इत्यभिधानात् दानं न्यायार्जितधनस्य परस्वत्वापादानं यशः कीर्तिः अयशो दुष्कीर्तिः एते नानाविधाबुद्ध्यादयो भावाः प्राणिनां मत्सका-शादेव भवन्ति ॥ ५ ॥

कोणालाही पीडा न देणें, रागद्वेषादि द्वंद्वें नाहींशीं होणें, अलंबुद्धि, ब्रह्मचर्यादिक तप, श्रवण, न्यायानें मिळविलेल्या द्रव्याचें सत्पात्रीं दान देणें, सर्वजगांत सत्कीर्ति होणें आणि निंदेला कारण भूत अपकीर्ति, याप्रमाणें अनेक प्रकारचे बुध्यादिक स्वभाव माझ्यापासूनच उत्पन्न झाले आहेत, असें खरोखर समज. ॥ ५ ॥

**महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा ॥**
**मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥ ६ ॥**

किंच पूर्वे सप्तमहर्षयः मरीचिरत्र्यंगिरसौ पुलस्त्यः पुलहः क्रतुः । वसिष्ठश्च महातेजाः पूर्वे सप्तर्षयः स्मृताइतिप्रसिद्धाः चत्वारो मनवः पूर्वे स्वायंभुव स्वारोचिष रैवतोत्तमाः । यद्वा मनवो बोधवैशिष्ट्याद्देवा ब्रह्मादयः स्मृताः । विप्रादिवर्णभेदेन चत्वारोबहवोपिते इत्युक्ता देवाः लोके इमाः प्रजाः वर्तमानाः प्रजा येषां पुत्रपौत्रादिरूपेण वर्तंते मत्तोभावोजन्म येषां ते मद्भावा येच ब्रह्मणोमनसा जातास्तेपि मद्भावाः ब्रह्मादयस्तु निमित्तमात्रं । उक्तंच । निमित्तमात्रमीशस्य विश्वसर्गनिरोधयोः । हिरण्यगर्भः शर्वश्च कालाख्यारूपिणस्तवेति ॥ ६ ॥

पहिल्या मन्वंतरांतील मरीच्यादि सात ऋषि, ( मरीचि, अंगिरा, अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु आणि वसिष्ठ ) स्वायंभुवादि चार मनु, ( स्वायंभुव, स्वारोचिष, रैवत आणि उत्तम ) हे सर्व ब्रह्मांतर्यामीं राहणारा जो मीं त्या मजपासून उत्पन्न झालेले आहेत; आणि त्यांपासून पुत्रपौत्रादि परंपरेनें झालेली प्रजा, सर्व जगांत भरली आहे, तीही माझ्याच सत्तेनें उत्पन्न झालेली आहे, अथवा विशिष्टज्ञान प्राप्त झालें असल्यामुळें, ब्रह्मादिसुरगणच ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र अशा चार भेदानें श्रीहरीपासून उत्पन्न झाले आहेत असें समजावें; आणि माझ्या सत्तेनें त्यांपासून उत्पन्न झालेली पुत्रपौत्रादि प्रजा या लोकांत भरली आहे. ब्रह्मदेवाच्या मनापासून उत्पन्न झालेले सनक, सनंदन, सनत्कुमारादि मानसपुत्र तेही माझ्याच सत्तेनें उत्पन्न झाले आहेत. लोकांची उत्पत्ति व नाश याला ब्रह्मादिदेव केवळ निमित्त मात्र आहेत, ब्रह्माचेठायीं ब्रह्मनामक व रुद्राचेठायीं रुद्रनामक कालरूपी मी ब्रह्मादि जीवनियामक होऊन मीच सृष्टिनाश इत्यादि कृत्यें करितों. ह्मणून माझ्याशिवाय स्वतंत्रपणानें सृष्टि इत्यादि करणारा असा, देव किंवा मनुष्य यांत कोणीही नाहीं, असें समज. ॥ ६ ॥

**एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः ॥**
**सोऽविकम्पेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥ ७ ॥**

उक्तमहात्म्यज्ञानस्य फलमाह । एतामिति । विशिष्टभवनं विविधभवनंवा विभूतिः । युज्यते शक्यमनेनेति योगः सामर्थ्यं अविकंपेन निश्चलेन ॥ ७ ॥

पूर्वीं सांगितलेलें महत्वज्ञान प्राप्त झालें असतां काय फळ मिळतें तें सांगतातः—जो ही माझी विविधभवनरूप शक्तीची विभूति किंवा योगसामर्थ्य यथार्थ जाणतो, तो मनुष्य निश्चळ अशा माझ्या ध्यानांत मग्न होतो. या विषयीं संशय धरूं नकों. ॥ ७ ॥

**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ॥**
**इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विताः ॥ ८ ॥**

**उक्तफले विश्वासजननार्थं संति च तथा भजंतः केचिदित्याह । अहमित्यादिना । प्रभवत्यस्मादिति प्रभवउत्पत्तिहेतुः भावेन भक्त्या समन्विताः ॥ ८ ॥**

सांगितलेल्या फळाविषयीं विश्वास उत्पन्न व्हावा ह्मणून, कित्येक ज्ञानीं त्याप्रमाणें माझें भजन करितात, ह्मणून सांगतातः—मी सर्व जगाला कारण आहें. माझ्या सत्तेनेंच या जगाची प्रवृत्ति होते असें जाणून ज्ञानी भक्तीनें माझें भजन करितात. ॥ ८ ॥

**मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम् ॥**
**कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च ॥ ९ ॥**

**कथं भजंते मच्चित्ताः मद्गतप्राणाः मद्विषयचेष्टाः श्रोतृभ्यः कथयंतः ॥ ९ ॥**

तो भजनप्रकार स्पष्ट करून सांगतातः—माझ्याठायीं चित्त ठेवून, सर्व-इंद्रियें माझ्या पूजनास लावणारे, वेदादिकांनीं वर्णिलेलें माझ्या स्वरूपाचें ज्ञानाचा भक्तिमान् शिष्यास उपदेश करणारे, हरिकथामृतपानांत रत होऊन, विषयालंबुद्धि-युक्त होत्साते रमारमणाचें विचित्र चरित्र कानांनीं ऐकून आपल्या आत्म्याला रमवितात. ॥ ९ ॥

**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ॥**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ॥ १० ॥**

**सततयुक्तानां मयि निबद्धचित्तानां तमेव बुद्धिरूपमुपायं ददामि येन बुद्धियोगेन ॥ १० ॥**

प्रीतीनें माझ्या भजनांत रत झाले आहेत अशा ज्ञान्यांना बुद्धियोग मी देतों. ज्याच्या योगानें साधुजन दुस्तर अशा संसारसागराचे पैलतिरास जाऊन, नित्यसुखात्मक मुक्तींत आनंदानें रहातात, असें समज. ॥ १० ॥

**तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः ॥**
**नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥ ११ ॥**

अनुकंपार्थमनुग्रहार्थं अज्ञानजं तमः संसारं आत्मभावे चित्ते वृत्तौ विषयतया स्थितः भास्वता प्रकाशमानेन ज्ञानाख्येन दीपेन नाशयामि ॥ ११ ॥

अशा त्या भक्तांवर मी अनुग्रह करून, चिन्मयमूर्ति असा जो मी तो त्यांच्या बुद्धीच्याठायीं राहून, प्रकाशित केलेल्या ज्ञानदीपानें, अज्ञान ह्मणजे संसाराचेठायीं आसक्तिरूप असलेला अंधकार त्याचा नाश करितों. ॥ ११ ॥

अर्जुन उवाच

**परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् ॥**
**पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥ १२ ॥**

एवं सामान्यतो भगवतो विभूतियोगं श्रुत्वा विस्तरेण ज्ञातु-कामोऽर्जुन उवाच । परमित्यादिना । परं उत्तमं ब्रह्म परिपूर्णं परं धाम तेज आश्रयोवा परमं पवित्रं यद्वस्तु श्रुत्यादिसिद्धं तद्भवान् नारदादयो ज्ञानिनः त्वामेव पूर्णषाड्गुण्यादिविशेषेण विशिष्टं विशिष्टभवनात् विविधभवनाच्च विभुमाहुः ॥ १२ ॥

याप्रमाणें सामान्यतः भगवंताच्या विभूति श्रवण करून, त्या विस्तार-पूर्वक ऐकण्याची इच्छा करणारा अर्जुन प्रश्न करितो, हे भगवंता, सर्वोत्तम असें सद्गुणपरिपूर्ण ब्रह्म, उत्तम तेज किंवा त्या तेजाचा आधार, पवित्रांत अति पवित्र, श्रुतिसिद्धवस्तु, शाश्वत, भक्तांचें अभीष्ट पूर्ण करणारा पुरुष, षड्गुणादि अखिल ऐश्वर्य-संपन्न, रमा, ब्रह्मा, आदिकरून जीवांला आधार, उत्पत्त्यादिदोषरहित, जगाच्या विविधकारणाला कारण, विचित्रशक्ति, अनंत

सद्गुणांचें स्थान असा तूंच भगवान् श्रीहरी आहेस, असें वक्ष्यमाण अनेक ऋषि सांगतात; ते कोण कोण ह्मणशील तर ऐक. ॥ १२ ॥

**आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा ।**
**असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥१३॥**

अहं सर्वस्येत्यादिना स्वयमेव ब्रवीषि ॥ १३ ॥

देवर्षि नारद, असित, देवल, व्यास इत्यादि अनेक ऋषि, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें तं सर्वोत्तम आहेस असें वर्णन करितात; आणि, " अहंसर्वस्य प्रभवः " इत्यादि वचनानें तूंही आपल्या तोंडानें तसेंच सांगतोस. ॥ १३ ॥

**सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ।**
**नहि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥१४॥**

अतो यन्मांप्रति वदसि सर्वमेतन्माहात्म्यं ऋतं सत्यं मन्ये न प्रशंसामात्रं । हे भगवन् ज्ञानशक्तिबलैश्वर्यतेजोयशोनिधे ते व्यक्तिं देवादयो न विदुः ॥ १४ ॥

हे भगवन् श्रीकृष्णा, माझें कल्याण व्हावें ह्मणून तूं आपल्या ऐश्वर्याचें जें वर्णन करितोस तें सर्व खरें आहे असें मी समजतों; किंवा तुझी विचित्रशक्ति सुरासुरनरतिर्यगादिजीवगण संपूर्णपणें जाणत नाहींत, हेंही मी निश्चयानें समजतों. ॥ १४ ॥

**स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ।**
**भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥ १५ ॥**

त्वं स्वयमेव स्वात्मानमात्मना स्वसामर्थ्येन वेत्थ भूतानां भावन उत्पादक भूतानामीश नियामक ॥ १५ ॥

क्षररूप ब्रह्मादिजीवगण किंवा अक्षररूपी रमा, या उभयतांहून स्वातंत्र्यादि संपूर्ण गुणांनीं उत्तम, सर्व जीवजडादि प्रपंच उत्पन्न करणारा, जगत्प्रकाशक असे जे सूर्य, चंद्र आणि अग्नि यांचा स्वामी, ब्रह्मदेवादि सर्व देवांनीं वंद्य, जगाच्या अधिपते, श्रीकृष्णा, तूंच आपल्या सामर्थ्यानें आपलें

स्वरूप साकल्यानें यथार्थ जाणतोस; तें स्वरूप, अल्पज्ञ आणि अस्वतंत्र असे जीव कसें जाणतील ? ॥ १५ ॥

**वक्तुमर्हस्यशेषेण दिव्याह्यात्मविभूतयः ।**
**याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥१६॥**

दिव्या याः आत्मविभूतय आत्मनः विविधभूतयः नानाभूतानि रूपाणि ताः अशेषेण मद्योग्यतानुसारेण वक्तुमर्हसि । द्वितीयार्थे व्यत्ययेनवा प्रथमा । याभिर्विभूतिभिरिमाँल्लोकान्नियामकत्वेन व्याप्य तिष्ठसि ॥ १६ ॥

सर्व जीवगणांला अप्रत्यक्ष अशा स्वरूपांनीं तूं सर्व जगाला व्यापून आहेस, अशा ज्या अद्भुत रूपाच्या जितक्या व्यक्ति, ( विभूति ) मीं जाणण्याला समर्थ आहें तेवढ्या, सांगण्यास तूं निश्चयानें योग्य आहेस. ॥ १६ ॥

**कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिन्तयन् ।**
**केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया ॥१७॥**

हे योगिन्नचिंत्यशक्ते त्वां सदा परिचिंतयन् त्वद्ध्यानार्थं प्रवृत्तः ध्येयं त्वां कथं विद्यां बुद्धिज्ञानादाविवान्येषु केषु केषु वस्तुषु मया चिंतनीयोसि ॥ १७ ॥

हे भगवान् श्रीकृष्णा, तुझी शक्ति अचिंत्य असून तूं षड्गुणैश्वर्यसंपन्न आहेस; मीं तुझें निरंतर चिंतन करीत असतां कोणकोणत्या वस्तूंचेठायीं तुझीं रूपें मला कशीं समजतील ? बुद्धिज्ञानादिकांत माझी सच्चिन्मूर्ति त्यांचे प्रेरणेकरितां आहे ह्मणून पूर्वीं सांगितलें, त्याप्रमाणें आणखीं कोणत्या वस्तूंत तुझीं रूपें आहेत असें समजून ध्यान करावें ? ॥ १७ ॥

**विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन ।**
**भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम् ॥ १८ ॥**

अतः संक्षेपेणोक्तमपि विभूत्यादिकं विस्तरेण पुनः कथय । त्वयोच्यमानं त्वन्महिमामृतं शृण्वतो मे अलंबुद्धिर्नास्ति । हिशब्दो-

भगवताप्येतदवगतमितिद्योतनार्थः । द्विविधं वैभवं विष्णोः प्रत्यक्षं च तिरोहितं । कपिलव्यासकृष्णाद्यं प्रत्यक्षं वैभवं स्मृतं । भिन्नं ब्रह्मादिजीवेभ्योजडेभ्यश्चापि तद्गतं । स्वजात्याधिक्यदं तेषां तत्तिरोहितवैभवमित्यादि प्रमाणसिद्धं ॥ १८ ॥

पूर्वीं याविषयीं ( अध्याय ९ श्लोक १६।१७।१८।१९ ) भगवंतांनीं सांगितलें असून, पुनः तोच प्रश्न अर्जुनानें कां केला ? अशी शंका येईल तिचें समाधान असें:–तूं आपल्या मुख्य मुख्य विभूति सांगितल्या आहेस तरी, हे दुर्जनसंहारका **श्रीकृष्णा**, ( तुझ्या ) त्या विभूति विस्तारानें मला सांग; कारण उपदेशपर असें तुझें माहात्म्य तुझ्या मुखानें ऐकून, ( कितीही ऐकिलें तरी ) माझी तृप्ति होत नाहीं. याकरितां तें उपदेशामृत आणखीं ( विस्तारानें ) मला सांग; ( भगवंताचीं वैभवरूपें दोनप्रकारचीं आहेत. त्यांतलीं कित्येक प्रत्यक्ष दिसणारीं आणि कित्येक तिरोहित आहेत; त्यांत कपिळ, व्यास, श्री रामकृष्णादिक, परमात्म्याचे अभिन्नांश अवतार, यांला प्रत्यक्ष रूपें ह्मणतात; आणि, परमात्म्याहून भिन्न ब्रह्मरुद्रादि जीव जड पदार्थ यांत असणारीं, त्यांच्या त्याच्या जातीचें उत्तमत्व दाखविणारीं भगवंतांचीं रूपें यांला तिरोहित अशी संज्ञा प्रमाणसिद्ध आहे. ) ॥ १८ ॥

श्रीभगवानुवाच

**हंत ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः ॥**
**प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यन्तो विस्तरस्य मे ॥१९॥**

द्विविधाविभूतिरुपासनार्थं भगवानुवाच । हंतइत्यादिना । प्राधान्येन प्रधानभूताः काश्चिद्विभूतीः कथयिष्यामि मे विभूतिविस्तरस्यांतोवधिर्नास्ति ॥ १९ ॥

स्वरूपभूत आणि अंतर्यामिभूत अशा दोन प्रकारच्या विभूति भक्तांच्या उपासनेकरितां भगवान् श्रीकृष्ण सांगतात:–हे कुरुकुलश्रेष्ठा **अर्जुना**, दिव्य अशीं आत्मस्वरूपें व मुख्य मुख्य विभूतिरूपें तुला संक्षेपानें सांगतों; कारण हीं विस्तारपूर्वक सांगेन ह्मटलें तर माझ्या स्वरूपांचा अंत नाहीं, आणि तीं सर्व ऐकण्याची शक्तीही तुझ्यांत नाहीं. ॥ १९ ॥

अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः ॥
अहमादिश्च मध्यं च भूतानामन्त एव च ॥ २० ॥

गुडाका निद्रा तस्याईशः जितनिद्रः अहमात्मा आततगुणः सर्वेषां भूतानामाशयेषु हृदयेषु नियामकतया स्थितः । अहमेव भूतानामादिश्च मध्यं चांतश्च । सर्वोत्पत्तिस्थितिप्रलयहेतुरित्यर्थः ॥ २० ॥

हे विजयिन् अर्जुना, सर्व प्राण्यांच्या अंतःकरणांत नियामक रूपानें असणारा, अनंतगुणपरिपूर्ण, ज्यानें सर्व ( चराचर ) व्यापिलें आहे असा श्रीहरी मीच होय; सर्व प्राणिमात्रांची उत्पत्ति, स्थिति आणि लय, हीं ब्रह्मरुद्रादि भिन्नरूपानें, अथवा स्वरूपभूत ( अभिन्नांश ) विष्णु आदि अवतार धारण करून मीच करणारा आहें, असें समज. ॥ २० ॥

आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान् ॥
मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥ २१ ॥

अत्र शश्यादिषु विजातीयस्वाम्यदत्वेनोक्तोभगवान् नक्षत्रादीनां विजातीयत्वात् सत्वं सत्ववतामित्यादौ धर्मिषु सत्वादिसारदत्वेनोक्तः रुद्राणां शंकरइत्यादौ शंकरादीनां सजातीयश्रैष्ठ्यदत्वेनोक्तः देवानामस्मिवासवइत्यादौ वासवादीनां सजातीयैकदेशश्रेष्ठ्यदत्वेनोक्तः । तदुक्तं । शश्यादिषु विजातीय साम्यदः सारदः क्वचित् । शर्वादिषु सजातीयश्रैष्ठ्यदत्वेन संस्थितः । शक्रोशनार्जुनाद्येषु सजातीयैकदेशतः । देवेष्वभ्यधिकोब्रह्मा यतोविष्णोरनंतरः । कवित्वादिगुणैश्चैव यत्समोनास्ति कश्चन । तथा भीमश्च पार्थेषु ज्ञानं यज्ञेषु चोत्तमम् । सुदर्शनश्चायुधेषु वेदेष्वृग्वेदएवचेत्यादि क्वचित्साम्न आधिक्यमभिमानिव्यपेक्षया २१

बारा सूर्यांत सर्वव्यापी असा विष्णुनामक सूर्य मी; प्रकाशक वस्तूंत सूर्यांतर्गत श्रीनारायण तो मीच; वायूंमध्यें मरीच्यंतर्गत मरीचिनामक परमात्मा तो मी; नक्षत्रांमध्यें चंद्रांतर्गत शशिनामक परमात्मा मीच आहें असें जाण; येथें चंद्रादिकांत, विजातीय नक्षत्रगणांहून चंद्रास श्रेष्ठत्व देणारा श्रीभगवान् ह्मणजे चंद्रांतर्यामी **श्रीकृष्ण** होय असें सांगितलें आहे, ' सत्वंसत्ववतां '

अशा वाक्यानें, सात्विक धर्मवंत लोकांस सात्विक फळ देणारा सत्वांतर्यामी परमात्मा सांगितला आहे. ' रुद्राणांशंकरश्चास्मि ' इत्यादि वाक्यांत, समान जातीय रुद्रगणांपेक्षां शंकरास श्रेष्ठत्व देणारा शंकरांतर्यामी श्रीपति सांगितला आहे. " देवानामस्मिवासवः " इत्यादि वाक्यांत, सजातीय देवगणैकदेशांत श्रेष्ठत्व देणारा वासवांतर्यामी वासुदेव, सांगितलेला आहे. रुद्रादिदेवगणांत, लक्ष्मीनारायणाशिवाय, ब्रह्मदेव श्रेष्ठ त्याचे अंतर्यामीं रहाणारा विष्णु सांगितला आहे. कारण, सृष्टीच्या आदिकाळीं तो ( ब्रह्मा ) प्रथम उत्पन्न झालेला असून, भगवद्भक्ति, कवित्व इत्यादि गुणांविषयीं लक्ष्मीपरमात्मव्यतिरिक्त, ( त्या सारखा ) कोणी नाहीं. त्या प्रमाणेंच पृथापुत्रांमध्यें भीमासारखा दुसरा श्रेष्ठ नाहीं; यज्ञादिक जीं पारलौकिक साधनें, त्यांत ज्ञानासारखें दुसरें साधन नाहीं; आयुधांत भगवंताचें आयुध जें सुदर्शन त्यासारखें श्रेष्ठ आयुध दुसरें नाहीं; सर्व वेदांत, ऋग्वेदासारखा भगवंताचें प्रतिपादन करणारा दुसरा वेद नाहीं; कोठें कोठें अभिमानिदेवता दृष्टीनें सामवेद श्रेष्ठ असें सांगितलेलें आहे. २१

**वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः ॥**
**इन्द्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ॥२२॥**
**रुद्राणां शङ्करश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् ॥**
**वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम् ॥२३॥**
**पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम् ॥**
**सेनानीनामहं स्कन्दः सरसामस्मि सागरः ॥२४॥**

भूतानां चेतनवतां संबंधिनी चेतना ज्ञानशक्तिः ॥ २२ ॥ ॥ २३ ॥ २४ ॥

वेदांत सामवेदांतर्यामि सामवेद तो मी; देवांत इंद्रांतर्गत वासव नामक मी; इंद्रियगणांत मानसेंद्रियांतर्यामी; प्राणिगणांत चेतनांतर्यामी असून, प्रेरणा करणारा मीं; ॥ २२ ॥ एकादश रुद्रांत शंकरांतर्गत शंकरनामक मी; यक्ष-रक्षोगणांत कुबेरांतर्गत वित्तेश नामक मी; अष्टवसुगणांत अग्न्यंतर्गत पावक नामक मी; पर्वतगणांत मेरुपर्वतास श्रेष्ठत्व देणारा मेरुपर्वतांतर्गत मेरुनामक

मी; ॥ २३ ॥ हे पृथापुत्रा अर्जुना, पुरोहितांमध्यें बृहस्पत्यंतर्गत इंद्रादिदेवगणांचा गुरु बृहस्पति मी; सेनानायकांमध्यें स्कंदांतर्गत स्कंदनामक मी; सरोवरांमध्यें सागरांतर्गत सागरनामक मी. ॥ २४ ॥

**महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् ॥**
**यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥ २५ ॥**
**अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः ।**
**गन्धर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः ॥२६॥**
**उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् ।**
**ऐरावतं गजेन्द्राणां नराणां च नराधिपम् ॥ २७ ॥**

**गिरां पदानां एकमक्षरं प्रणवः जपयज्ञः स्वाध्यायः स्थावराणां गहनानां गभीराणां ॥ २५ ॥ २६ ॥ २७ ॥**

महर्षिगणांमध्यें भृग्वंतर्गत भृगुनामक मी; शब्दगणांत ॐकारांतर्गत मुख्याक्षरशब्दवाच्य मी; ज्ञानयज्ञाशिवाय बाकीचे यज्ञांत जपयज्ञांतर्गत जपयज्ञनामक मी; गंभीरस्थावरांत हिमवत्पर्वतांतर्गत हिमालयनामक मी; ॥ २५ ॥ सर्व वृक्षांत अश्वत्थवृक्षांतर्गत अश्वत्थनामक मी; देवर्षिगणांत नारदांतर्गत मनुष्याला इच्छित ज्ञान देणारा नारदनामक मी, गंधर्वगणांत चित्ररथांतर्गत चित्ररथनामक मी; सिद्धांत माझ्याहून अभिन्न असा कपिल नामक परमात्मा तो मीच; ॥ २६ ॥ अश्वगणांत क्षीरसमुद्रापासून निघालेल्या अश्वांतर्गत उच्चैःश्रवानामक अश्व मी; गजगणांत ऐरावतांतर्गत ऐरावतनामक मी; मनुष्यांत नराधिपांतर्गत नराधिपनामक मी; ॥ २७ ॥

**आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक् ।**
**प्रजनश्चास्मि कन्दर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥२८॥**

**प्रजनः प्रजोत्पादकः कंदर्पः न केवलं भोगार्थं । सर्पाणामेकशिरसां ॥ २८ ॥**

सुदर्शनाशिवाय आयुधगणांत वज्रांतर्गत वज्रनामक मी; धेनुगणांत

कामधेन्वंतर्गत कामधेनुनामक मी; प्रजोत्पत्तीला कारण अशा कामांतर्गत कंदर्पनामक मी; विषयुक्त ज्यांला एक शिर ( डोकें ) आहे अशा सर्पगणांत वासुक्यंतर्गत वासुकीनामक मी; ॥ २८ ॥

**अनन्तश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम् ।**
**पितॄणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम् ॥ २९ ॥**

**नागानां बहुशिरसां शेषः यादसां जलजंतूनां संयमतां नियमनं कुर्वताम् ॥ २९ ॥**

विषरहित असून ज्यांनां पुष्कळ शिरें ( डोकीं ) आहेत अशा सर्पांत शेषांतर्गत अनंतनामक मी; जलजंतुगणांत वरुणांतर्गत वरुणनामक मी; पितृगणात अर्यमांतर्गत अर्यमा मी; शासन करणाऱ्यांत यमांतर्गत यमनामक मी;२९

**प्रह्लादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम् ।**
**मृगाणां च मृगेन्द्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ॥ ३० ॥**

**कलयतां बंधनादिकुर्वताम् ॥ ३० ॥**

दैत्यगणांत प्र्ऱ्हादाला श्रेष्ठत्व देणार प्र्ऱ्हादांतर्गत प्र्ऱ्हाद मी; संहारकगणांत कालांतर्गत काळ नामक मी; मृगगणांत सिंहास श्रेष्ठत्व देणारा सिंहांतर्गत मृगेंद्रनामक मी; पक्षिगणांत गरुडास आधिक्य देणारा गरुडांतर्गत वैनतेयनामक मी; ॥ ३० ॥

**पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम् ।**
**झषाणां मकरश्चास्मि स्रोतसामस्मि जाह्नवी ॥ ३१ ॥**

**पवतां शोधकानां वेगवतां वा झषाणां मत्स्यानां मकरोमत्स्यविशेषः स्रोतसां प्रवाहजलानां गंगा ॥ ३१ ॥**

वेगवानांत किंवा शोधकांत वायूस श्रेष्ठत्व देणारा वाय्वंतर्गत पवमान नामक मी; शस्त्रधाऱ्यांमध्यें माझ्याहून अभिन्न असा शस्त्रधारी राम मीच; मत्स्यगणांत मकरांतर्गत मकर नामक मी; मोठ्या उदकप्रवाहांत भागीरथीस श्रेष्ठत्व देणारा भागीरथ्यांतर्गत जान्हवी नामक मी. ॥ ३१ ॥

**सर्गाणामादिरन्तश्च मध्यं चैवाहमर्जुन ।**
**अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥३२॥**

सृजंत इतिसर्गाः भूतानि तेषां ये सृष्ट्यादिहेतवः तेऽहं अध्यात्मविद्या ब्रह्मविद्या प्रवदतां जल्पवितंडादिकुर्वतां संबंधीतत्वनिर्णयार्थ कथावादः ॥ ३२ ॥

हे अर्जुना, उत्पन्न होणाऱ्या वस्तूस उत्पत्ति, स्थिति आणि संहार हीं होण्यास कारण मी; सर्व विद्यांत ब्रह्मविद्यांतर्गत अध्यात्मविद्या नामक मी; जल्पवितंडादि वाद करणारांत वादांतर्गत सर्वतत्वनिर्णयार्थक कथावाद नामक मी. ॥ ३२ ॥

**अक्षराणामकारोऽस्मि द्वन्द्वः सामासिकस्य च ।**
**अहमेवाक्षयः कालो धाताहं विश्वतोमुखः ॥ ३३ ॥**

सामासिकस्य समाससमूहस्य मध्ये द्वंद्वः समासः सह्युभयपदार्थप्रधानत्वेनोत्तमः अक्षयः कालः अबाधकः कालादिः धाता स्रष्टा विश्वतोमुखश्चतुर्मुखः ॥ ३३ ॥

सर्व अक्षरसमुदायांत अकारवर्णांतर्गत अकार शब्दवाच्य मी; समासांत द्वंद्वसमासांतर्गत उभय पदार्थ प्रधानत्वानें उत्तम द्वंद्वसमास मी; प्रवाहरूपानें असणारा, नाशरहित कालांतर्गत काल नामक परमात्मा मी; चतुर्मुख ब्रह्मदेवांतर्गत विश्वतोमुख नामक मीच आहें, असें जाण. ॥ ३३ ॥

**मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् ।**
**कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ॥३४॥**

सर्वहरोमृत्युश्चाहं भविष्यतामुत्पत्स्यमानानां संबंधी उद्भवउत्पत्तिः यद्वा भविष्यतां भाविशुभानां प्राणिनामुद्भवोऽभ्युदयः नारीणां मध्ये कीर्त्यादयस्त्रियः ॥ ३४ ॥

सर्व संहार करणारांत मृत्यूंतर्गत मृत्यु नामक परमात्मा मी; पुढें जें उत्पन्न होणार त्यांस उत्पत्ति देणारा मी; तसेंच ज्यांचें पुढें ( भविष्यकाळीं ) शुभ ( अभ्युदय ) होणार अशा प्राण्यांस अभ्युदयरूप मी; स्त्रीगणांत कीर्ति,

श्री, वाक्, स्मृति, मेधा, धृति, क्षमा, या नांवानीं प्रसिद्ध स्त्रियांतर्गत त्या त्या ( स्त्री ) नांवाचा परमात्मा मी; असें जाण. ॥ ३४ ॥

**बृहत्साम तथा साम्नां गायत्री छन्दसामहम् ।**
**मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः ॥ ३५ ॥**

**साम्नां रथंतरादीनां छंदसां त्रिष्टुप् जगत्यादीनां गायत्रीच्छंदः कुसुमाकरोवसंतः ॥ ३५ ॥**

रथंतरादि सामगणांत बृहत्सामास श्रेष्ठत्व देणारा बृहत्साम नामक मी; त्रिष्टुप् जगत्यादि छंदोगणांत गायत्र्यंतर्गत गायत्री नामक गानत्राणकर्तृत्वरूप लिंगविशिष्ट परमात्मा मी; मासगणांत मार्गशीर्षमासास आधिक्य देणारा मार्गशीर्षांतर्गत मार्गशीर्षमास मी; ऋतुगणांत वसंतांतर्गत कुसुमाकर नामक ऋतु मीच आहें असें जाण. ॥ ३५ ॥

**द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ।**
**जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम् ३६**

**छलकार्यादीनां संबंधीनि द्यूतादीनि ॥ ३६ ॥**

छलकार्यादि द्यूतगणांत द्यूतांतर्गत द्यूत नामक मी; तेजस्वीगणांत महत्तेजोरूपप्रद असा तेजोनामक मी; जयशाली अशा लोकांत शत्रूवर जय प्राप्त होण्याला कारण जय नामक मी; उद्योगीगणांत उद्योगांतर्गत निश्चयात्मक व्यवसाय नामक मी; सात्विकगणांत सात्विककर्म करविणारा सत्वांतर्गत सत्व नामक परमात्मा मीच आहें असें जाण. ॥ ३६ ॥

**वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पाण्डवानां धनञ्जयः ।**
**मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः ॥ ३७ ॥**

**कवीनां वाग्मिनां उशना शुक्रः ॥ ३७ ॥**

वृष्णिगणांत क्रीडादिगुणविशिष्ट वासुदेवनामक परमात्मा मी; भीमसेनाशिवाय पांडवांत अर्जुनास श्रेष्ठत्व देणारा अर्जुनांतर्गत धनंजयनामक मी; निरंतर वेदार्थाचें मनन करणाऱ्या मुनिगणांत सर्वव्यापी व माझ्या स्वरूपास अभिन्न असा व्यासनामक परमात्मा मी; वचनचतुर कविगणांत शुक्राचार्यास श्रेष्ठत्व देणारा शुक्राचार्यांतर्गत उशना नामक कवि मीच आहें असें जाण. ३७

**दण्डो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम् ॥**
**मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ॥३८॥**

दमयतां दंडं कुर्वताम् जिगीषतां जेतुमिच्छतां गुह्यानां संबंधिषु गोपनेषु ॥ ३८ ॥

दमन करणारांत शिक्षासामर्थ्यांतर्गत दंडनामक मी; जयशील लोकांत नीतिप्रदर्शक नीतिनामक मी; गुप्त ठेवणाऱ्या लोकांत मुनिजनांनीं स्तुति करण्यास योग्य मौनांतर्गत मौननामक मी; ज्ञानिगणांत ज्ञानांतर्गत ज्ञाननामक मीच आहें असें समज. ॥ ३८ ॥

**यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन ॥**
**न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ॥३९॥**

यच्च सर्वभूतानां बीजं कारणं तदप्यहमेव यदि ज्योतिरादिषु रव्यादीनां त्वत्संनिधानकृतवैशिष्ट्यं तर्हि तदन्येषां ज्योतिरादीनां त्वत्सन्निधिर्नस्यादतस्तत्तत्सत्तादिकं स्वतएवस्यादित्यतआह । नतदिति । मया विना यद्भूतं स्यात्तन्नास्ति ॥ ३९ ॥

हे अर्जुना, सर्व प्राणिगणांस आधारभूत जें बीज ह्मणून आहे, तें मीच; जर नक्षत्रादिगणांत सूर्याला श्रेष्ठत्व देणारा सूर्यांतर्गत श्री नारायणरूप तूंच आहेस, तर त्याशिवाय प्रकाशक वस्तूंस तुझें सान्निध्य नसल्यामुळें तीं स्वतंत्र सत्ता चालविणारीं होतील, अशी अर्जुनास शंका येईल असें समजून, श्रीकृष्ण " नतदस्ति " या वाक्यानें सांगतातः–जिला माझें सान्निध्य नाहीं अशी चराचरांत कोणतीही वस्तु नाहीं; ब्रह्मरुद्रादि जगत् सर्व अस्वतंत्र असून माझ्या सत्तेंत आहे; व तें मी प्रेरणा केल्यामुळें त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें कार्याकार्यास प्रवृत्त होतें असें समज. ॥ ३९ ॥

**नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परन्तप ॥**
**एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥ ४० ॥**

संक्षेपकरणे कारणं दर्शयन्नुपसंहरति । नांतइति । विभूतिरूपाणामानंत्यादुक्तोविभूतिविस्तरएष उद्देशतः इदमिदं विभूतिरूपमिति यत्तद्विशेषनामनिर्देशतः सोपि संग्रहएवेति भावः ॥ ४० ॥

मी अनंत सद्गुणभरित, चिन्मय, अनेक रूपांनीं सर्व जगांत भरलेला आहें, असें असून, ( माझीं रूपें–विभूति ) संक्षेपानें सांगण्याचें कारण सांगतातः–श्रीकृष्ण ह्मणतात, हे शत्रुतापका **अर्जुना**, माझ्या अलौकिक स्वरूपांचा अंत नाहीं; ह्मणून तीं तुला संक्षेपानें सांगितलीं, माझीं रूपें अनंत असल्यामुळें, तीं सगळीं सांगण्यास जरी मी समर्थ आहें तरी, तीं तुला समजणें कठीण आहे. आणि आतां अवकाशही नाहीं. ह्मणून, एकेक जातिविशिष्ट वस्तु घेऊन तदंतर्यामी रूपें आणि माझ्याहून अभिन्न स्वरूपी कपिल व्यासादिक अवतार सांगितले तेसुद्धां संक्षेपानेच सांगितले असें समज.॥ ४० ॥

**यद्यद्विभूतिमत्सत्वं श्रीमदूर्जितमेव वा ॥**
**तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसम्भवम् ॥४१॥**

विस्तारकांक्षिणंप्रति सामान्यतोविस्तारमाह । यद्यदिति । यद्विभूत्यादिमत्सत्वं विष्णु कपिलरामद्वयकृष्णव्यासादिकं तत्तन्ममतेजोंशस्यसंभवं प्रादुर्भावमवगच्छ । तथा यद्यद्विभूत्यादिमत्सत्वं श्रीब्रह्मरुद्रादिकं तत्तन्मम तेजोंशेन संभवः संबंधोयस्य तदवगच्छ ॥४१॥

विस्तारानें ऐकण्याची इच्छा करणाऱ्या अर्जुनास सामान्यतः सर्व स्वरूपांचा उपदेश करितातः–हे **अर्जुना**, मोठ्या ऐश्वर्यानें युक्त असें विष्णु, कपिल, भार्गवराम, राम, यादव, कृष्ण, व्यासादिकांचें रूप, तें स्वातंत्र्य, सर्वज्ञता इत्यादि गुणांनीं माझ्याप्रमाणेंच नारायणस्वरूप असें जाण. आणि मी अंतर्यामी असल्यानें विशिष्ट संपत्यादियुक्त, नित्यमुक्त, लक्ष्मी किंवा ब्रह्मरुद्रादि अस्वतंत्र जीवगण माझ्या अंतर्यामी स्वरूपाच्या तेजःसंबंधानें त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें श्रेष्ठ कनिष्ठ योग्यता पावले आहेत, असें जाण. ॥ ४१ ॥

**अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन ॥**
**विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥४२॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु विभूतियोगोनाम दशमोऽध्यायः ॥ १० ॥**

उक्तविस्तरादधिकं विभूतिविस्तारमाह । अथवेति । तत्र तत्र परिच्छिन्नज्ञानादहं कोटिकोट्यैकदेशेन सर्वजगद्व्याप्य स्थितः इत्य-

परिच्छिन्नभगवद्दर्शनं प्रधानमिति ज्ञापनार्थं किं ज्ञातेनेत्युक्तम् । नतूक्तनिष्फलत्वज्ञापनाय अन्यथोक्तेरववैय्यर्थ्यात् । त्वं तु बहुफलप्राप्तियोग्यइति तवेति विशेषणम् । उक्तंच । अन्याधिक्यज्ञापनार्थं शुभं चाक्षिप्यते क्वचित् । नतावतास्य निंद्यत्वं ज्ञेयैवान्यवरिष्ठता । उभयं मिलितं चैव ततोऽभ्यधिकशोभनमिति ॥ ४२ ॥

इति श्रीमद्भगवद्गीताविवृत्तौ विद्याधिराजभट्टोपाध्याय-
विरचितायाम् श्रीमध्वमतानुवर्तिनी व्याख्योपेतायाम्
दशमोऽध्यायः ॥ १० ॥

उक्त विस्तारापेक्षां सुलभ रीतीनें ज्ञान प्राप्त होण्याचें साधन सांगतातः—हे अर्जुना, त्या त्या जातीला विशिष्टत्व देणारा, त्यांच्या ज्ञानाप्रमाणें, कोट्यनुकोटि अंशानें सर्व जगांत मी भरलेला आहें. आपल्या ज्ञानाप्रमाणें माझ्या सर्व विभूतींचें ज्ञान झाल्यानें फलप्राप्ति होते, तरी तूं खरोखर सर्वव्यापि अशा भगवंताचें ज्ञान झाल्यानें मिळणाऱ्या फलाच्या उपभोगास योग्य असल्यामुळें, माझ्या विभूतींचें एकदेशजन्य ज्ञानाचें तुला काय प्रयोजन आहे ? याकरितां, मोठें फळ मिळविण्यास साधन होणारें सर्वव्याप्त अशा माझ्या स्वरूपाचें ज्ञान करून घे; मी हें सर्व जग एका अंशानें व्यापून राहिलों आहें. सर्व स्वरूपांचें ज्ञान झाल्यानें फळ मिळत नाहीं असें समजूं नको. तुझ्या मोठ्या योग्यतेप्रमाणें सर्वव्यापि भगवंताचें स्वरूप तूं पहावयास योग्य आहेस. श्रीकृष्ण भगवानांनीं अर्जुनाची योग्यता मोठी आहे असें दाखविण्याकरितां, आपल्या एकंदर स्वरूपांचें ज्ञान झाल्यानें जें फळ मिळतें त्याची न्यूनता दाखविली, परंतु तेवढ्यावरूनच त्या परमात्म्याच्या, त्या त्या जातीला विशिष्टत्व देणारें, पुष्कळ वस्तूंत रहाणारें अशा स्वरूपाला निंद्यत्व ( कमीपणा येत ) नसून, अधिकाऱ्याची योग्यता मोठी आहे असें मात्र दाखविलें, असें समजावें. त्या त्या वस्तूंत असलेलें परमात्म्याच्या स्वरूपाचें ज्ञान झाल्यानेंही उत्तम फलप्राप्ति होते. तथापि उत्तम अधिकाऱ्यास सर्वत्र व्याप्त असें भगवंताचें स्वरूप समजल्यानें त्याचें अधिक कल्याण होतें. या अभिप्रायानें माझ्यावर विश्वास ठेवून, तुझ्या धर्माला योग्य असें युद्ध केल्यानें, मला संतोष होऊन, तुझें उत्तरोत्तर कल्याण होईल हें तात्पर्य. ४२

येथें श्रीमदिन्दिराकान्ततीर्थ श्रीपादविरचित प्राकृत टीकेचा
दहावा अध्याय समाप्त झाला.

# अथ एकादशोऽध्यायः

अर्जुन उवाच ।

**मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् ॥**
**यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥ १ ॥**

श्रीगुरुभ्यो नमः । अत्र दशमांतोक्तव्याप्तरूपध्यानार्थं विश्वरूपस्थितिरुच्यते । विश्वरूपं भगवंतं ज्ञातुकामः पूर्वोक्तमर्थमनुवदन्नर्जुन उवाच । मदनुग्रहायेत्यादिना । पूर्वं षट्के मामनुगृहीतुमात्मज्ञानतदुपायकर्मसमाधियोगप्रतिपादकं गोप्यं यद्वचः त्वयोक्तं तेनायं मे मोहो विगतो दूरं निरस्तः ॥ १ ॥

या ( अकराव्या ) अध्यायांत सर्व जगद्व्यापक अशा परमात्म्याच्या स्वरूपाचें ध्यान करितां यावें ह्मणून, त्या विश्वरूपाच्या स्थितीचा प्रकार सांगतात:—मुख्य त्या त्या वस्तूंत असलेल्या परमात्म्याच्या ज्ञानानें संतुष्ट झालेला अर्जुन, विश्वव्यापी अशा भगवंताच्या स्वरूपाचें ध्यान व्हावें या हेतूनें, पूर्वोक्त अर्थानुवादपूर्वक, भगवंतास प्रश्न करितो; अर्जुन ह्मणतो हे भगवन् श्रीकृष्णा, तूं माझ्यावर अनुग्रह करावा ह्मणून, पहिल्या सहा अध्यायांत ज्ञानप्राप्तीचा उपाय ह्मणून, कर्मसमाधियोगाचें प्रतिपादन करणारें, अध्यात्म नांवाचें उत्तम गोप्य वचन जें सांगितलेंस, तें ऐकून, माझा सुहृदांविषयींचा मोह, अगदीं नाहींसा होऊन गेला. ॥ १ ॥

**भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया ।**
**त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ॥ २ ॥**

तथा सप्तमादौ भूतानां भवदधीनं जन्मादिकं त्वन्माहात्म्यं चोक्तं मयाश्रुतम् ॥ २ ॥

हे कमलनयना कृष्णा, सर्व प्राणिमात्रांस उत्पत्ति आणि नाश हीं होण्याला कारण तूंच आहेस, असें जें तुझें असदृश ( त्याच्याबरोबरीचें दुसरें नाहीं असें ) आणि अविनाशी ( ज्याला नाश नाहीं असें ) माहात्म्य, तें मी तुझ्या तोंडानेंच ऐकिलें. ॥ २ ॥

**एवमेतद्यथाऽऽत्थ त्वमात्मानं परमेश्वर ॥**
**द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ॥ ३ ॥**

एवमेतत्तथ्यं यथा त्वमात्मानमात्थ ब्रवीषि तं ऐश्वरमचिंत्यशक्तिस्वभावरूपं साक्षात्कर्तुमिच्छामि ॥ ३ ॥

हे क्षराक्षरोत्तम श्रीकृष्णा, संक्षेपानें विश्वरूपाचें माहात्म्य जें तूं सांगितलेंस, तें बरोबरच आहे; हे अघटित घडविण्याची शक्ति असणाऱ्या परमेश्वरा, अचिंत्यशक्तीनेंयुक्त, सर्व जगाला ज्यानें व्यापिलें आहे, असें तुझें विश्वरूप पहाण्याची मी इच्छा करितों. ॥ ३ ॥

**मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो ॥**
**योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥ ४ ॥**

प्रभोऽतींद्रियदर्शनेसमर्थ त्वद्रूपं मया द्रष्टुं शक्यमिति यदि मन्यसे तर्हि मे अव्ययमात्मानं स्वरूपभूतमेव स्वरूपं दर्शय ॥ ४ ॥

अतींद्रिय वस्तु-प्रदर्शन योग्य स्वामी श्रीकृष्णा, तें तुझें विश्वाला व्यापणारें रूप पहाण्यास मी योग्य ( शक्त ) आहें असें तूं समजतोस; तर, नाशरहित व विश्वरूपी अशी तुझी ती अलौकिक सच्चिन्मूर्ति मला दाखीव. । ४ ।

श्री भगवानुवाच

**पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः ॥**
**नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥ ५ ॥**

एवं कौतूहलान्वितेन पार्थेन प्रार्थितो भगवानुवाच । पश्येत्यादिना । एकस्यैवाभिन्नानंतरूपत्वाद्रूपाणि शतशइत्याद्युक्तम् । उक्तंच । एकं रूपं हरेर्नित्यमाचिंत्यैश्वर्ययोगतः । बहुसंख्यागोचरं च विशेषादेव केवलमिति । तानि रूपाणि नानाविधानि दिव्यान्यप्राकृतानि वर्णः शुक्लादिः आकृतिरवयवसन्निवेशः तौ नाना येषां तानि नानावर्णाकृतीनि पश्य ॥ ५ ॥

अर्जुनाच्या प्रश्नानें संतुष्ट होऊन, जगद्व्यापि श्रीकृष्णभगवान्

ह्मणतातः—हे अर्जुना, नानाप्रकारचीं, अलौकिक, शुक्ल ( पांढऱ्या ) कृष्णा ( काळ्या ) दि नाना रंगाचीं व नानाप्रकारच्या अवयवानींयुक्त अशीं, शेकडों व हजारों प्रकारचीं माझीं विचित्र रूपें पहा. येथें श्रीकृष्णभगवान् एकच असून, तो अनेक अभिन्नरूपानींयुक्त झाल्यामुळें "शतशः" इत्यादि सांगितलें आहे; कारण, योग्यांनीं ध्यान करण्यास योग्य, अचिंत्य ऐश्वर्यानेंयुक्त, असें श्रीहरी परमात्म्याचें एकच रूप आहे, तथापि त्याच्या त्याच्या योग्यते-प्रमाणें, बहुसंख्याविशेषानें अनेक अप्राकृत रूपें, अनेक जनांस तो परमात्मा नारायण दाखवितो, असें समजावें. ॥ ५ ॥

**पश्यादित्यान्वसून्रुद्रानश्विनौ मरुतस्तथा ॥**
**बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥ ६ ॥**

**ममैकस्मिन्रूपे आदित्यादीन् पश्य तथा लोके शास्त्रेचादृष्ट-पूर्वाणि बहून्याश्चर्याणि पश्य ॥ ६ ॥**

हे भरतकुलश्रेष्ठा अर्जुना, माझ्या एका रूपाचा आश्रय करून असणारे द्वादशादित्य ( बारा सूर्य ), अष्टवसू, एकादश रुद्र, दोन अश्विनीदेव ( अश्विनी कुमार ), एकुणपन्नास मरुद्गण, असे अनेक देवगण आहेत त्यांप्रत पहा. अनेक देवांला आश्रयभूत अशीं जीं माझीं विचित्र रूपें, तूं व तुझ्या शिवाय कित्येकांनीं न पाहिलेलीं, अति आश्चर्य उत्पन्न करणारीं, फार रमणीय अशीं पहा. ॥ ६ ॥

**इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् ॥**
**मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥ ७ ॥**

**इह ममैकस्मिन्देहे तत्राप्येकस्थमेकदेशस्थं जगत्पश्य यच्चान्य-द्रष्टुमिच्छसि तदप्येकदेशस्थमेव पश्य । त्वद्दिदृक्षितमहं सर्वं दर्श-यिष्यामि ॥ ७ ॥**

हे निद्रा जिंकणाऱ्या ( गुडाकेश ) अर्जुना, या माझ्या देहावर अव-लंबून असणारें स्थावरजंगमात्मक सर्व जग ( एकत्र असलेलें ) आतांच पहा. इतकेंच नव्हे तर, त्याशिवाय आश्चर्यकारक अशा ज्या ज्या वस्तू तूं पाह-

ण्याची इच्छा करीत असशील त्याही माझ्या देहाचा आश्रय करून असतात त्या पहा. तात्पर्य, तुला जी जी वस्तू पाहण्याची इच्छा असेल ती तुझ्या योग्यतेप्रमाणें तुला दाखवितों. ॥ ७ ॥

**नतु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा ॥**
**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥ ८॥**

त्वंत्वनेन प्राकृतेन स्वचक्षुषा मां विश्वरूपं द्रष्टुं न शक्यसे अतस्ते दिव्यं चक्षुर्ददामि मम सामर्थ्यं पश्येति ॥ ८ ॥

हे अर्जुना, तुझ्या या प्राकृत नयनांनीं ( चर्मचक्षूंनीं ) माझें अलौकिक रूप पहाण्यास तूं समर्थ नाहींस; ह्मणून माझें रूप पहाण्यास समर्थ अशी दिव्यदृष्टि तुला देतों. त्या दृष्टीनें, माझी योगैश्वर्य यांची समृद्धि पहा. ८

संजय उवाच ।

**एवमुक्त्वा ततो राजन्महायोगेश्वरो हरिः ।**
**दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ॥ ९ ॥**

अनंतरं वृत्तातं धृतराष्ट्रंप्रति संजयउवाच । एवमित्यादिना ॥९॥

याप्रमाणें भगवान् श्रीकृष्ण अर्जुनास बोलल्यानंतर काय झालें तें संजय धृतराष्ट्रास सांगतोः—हे राजन् धृतराष्ट्रा, मोठें योग्य फळ देणाऱ्या श्रीकृष्णानें याप्रमाणें अर्जुनास बोलून, मग अत्यद्भुत असें आपलें ईश्वर संबंधीं स्वरूप दाखविलें. ॥ ९ ॥

**अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम् ॥**
**अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥ १० ॥**

अनेकवक्त्रेत्यादावनेकशब्दोऽनंतवाची । अनंतबाहुमित्यादेः अनेकमद्भुतानां दर्शनं यस्मिन्नित्यनेकाद्भुतदर्शनम् ॥ १० ॥

अनंत तोंडें व अनंत डोळे यांनीं युक्त, अनेक आश्चर्यकारक वस्तु ज्यांत दिसत आहेत, अनेक दिव्य अलंकारानींयुक्त, अनेक अप्राकृत आयुधांनीं शोभायमान असें स्वरूप दाखविलें. ॥ १० ॥

दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यगन्धानुलेपनम् ॥
सर्वाश्चर्यमयं देवमनन्तं विश्वतोमुखम् ॥ ११ ॥

सर्वाश्चर्यमयं सर्वाश्चर्यात्मकं देवं क्रीडादिगुणयुक्तं अनंतं देशतः कालतोगुणतश्च परिच्छेदरहितं विश्वतोमुखं अनंतमुखं दर्शयामास ११

दिव्यमाळा व वस्त्रें यांनीं युक्त, सुरभोग्य गंधाची उटी ज्यानें ( शरीरास ) लाविली आहे, सर्वांस आश्चर्य वाटण्यासारखें, भुवनैकसुंदर, क्रीडादिगुणविशिष्ट, देशानें, काळानें आणि गुणानें ज्याचा अंत नाहीं, अनंतमुखांनीं शोभायमान, असें आपलें स्वरूप ( अर्जुनास ) दाखविलें. ॥ ११ ॥

दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ॥
यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥१२॥

किंच दिवि आकाशे सूर्यसहस्रस्य युगपदुत्थितस्य या युगपदुत्थिताभाः प्रभा भवेत्तर्हि सा महात्मनोविश्वरूपस्य भासः प्रभायाः कथं चित्सदृशीस्यात् नान्योपमास्तीत्यर्थः अत्र सहस्रशब्दोऽनंतवाची तदपि पाकशासनविक्रमइत्यादिवत्प्रत्यायनार्थमेव भगवतोऽपरिमिततेजस्त्वात् ॥ १२ ॥

हे राजन्, धृतराष्ट्रा, भगवान् श्रीकृष्णानीं अर्जुनाला जें विश्वरूप दाखविलें, त्यास अशी उपमा शोभेल कीं, आकाशांत अनंत सूर्य एकदम उदय पावले असतां ज्याप्रमाणें तेज पडावें, त्याप्रमाणें त्या महात्म्या विश्वरूपी श्रीकृष्णाची प्रभा चोंहोंकडे फांकली; हा दृष्टांतही मंदबुद्धि जनांस समजेल असा सांगितला; ज्याप्रमाणें इंद्रादि देवगणांपेक्षां, अपरिमितशक्तियुक्त असा जो श्रीरामचंद्र, त्या परमात्म्याचा पराक्रम रामायणादि ग्रंथांत, मंदमति जनांस समजण्यासारखाच “ पाकशासन विक्रमः ” इंद्रासारिखा अशा दृष्टांतानें वर्णिला आहे, त्याप्रमाणें हा ( वरील सहस्रसूर्यांचा ) दृष्टांत होय. खरें पहातां त्या परमात्म्याचे विश्वरूपास उपमाच नाहीं. कारण तें रूप अपरिमित तेजोयुक्त आहे. ॥ १२ ॥

तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ॥
अपश्यद्देवदेवस्य शरीरे पाण्डवस्तदा ॥ १३ ॥

तत्र रूपे एकदेशे स्थितम् अनेकधा प्रविभक्तं देवमनुष्यादि नानाभेदेन विकासेन चावस्थितं कृत्स्नं जगदपश्यत् ॥ १३ ॥

देवांनीं नमस्कार करावयास योग्य ( देवाधिदेव ) अशा श्रीकृष्णाच्या त्या विश्वरूपांत, एकाचठायीं सुरासुरनरादि अनेक भेदांनीं निराळें ( परंतु एकाच जागीं असलेलें ) अशा सर्व जगाला आश्चर्यभूत असें रूप अर्जुनानें पाहिलें. ॥ १३ ॥

ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनञ्जयः ॥
प्रणम्य शिरसा देवं कृताञ्जलिरभाषत ॥ १४ ॥

ततोदृष्ट्वा विश्वरूपानुवादव्याजेन स्तोतुमारभते । ततइति ।१४।

याप्रकारचें भगवान् श्रीकृष्णानीं दाखविलेलें विश्वरूप पाहून, त्याच्या वर्णनरूप निमित्तानें अर्जुन स्तुति करितोः—आश्चर्ययुक्त झालेला व अंगावर हर्षरोम आलेला तो अर्जुन, क्रीडादिगुणविशिष्ट अशा परमात्म्या श्रीकृष्णास साष्टांग नमस्कार करून, हात जोडून बोलूं लागला. ॥ १४ ॥

अर्जुन उवाच

पश्यामि देवांस्तव देव देहे
सर्वांस्तथा भूतविशेषसंघान् ॥
ब्रह्माणमीशं कमलासनस्थ-
मृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥ १५ ॥

स्तुतिप्रकारमाह । पश्यामीत्यादिना । ब्रह्माणंचतुर्मुखं कमलासने ब्रह्मणि स्थितमीशं रुद्रम् । उक्तंच । विष्णुं समाश्रितोब्रह्मा ब्रह्मणोंकगतोहरः । हरस्यांगविशेषेषु देवाः सर्वेपिसंस्थिताइति ॥ १५ ॥

पुढें सांगितल्याप्रमाणें अर्जुन स्तुति करूं लागलाः—हे देवदेवोत्तम

श्रीकृष्णा, तुझ्या देहांत सर्व देव, त्याप्रमाणें सर्व प्राणिमात्रांचे विशेष समुदाय, कमळाचे आसनावर बसलेला ब्रह्मदेव, त्या ( ब्रह्मदेवा ) च्या अंकावर बसलेला चंद्रशेखर, ( शंकर ), वसिष्ठादि सर्व ऋषि, अलौकिक अशीं वासुकी आदिकरून सर्पवृंदें, इत्यादि अनेक वस्तू मीं पहातों. लक्ष्मीपति श्रीनारायणाचा आश्रय करून चतुर्मुख ब्रह्मदेव आहे. त्या ब्रह्मदेवाच्या अंकावर रुद्रदेव आहे; आणि त्या रुद्राच्या आश्रयानें सर्व देव आहेत. ॥ १५ ॥

अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं
पश्यामि त्वां सर्वतोऽनन्तरूपम् ॥
नान्तं न मध्यं न पुनस्तवादिं
पश्यामि विश्वेश्वर विश्वरूपम् ॥ १६ ॥

अनंतरूपं असंख्यातरूपं हे विश्वरूप पूर्णरूप सर्वं समस्तं विश्वं च अनंतं पूर्णमेवचेत्यभिधानात् अंताद्यभावेनैव मध्याभावःसिद्धः पुनर्नमध्यमित्युपचारपरिहारायोक्तम् ॥ १६ ॥

हे विश्वनियंत्या पूर्णस्वरूप श्रीकृष्णा, मी तुझें सर्वत्र अनेक हात, अनेक पोटें, अनंत तोंडें, अपरिमित डोळे आहेत ज्याला असें, अनंतरूप पहात आहें. हे विश्वव्यापका, या स्वरूपास आदि, मध्य व अंत हीं दिसत नाहींत; आदि व अंत न दिसल्यानें अर्थात् मध्यही दिसत नाहीं, हें उघड आहे. तथापि " न मध्यम् " या अर्जुनाच्या वचनानें, यांत उपचार कांहींच नाहीं. सर्व यथार्थ आहे, असें तात्पर्य. ॥ १६ ॥

किरीटिनं गदिनं चक्रिणं च
तेजोराशिं सर्वतो दीप्तिमन्तम् ॥
पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समन्ताद्
दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥ १७ ॥

अनलार्कद्युतिमित्युक्ते परिमितत्वशंकास्यात्तान्निरासायोक्तमप्रमेयमिति ॥ १७ ॥

हे कृष्णा, तुला मी मुकुट घातलेला, हातांत गदा घेतलेला, चक्रपाणी, तेजःपुंज, चोंहोंकडे शोभणाऱ्या कांतियुक्त, सर्व बाजूंनीं पहाण्यास अशक्य, प्रदीप्त झालेल्या अग्नीप्रमाणें व प्रखर सूर्याप्रमाणें तेजस्वी, इत्यादि ऐश्वर्यसंपन्न असा पहात आहें. ॥ १७ ॥

त्वमक्षरं परमं वेदितव्यं
त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ॥
त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता
सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥ १८ ॥

शाश्वतधर्मगोप्ता वैदिकधर्माविता ॥ १८ ॥

हे भगवान् श्रीकृष्णा, मोक्षेच्छु जनांचें उपास्य दैवत, व परम श्रेष्ठ असा तूं आहेस; सर्वदा नाशरहित व श्रेष्ठ ब्रह्मस्वरूप तें तूं; या जगाचा उत्तम आश्रयरूप अविनाशी असा तूं, वैदिक धर्माचा प्रतिपालक तूं, अनादिकालापासून, षड्गुणैश्वर्यसंपन्न असा तूं, मला मान्य आहेस. ॥ १८ ॥

अनादिमध्यान्तमनन्तवीर्य-
मनन्तबाहुं शशिसूर्यनेत्रम् ॥
पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं
स्वतेजसा विश्वमिदं तपन्तम् ॥ १९ ॥

अनादिमध्यांतं गुणानंत्यापेक्षया शशिसूर्याश्रयनेत्रं तन्नामकनेत्रं वा यस्माद्यज्जायतेचांगा ल्लोकवेदादिकंहरेः । तन्नामवाच्यमंगंतद्यथा-ब्रह्मादिकं मुख मितिवचनात् ॥ १९ ॥

हे भगवान् श्रीकृष्णा, आदि, मध्य व अंत नाहीं असा, गुणगणयुक्त, अनंतपराक्रममंडित, अनंतबाहू ( हात ) ज्यास आहेत, चंद्रसूर्याला आधारभूत नेत्र ज्याचे, प्रज्वलित अग्नीप्रमाणें ज्याचें मुख आहे, आणि आपल्या तेजानें या जगाला प्रकाशित करणारा जो तूं, त्या तुला मी पाहत आहें. " भगवान् नारायणाच्या ज्या ज्या अंगापासून लोक, वेद, सूर्य, चंद्र

इत्यादि वस्तु उत्पन्न झाल्या आहेत, त्या त्या वस्तूंच्या नावांनीं तीं तीं भगवंताचीं अंगें प्रसिद्ध आहेत. जसें, " ब्राह्मणोस्य मुखमासीत् " या श्रुतींत मुखापासून ब्राह्मण उत्पन्न झाले ह्मणून, ब्राह्मणालाच मुख अशी संज्ञा दिली आहे; त्याप्रमाणें ' शशिसूर्य नेत्रं ' या पदानें, चंद्रसूर्याच्या उत्पत्तीस कारण झालेलीं भगवंताचीं नेत्रें समजावीं. याशिवाय नित्यत्वादि गुणशून्य असे व अल्पज्ञ चंद्र सूर्य देवादिक अनंत गुणयुक्त अशा भगवंताचे नेत्र ह्मणणें योग्य नाहीं असें समजावें. " ॥ १९ ॥

**द्यावापृथिव्योरिदमन्तरं हि**
**व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः ॥**
**दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं**
**लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥ २० ॥**

द्यावापृथिव्योरंतरमेकेनैव रूपेण व्याप्तं विश्वरूपदर्शनस्यभयहेतुत्वं न सर्वेषां सर्वदा किंतु केषु चित्कारणविशेषेषु कदाचिदेव । उक्तंच । " त्रिषुलोके स्थितैर्भक्तैरर्जुनाय प्रदर्शितम् । दृष्टं विष्णोर्विश्वरूपंस्वयोग्यत्वानुसारतः । प्रायः सहैव पार्थेन प्रायोभीताश्च ते खिलाः । दर्शनाभ्यासतोदृष्टिरानंदोद्रेकता भवेत् । तस्मिन्कालेच भूमेश्च भारहारार्थमुद्यमात् । उग्रत्वमिव सर्वत्र न भीतिर्ब्रह्मदर्शिनाम् । अर्जुनादधिका ये तु तेषां भीति र्नचाभवत् । श्रीब्रह्मरुद्रपूर्वाणां कृष्णायाभीमरामयोरिति । " अथवा विश्वरूपदर्शनार्थं यतमानानां लोकत्रयस्थानां पुंसां तददृष्ट्वापि चेतासि निरूप्य स्थितानां भये जाते सति तद्द्रष्टुरर्जुनस्याहमिवैतेपि दृष्ट्वा बिभ्यतीति बुद्धिर्जाता अतोलोकत्रयं दृष्ट्वा प्रव्यथितमित्याह । दृष्ट्वा देवं मोदमाना अदृष्ट्वाप्येतद्भयाद्बिभ्यतोदृष्टवत्ते पश्यंति तन्यस्तचक्षुऽर्मुखांस्तु तस्मिन्नेवैते मनसोगतत्वादिति च श्रुतिः ॥ २० ॥

हे महात्म्या **श्रीकृष्णा,** तूं भूमि आणि आकाश यांमधला प्रदेश ( पोकळी ) व सर्व दिशा व्यापून टाकिल्या आहेस; अत्याश्चर्यकारक व उग्र असें तुझें रूप पाहून, त्रैलोक्यांतील प्राणी भयानें खरोखर चकित झाले

आहेत. " सर्वदा सर्व लोकांस विश्वरूपदर्शनानें भय प्राप्त होत नाहीं, परंतु, तसेंच कांहीं कारण झालें असतां भय प्राप्त होतें; श्रीकृष्णभगवानानीं अर्जुनास दाखविलेलें विश्वरूप, तिन्ही लोकांत राहणाऱ्या भक्तजनांनीं आपापल्या योग्यते-प्रमाणें पाहिलें; बहुतकरून अनधिकारी लोकांस तें भगवंताचें स्वरूप भयंकर दिसलें असें समजावें; **अर्जुना**पेक्षां श्रेष्ठ असलेल्या ब्रह्मज्ञान्यांस ( तें रूप पाहून ) कधींही भीति प्राप्त होत नाहीं. लक्ष्मी, ब्रह्मदेव, रुद्र ( शंकर ) इत्यादि ज्ञानाधिकारी देवांस, त्याप्रमाणेंच द्रौपदी, भीमसेन व बळराम यांस, विश्वरूपदर्शनानें भीति प्राप्त होणार नाहीं. अथवा, विश्वरूपाचें दर्शन व्हावें ह्मणून, प्रयत्न करणाऱ्या तिन्ही लोकांतील जनांस, तें रूप दिसलें नसतांही, त्या रूपाचें मनांत स्मरण मात्र केल्यानें, भय उत्पन्न झालें. तेव्हां तें साक्षात् पहाणारा जो **अर्जुन** तोही भ्याला असेल असें त्रैलोक्यांतील लोक समजले. तें आनंदमय रूप पहाण्यास भगवद्भक्त त्याचेठायीं दृष्टि लावून असतात. अनधिकारी तें रूप पहात नसतांही, पाहिल्यावर जसें भ्यावें तसें भितात, हें तात्पर्य. ॥ २० ॥

**अमी हि त्वां सुरसंघा विशन्ति**
**केचिद्भीताः प्राञ्जलयो गृणन्ति ॥**
**स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघाः-**
**स्तुवन्ति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः ॥२१॥**

**अमी मुक्ताः सुरसंघास्त्वां विशंति प्रवेशोनिर्गमश्चैव मुक्तानां स्वेच्छया भवेदितिवचनात् ॥ २१ ॥**

हे भगवन् **श्रीकृष्णा**, भगवंताचे देहांत प्रवेश करण्याचा आणि त्यांतून बाहेर येण्याचा अधिकार असल्यामुळें, मुक्त अशा देवांचे समुदाय, शरणागत होऊन तुझ्या देहांत प्रवेश करीत आहेत. कित्येक जन भयानें चकित होऊन, हात जोडून, परमात्मन् त्राहि त्राहि, अशी तुझी प्रार्थना करीत आहेत; मोठमोठे ऋषी, आणि सिद्धसमुदाय तुजकडून या जगाचा उद्धार होवो, अशी तुझी पुष्कळ स्तोत्रांनीं स्तुति करीत आहेत. ॥ २१ ॥

रुद्रादित्या वसवो ये च साध्या
विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च ॥
गन्धर्वयक्षासुरसिद्धसंघा
वीक्षन्ते त्वां विस्मिताश्चैव सर्वे ॥ २२ ॥

उष्मपाः पितरः उष्मभागाहिपितरइतिश्रुतेः गंधर्वादीनां संघाः २२

हे भगवान् श्रीकृष्णा, एकादश रुद्र, द्वादशादित्य, अष्टवसु, साध्यगण, विश्वेदेव, अश्विनीकुमार, मरुद्गण, पितृगण, गंधर्व, यक्ष, असुर आणि सिद्ध यांचे समुदाय हे सर्व आश्चर्ययुक्त होऊनच तुला पहात आहेत. असें मला दिसतें आहे. ॥ २२ ॥

रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं
महाबाहो बहुबाहूरुपादम् ॥
बहूदरं बहुदंष्ट्राकरालं
दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाहम् ॥ २३ ॥

रूपेत्यादिना ॥ २३ ॥

हे आजानुबाहो श्रीकृष्णा, अनंत तोंडें, अनंत डोळे, अनेक हात, अमित पाय, पुष्कळ उदरें ( पोटें ) व अनंत दाढांनीं भयंकर असें तुझें अतिश्रेष्ठ विश्वरूप पाहून, सर्व लोक भयचकित झाले आहेत. आणि मीही भयचकित ( घाबरा ) झालों आहे. ॥ २३ ॥

नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं
व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम् ॥
दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितांतरात्मा
धृतिं न विन्दामि शमं च विष्णो ॥२४॥

व्यात्ताननं विवृतमुखम् ॥ २४ ॥

हे जगद्व्यापी परमपूज्य श्रीकृष्णा, आकाशास स्पर्श करणारा, अति

अद्भुत कांतीनें ( तेजानें ) युक्त, नानाप्रकारचे रंग ज्यास आहेत, तोंड पसरलेला, तेजस्वी व विशाल आहेत डोळे ज्याला, अशा तुला पाहून, माझें मन गडबडून जाऊन, धैर्य व शांतता हीं मला सोडून गेलीं आहेत. ॥२४॥

दंष्ट्राकरालानि च ते मुखानि
दृष्ट्वैव कालानलसंनिभानि ॥
दिशो न जाने न लभे च शर्म
प्रसीद देवेश जगन्निवास ॥ २५ ॥

दंष्ट्राभिः करालानि विरूपाणि ॥ २५ ॥

हे देवदेवोत्तमा जगद्व्यापी श्रीकृष्णा, भयंकर दाढांनीं विक्राळ आणि प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें तेजस्वी, अशीं तुझीं तोंडें पाहून मला दिशांचें ज्ञान होत नाहीं, आणि मनास सुख वाटत नाहीं. ह्मणून एकदां या शरणागतावर प्रसन्न हो. ॥ २५ ॥

अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः
सर्वे सहैवावनिपालसंघैः ॥
भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथासौ
सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ॥ २६ ॥

सूतपुत्रः कर्णः ॥ २६ ॥

हे विश्वमूर्ते श्रीकृष्णा, सगळे धृतराष्ट्राचे पुत्र, ह्मणजे दुर्योधनादिक, हे जयद्रथादि राजसमूहासह, त्याचप्रमाणें भीष्म, द्रोणाचार्य, सूतपुत्र कर्ण. इत्यादि आणि आमच्या पक्षांतील धृष्टद्युम्नादि रणधीर नरवीर, सर्व एकत्र होऊन, मोठ्या त्वरेनें तुझ्या भयंकर तोंडांत प्रवेश करीत आहेत असें मला दिसतें. ॥ २६ ॥

वक्त्राणि ते त्वरमाणा विशन्ति
दंष्ट्राकरालानि भयानकानि ॥

केचिद्विलग्ना दशनान्तरेषु
संदृश्यन्ते चूर्णितैरुत्तमाङ्गैः ॥ २७ ॥

भगवन्मुखप्रवेशादुन्मुखचेष्टानामपि भगवन्मुखचेष्टयैव तत्र प्रवेशात् प्रलयोदकं प्रजाः विशंतीतिवदुपचारेण अमी दुर्योधनादयो-वक्त्राणि विशंतीति प्रयोगः सेनामध्ये भगवन्मुखानामुभयाभिमुखत्वात् सहास्मदीयैरपि इत्युक्तं येषामुत्तरक्षणे मरणं ते दंतमध्येषु संलग्नाश्चूर्णितैरुत्तमांगैः शिरोभिरुपलक्षिताः दृश्यंते यथाभिन्नं घटादिकं पृथगपतितमङ्गैरदृष्टमपि सूक्ष्मदृष्टिभिर्ज्ञायते यथा पुरुरवसो जरा आश्विभ्यामेव दृष्टा तथेति ॥ २७ ॥

हे भगवान् **श्रीकृष्णा**, विक्राळ दाढांमुळें भयंकर दिसणाऱ्या तुझ्या मुखांत शिरत असतां कित्येक दोन्ही दंतपंक्तींच्यामध्यें सांपडून, त्यांचीं मस्तकें चूर्ण झालेलीं आहेत असे दिसतात; " येथें भगवंताच्या मुखांत प्रवेश करण्याची ज्यांस इच्छा नाहीं अशांस, भगवंताच्या मुखाच्या सामर्थ्यानेंच त्यांत ( मुखांत ) प्रवेश होतो. ज्याप्रमाणें " प्रलयोदकं प्रजाः प्रविशंति " याचा अर्थ भगवंताच्या इच्छेनें प्रजा प्रलयोदकांत प्रवेश करिते असा आहे, त्याच-प्रमाणें येथेंही असाच अर्थ आहे. कारण, स्वतःचा नाश करून घ्यावा अशी इच्छा कोणासही नसल्यामुळें, ती प्रजा आपण होऊनच प्रलयोदकांत प्रवेश करिते असें ह्मणतां येत नाहीं. त्याप्रमाणें भयानें त्रासलेले लोक, विश्वरूपी परमात्म्याच्या मुखांत स्वतः ( सुखानें ) प्रवेश करण्याची इच्छा कधींही करणार नाहींत. ह्मणून भगवंताच्या मुखसामर्थ्यानेंच त्यांचा त्या मुखांत प्रवेश होतो, असें समजावें. यावरूनच " अमी दुर्योधनादयः वक्त्राणि विशंति " असा प्रयोग केला आहे. दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं विश्वरूपी भगवान् श्रीकृष्ण असून, त्यास चोंहोंकडेही अनंत मुखें असल्यामुळें, मागें असलेले आमच्या पक्षाचे लोकही त्या मुखांत प्रवेश करीत आहेत, असें अर्जुन बोलला. रणांगणांत ज्यांचा पुढें नाश होणार तेच भगवंताच्या दाढांच्या संधींत सांपडून चूर्ण झालेले अर्जुनास दिसले. ज्याप्रमाणें फुटलेला घट ( मडकें ) वगैरे, तुकडे तुकडे होऊन पडला नसून, त्याचीं दोनच शकलें ( तुकडे )

झालीं असतां, ( चीर जाऊन दोन भाग झाले असतां, परंतु ते वेगळे झाले नसतां ) तो फुटला आहे असें वरवर पहाणाऱ्या—अज्ञ माणसास—दिसत नाहीं, परंतु बारीक नजरेनें पाहणाऱ्या—सूज्ञास—तो फुटलेला आहे असें दिसल्यावांचून रहात नाहीं. पुरूरवा राजास पुढें प्राप्त होणारी वृद्धावस्था ज्याप्रमाणें अश्विनी-कुमारांनीं मात्र जाणली, त्याप्रमाणें लोकांस प्राप्त होणारा भावी मृत्यु, भगवंताच्या कृपेनें अर्जुनानें जाणला, असें तात्पर्य. ॥ २७ ॥

**यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः**
**समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति ॥**
**तथा तवामी नरलोकवीरा**
**विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति ॥ २८ ॥**

विज्वलंति दीप्यमानानि मुखानि विशंति ॥ २८ ॥

हे भगवान् श्रीकृष्णा, ज्याप्रमाणें नद्यांचे पुष्कळ प्रवाह समुद्रास सन्मुख होऊन समुद्रांत जाऊन मिळतात, त्याप्रमाणें या नरलोकांत असलेले रणधीर राजे इत्यादि. चोहोंकडून पेटलेल्या अशा तुझ्या तोंडांत प्रवेश करीत आहेत. ॥ २८ ॥

**यथा प्रदीप्तं ज्वलनं पतङ्गा**
**विशन्ति नाशाय समृद्धवेगाः ॥**
**तथैव नाशाय विशन्ति लोका-**
**स्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ॥ २९ ॥**

पतंगाः शलभाः ॥ २९ ॥

हे भगवान् श्रीकृष्णा, ज्याप्रमाणें मोठ्या वेगानें, पतंग आपला नाश करून घेण्यासाठीं, भडकलेल्या अग्नींत उड्या घेतात, त्याप्रमाणें मोठ्या वेगानें या लोकांतले वीर, आपला नाश करून घेण्यासाठीं तुझ्या भयंकर तोंडांत उड्या घेत आहेत. ॥ २९ ॥

लेलिह्यसे ग्रसमानः समन्ता-
ल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः ॥
तेजोभिरापूर्य जगत्समग्रं
भासस्तवोग्राः प्रतपन्ति विष्णो ॥ ३० ॥

कोपेन रुधिरावासिक्तमोष्ठपुटादिकं लेलिह्यसे पुनः पुनर्लेहनं करोषि ॥ ३० ॥

हे जगद्व्यापका **श्रीकृष्णा,** तूं तुझ्या तेजस्वी अशा मुखांनीं, या नरवीरांस चोहोंकडून गिळीत असून, त्यांच्या रक्तानें भरलेले तुझे ओंठ तूं जिभेनें चाटतो आहेस; आणि तुझ्या देहाच्या उग्र कांती, सर्व जगास तेजानें व्यापून त्यास संताप करीत आहेत. ॥ ३० ॥

आख्याहि मे को भवानुग्ररूपो
नमोऽस्तु ते देववर प्रसीद ॥
विज्ञातुमिच्छामि भवन्तमाद्यं
न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ॥ ३१ ॥

विष्णोइति संबोधनात्त्वमक्षरमित्याद्युक्तेश्च विष्णुं तद्धर्मांश्च जानन्नेव गुणकर्मविशेषविज्ञानार्थं पृच्छति । कोभवानिति ॥ ३१ ॥

येथें "विष्णो" या संबोधनानें आणि "त्वमक्षरं" इत्यादि उक्तीनें विष्णुभगवान् **श्रीकृष्ण** आणि त्याचे धर्म अर्जुनास समजले तरी, त्याच्या गुणकर्मादिकांचें विशेष ज्ञान व्हावें ह्मणून **अर्जुन** प्रश्न करितो:—हे भगवान् **श्रीकृष्णा,** भयंकर रूपानेंयुक्त असा तूं, कोणत्या गुणकर्मादिविशेषानेंयुक्त आहेस तें मला सांग; हे सुरश्रेष्ठा, मी तुला नमस्कार करितों. तूं माझ्यावर प्रसन्न हो. आद्यपुरुष जो तूं त्या तुला जाणण्याची मी इच्छा करितों. कां कीं, तूं कोणत्या कारणानें प्रवृत्त होतोस तें मला समजत नाहीं. ॥ ३१ ॥

श्रीभगवानुवाच ।

कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो
लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ॥
ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे
येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ॥ ३२ ॥

स्वकीयान्गुणकर्मविशेषान्भगवानुवाच । कालइति । कालशब्दो-जगद्बंधनच्छेदनज्ञानादिसर्वधर्मवद्भगवद्वाची कलबंधने कलच्छेदने कलज्ञाने कलकामधेनुरितिपाठात् प्रवृद्धः परिपूर्णोनादिर्वा लोकान्स-माहर्तुं विशेषेण प्रवृत्तः अपिशब्दस्य भ्रात्रादीनपि विनेत्यर्थः अक्षौ-हिण्यादिभेदेन बहुषु प्रत्यनीकेषु परस्परं प्रतिपक्षभूतेष्वनेकेषु सेनासु ये अवस्थितास्ते सर्वेपि न भविष्यंति ॥ ३२ ॥

आपलीं गुणकर्में इत्यादि श्रीकृष्णभगवान् अर्जुनास सांगतातः—हे अर्जुना, मी सर्वगुणपरिपूर्ण, सर्वज्ञ आणि सर्व शत्रूंस ( रणांगणांतून ) पळा-वयास लावणारा आहें. आणि कालशब्दवाच्य काल तो मीच असल्यामुळें सकल लोकांचा संहार करितों त्याप्रमाणें सर्वत्र आणि सर्वकाळीं नित्य प्रवृद्ध स्वरूप मीच आहें. या समरभूमीवर, सर्व वीरांचा एकदम संहार करण्यास मी प्रवृत्त झालों आहें. ह्मणून या अठरा अक्षौहिणी सैन्यांत तुझे बंधु, अश्व-त्थामा, कृप व कृतवर्मा यांवाचून अन्य कोणीही योद्धे जिवंत राहणार नाहींत. येथें काळ या शब्दानें, जगाचें बंधन, छेदन, ज्ञानादि सर्व धर्मवंत, भगवान् श्रीकृष्ण समजावा; कारण, “ कलबंधने कलच्छेदने कलज्ञाने कलकामधेनौ ” असा पाठ आहे; अपि या पदानें अर्जुनाचे बांधवादिक घेतले आहेत. ते त्या रणभूमींत न पडल्यानें तसेंच घेणें भाग. ॥ ३२ ॥

तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व
जित्वा शत्रून्भुङ्क्ष्व राज्यं समृद्धम् ॥
मयैवैते निहताः पूर्वमेव
निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥ ३३ ॥

यद्वाजयेमयदिवानोजयेयुरित्यस्य संदेहेपि प्रवृत्तिर्युक्ता पक्षद्वयेपि फललाभादितिहतोवेत्युत्तरमुक्तम् इदानीं तव पराजयशंकापि नास्तीत्याह । तस्मादिति । मयैवैते सर्वयोधाः पूर्वमेव निहतप्रायाः त्वं तु निमित्तमात्रं भव पश्चादपि त्वयि स्थित्वाऽहमेव तान्हनिष्यामि ३३

" यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः " या वाक्यानें अर्जुनास आपल्या जयापजयाविषयीं असलेली शंका दूर करण्याकरितां, युद्धांत जय मिळाल्यास इहलोकीं राज्यभोगप्राप्ति व पराजय होऊन रणांगणीं मरण आल्यास, वीरस्वर्गभोगप्राप्ति होते, दोहोंतही अनिष्ट असें कांहींच नाहीं. असें सांगून प्रस्तुत श्लोकानें; पराजयाची शंका मुळींच घेऊं नको असें सांगतातः–हे अर्जुना, युद्धास उद्युक्त हो; आणि सुरगणांसही अजिंक्य अशा भीष्मद्रोणादिकांस अर्जुनानें जिंकलें अशी सत्कीर्ति मिळीव; पुढें उभे असलेल्या, दुर्योधनादि शत्रूंस जिंकून, संपत्तीनें भरलेल्या राज्याचा उपभोग घे; हे तुझे सर्व शत्रू, मी त्यांचें आयुष्य क्षीण केल्यामुळें, रणभूमींत येण्यापूर्वींच हतवीर्य झालेले आहेत, ह्मणून ते लवकरच धर्मसदनीं ( परलोकीं ) जाणार, हे सव्यसाचिन् अर्जुना, तूं निमित्ताला मात्र कारण होऊन पुढें हो; तुझ्या अंतर्यामीं असलेला मीं, यांना ( तुझ्या शत्रूंना ) एका क्षणांत ज्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें परलोकीं पाठवितों. यांचा संहार करण्याची स्वतंत्र शक्ति तुझ्यांत नसल्यामुळें, तूं निमित्त मात्र हो. ॥ ३३ ॥

द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च
कर्णं तथाऽन्यानपि योधवीरान् ॥
मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा
युद्ध्यस्व जेतासि रणे सपत्नान् ॥ ३४ ॥

ननु द्रोणोधनुर्विद्याचार्यः भीष्मः स्वच्छंदमृत्युः योस्य शिरः च्छिन्नं भूमौ पातयति तच्छिरोभेत्स्यतइति पितुर्वरेणोद्रिक्तः सैंधवः कर्णे वासवी शक्तिरस्ति अन्येपि बलिष्ठाः संति कथं मया जेतूं शक्याइत्यत आह । द्रोणंचेति ॥ ३४ ॥

धनर्विद्यापटु द्रोणाचार्य, कुरुकुलांतला वडील इच्छामरणी भीष्म,

सिंधुदेशाधिपति जयद्रथ, ज्याचा शिरच्छेद करणाराचें शिर शतधा भिन्न होईल या पितृवरानेंयुक्त, ज्याचे जवळ इंद्राची शक्ति आहे असा कर्ण, आणि मोठमोठे शूर राजे, जे एकापेक्षां एक योद्धे आहेत, यांपासून आपल्यास जय कसा मिळेल. अशी अर्जुनास शंका आली असेल, असें समजून तिचें समाधान सांगतात:-धनुर्विद्येचा गुरु द्रोणाचार्य, कुरुवृद्ध भीष्म, बलवान् जयद्रथ, कर्ण, आणि भगदत्तादिक इतर सर्व वीर हे, मी मारलेच आहेत. याकरितां तूं खरोखर सर्व शत्रूंस जिंकशील. अतएव मनांत उत्साह धरून युद्ध कर. ॥३४॥

संजय उवाच ।

एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य
कृताञ्जलिर्वेपमानः किरीटी ॥
नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं
सगद्गदं भीतभीतः प्रणम्य ॥ ३५ ॥

ततोर्जुनेन किं कृतमित्यतः संजयउवाच । एतदिति ॥ ३५ ॥

याप्रमाणें भगवंताचें बोलणें ऐकून, अर्जुनानें पुढें काय केलें तें संजय धृतराष्ट्रास सांगतो:-संजय ह्मणतो, हे राजन् धृतराष्ट्रा, अर्जुनानें असें ( वर सांगितलेलें ) बोलणें ऐकून, पूर्वीं मला श्रीकृष्णानीं " युद्ध कर " असें सांगितलें असून, त्याचें मी अतिक्रमण केलें ( भगवंताचें ऐकिलें नाहीं. ) हा माझा मोठा अपराध झाला, असें मनांत येऊन, थरथरां कांपत कांपत, किरीटवर्धन असा तो अर्जुन हात जोडून, वारंवार नमस्कार करीत अत्यंत भयभीत होऊन, सद्गदित कंठानें श्रीकृष्णास ह्मणतो:-॥ ३५ ॥

अर्जुन उवाच ।

स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या
जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च ॥
रक्षांसि भीतानि दिशो द्रवन्ति
सर्वे नमस्यंन्ति च सिद्धसङ्घाः ॥ ३६ ॥

वचनमाह । स्थानइत्यादिना । हे कृष्ण ते तव कीर्तने जगत्प्रहर्षादिकं स्थाने युक्तमेव ॥ ३६ ॥

इंद्रियांला प्रेरणा करणाऱ्या श्रीकृष्णा, तुझ्या महात्म्याच्या कीर्तनानें सर्व जगाला संतोष होतो, आणि तें जग तुझ्याठायीं प्रीतियुक्तही होतें; हें बरोबरच आहे. त्याप्रमाणेंच तुझ्या नामस्मरणानें राक्षससुद्धां भयभित होऊन दशदिशांस पळतात. हेंहि योग्यच आहे. सर्व सिद्धगण हें तुझें अतिविचित्र-रूपी विश्वरूप पाहून, तुला दंडवत् नमस्कार करितात हेंही योग्यच आहे. ॥३६॥

कस्माच्च ते न नमेरन्महात्मन्
गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे ॥
अनन्त देवेश जगन्निवास
त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥ ३७ ॥

कथं युक्तमित्यतआह । कस्मादित्यादिना । महात्मन्परिपूर्ण गरीयसे गुरुतराय चतुर्मुखमूलभूताय ते कस्माद्धेतोर्न नमेयुर्नमेयुरेव अनंत अपरिच्छिन्न तत्परं सदसद्भ्यांपरं ॥ ३७ ॥

वरील श्लोकांत सांगितलें तें बरोबर कसें तें सांगतातः—हे सर्वोत्तम श्रीकृष्णा, तुला सर्वलोक कां नमस्कार करणार नाहींत? ( करतीलच ) कांकीं, हे अनंता, तूं अपरिच्छिन्न स्वरूप, देवांनीं आराधिलेल्या चरणकमलांनीं युक्त, सर्व जगाचा आधार, भावाभावात्मक प्रपंच तुला वश ( तुझ्या स्वाधीन ) आहे, असा तूं नाशरहीत असल्यामुळें सर्व लोक तुला नमस्कार करीत आहेत, यांत आश्चर्य तें काय? ॥ ३७ ॥

त्वमादिदेवः पुरुषः पुराण-
स्त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ॥
वेत्तासि वेद्यं च परं च धाम
त्वया ततं विश्वमनन्तरूपम् ॥ ३८ ॥

अनंतरूपम् अपरिच्छिन्नमेकरूपम् नित्यरूपमितिवा ॥ ३८ ॥

तूं अविनाशी, तुझें रूप अपरिछिन्न आहे, सर्व देवांस आदिदेव, सर्वांपेक्षां ( पुराणपुरुष ) सर्व प्रपंचाच्या लयास कारण, विज्ञानविशिष्ट, ज्ञानी-

जनांनीं ध्यान करण्यास योग्य, सर्व जगाचें धारण करणारा तुझ्यावांचून कोणीही नाहीं. हें सर्व विश्व तूंच व्यापिलें आहेस; ॥ ३८ ॥

**वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशाङ्कः**
**प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ॥**
**नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः**
**पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥ ३९ ॥**

त्वया विश्वमिदं ततं नांतं पश्यामि इत्युक्तेपि नेश्वरस्य परिमाणानंत्यं सिद्ध्यति विद्यमानमप्यंतं स्वयं न पश्यतीत्यपि प्रतीतेस्तन्निवृत्त्यर्थं न केवलमहं न पश्यामि किंतु त्वया ततं विश्वमित्युच्यते अन्यत्तात्पर्यज्ञापनायाभ्यासरूपं तथापि पश्यामि त्वां सर्वतोनंतरूपं द्यावापृथिव्योरिदमंतरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्चसर्वाइत्यादिपुनरुक्तिरित्यत आह । अन्यदिति । एतद्वाक्यजातस्य विष्णोर्देशतः कालतोगुणतश्चानंत्ये स्वस्य महत्तात्पर्यज्ञापनार्थेभ्यासरूपत्वान्न पुनरुक्तिदोषइति भावः । वायुरिति ॥ ३९ ॥

" त्वया विश्वमिदं ततं " नांतं पश्यामि " असें अर्जुनानें ह्मटलें तरी, ईश्वरास अनंतपरिमाण आहे असें सिद्ध होत नाहीं. कारण, ईश्वरास परिमाण असून तें अर्जुनास दिसलें नाहीं, असें कदाचित् कोणी ह्मणेल याकरितां, केवळ मीच तुझा अंत ( शेवट ) पाहिला नाहीं, असें नव्हे, तर तूंही " मी विश्वव्यापी आहें असें सांगतोस " अशा अर्थानें पुनः पुनः भगवंताचें विश्व व्यापकत्व दाखविण्याकरितां अर्जुन बोलला आहे; तथापि, " पश्यामि त्वां सर्वतोनंतरूपम् " " द्यावापृथिव्योरिदमंतरंहि " " व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः " इत्यादि वाक्यांमुळें, पुनरुक्ति होते, तिचा परिहार असा समजावा कीं, कांहीं ठिकाणीं परमेश्वराचे स्वरूपास देशतः अनंतत्व, कांहीं ठिकाणीं गुणानें अनंतत्व; याप्रमाणें अनेक प्रकारांनीं मी तुझी व्याप्ती जाणली हें दाखविण्याकरितां, त्या त्या अभिप्रायाचीं वाक्यें आलीं आहेत; परंतु अर्थाचें भिन्नत्व असल्यामुळें पुनरुक्तिदोष होत नाहीं असें जाणावें. वायु, यम, अग्नि, वरुण, चंद्र,

पितामह, प्रपितामह तूंच आहेस; तुला अनंत नमस्कार असोत; आणखींही पुनः तुला नमस्कारांवर नमस्कार असोत; ॥ ३९ ॥

**नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते**
**नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ॥**
**अनन्तवीर्यामितविक्रमस्त्वं**
**सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ॥ ४० ॥**

हे सर्वपरिपूर्ण अतएव तव कार्यकारणशब्दवाच्यत्वं युज्यते सर्वं खल्विदं ब्रह्मेत्यादिश्रुतेः सर्वजगदात्मनस्तत्सांनिधानत्वादिकमयुक्तमित्याशंक्य श्रुतिगतसर्वशब्देन न सर्वात्मत्वाभिप्रायइत्याह । सर्वमिति । एवं यत्र यत्र परमात्मनोजीवजडैक्यमुच्यते तत्र तत्र सर्वव्यापकत्वादिकमेव तादात्म्यव्यवहारालंबनं न सर्वथैक्यमितिद्रष्टव्यम् ॥ ४० ॥

हे अनंतगुणपरिपूर्ण श्रीकृष्णा, तुझ्या पुढल्या भागास व मागल्या भागास ( तोंडाकडे व पाठीकडे ) नमस्कार असो; तसेंच तुझ्या सर्व बाजूंस ( दिशांस ) ही नमस्कार असो; तूं अनंत सामर्थ्यवान् असून अपरिमित पराक्रमी आहेस; तूं सर्व जग व्यापिलें आहेस ह्मणूनच तुला " सर्व " असें ह्मणतात. परमात्म्याला ' सर्वं खल्विदं ब्रह्म ' या श्रुतीनें, कार्यकारणादि सर्व प्रपंच त्याचे स्वाधीन असल्यानें अशेष शब्दवाच्यत्व मात्र सांगितलें आहे असें समजावें व जेथें जीवजडैक्याचा आभास दिसतो तेथें ऐक्य न जाणतां सर्व वस्तूंच्याठायीं परमात्मा व्याप्त आहे, असें जाणावें ह्मणजे तो सर्व वस्तूंत समाविष्ट झाला आहे असें समजावें. ॥ ४० ॥

**सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं**
**हे कृष्ण हे यादव हे सखेति ॥**
**अजानता महिमानं तवेदं**
**मया प्रमादात्प्रणयेन वापि ॥ ४१ ॥**

एतादृश माहात्म्यं भगवंतं प्रति यदपराद्धं तत्क्षंतव्यमित्याह । सखेत्यादिना । हे सखेति संधिः छांदसः तवमहिमानं इदं पूर्वोक्तं

जगत्स्रष्टृत्वादिकमजानता वलिष्ठत्वाद्यल्पमाहिमज्ञानेपीदृशं जगत्प्रभावादिमहामाहात्म्यमजानतेत्यर्थः ॥ ४१ ॥

याप्रमाणें माहात्म्यानेंयुक्त जो परमात्मा, त्याजपाशीं आपल्या अपराधाची अर्जुन क्षमा मागतो:—हे भगवान् श्रीकृष्णा, पूर्वी वर्णिलेलें तुझें श्रेष्ठत्व न समजतां, गैरसावधपणानें अथवा स्नेहानें पूर्णब्रह्म अशा तुला मित्र समजून, प्राकृत जनाप्रमाणें रागाचे भरांत हे कृष्णा, हे यादवा, हे सख्या इत्यादि मनमानेल तसें मी बोललों, त्याबद्दल मी तुझ्याजवळ क्षमा मागतों. ॥ ४१ ॥

यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि
विहारशय्यासनभोजनेषु ॥
एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं
तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥ ४२ ॥

एकोमुख्यः सर्वोत्तमोपि त्वमसत्कृतोसि यत्सख्यादिनाकृतं अथवा क्रीडादिसमयेऽपहासार्थं कृतं तत्तदपराधजातं समक्षं तव पुरतः क्षामये अप्रमेयत्वाद्भवतोनिंदादिना हानिर्नास्ति भक्तैः प्रमादादिना कृतमपराधं पुरतः प्रणामादिना क्षंतुमर्हसीत्यर्थः ॥ ४२ ॥

हे भगवान् श्रीकृष्णा, सर्वोत्तमा, सृष्ट्यादि करणारा सर्वोत्तम एकटाच आहेस. तुला मी थट्टेनें, खेळतांना निजतांना, बसतांना, जेवतांना इत्यादि प्रकारांत, तूं एकटा असतां अगर इतर मित्रांसमक्ष थट्टेनें जें बोललों असेन,—माझ्याकडून जे अपराध घडले असतील, ते क्षमा करण्याविषयीं मी तुझी प्रार्थना करितों. तूं अप्रमेय असल्यामुळें, अज्ञ जनांनीं केलेल्या निंदेनें तुला कांहींच कमीपणा येत नाहीं; तरी तुझ्या भक्तांनीं, प्रमादानें घडलेल्या अपराधांची क्षमा करावी ह्मणून तुझी प्रार्थना केली असतां—नमस्कार केला असतां—तूं क्षमा करण्यास समर्थ आहेस, असें तात्पर्य. ॥ ४२ ॥

पितासि लोकस्य चराचरस्य
त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ॥
न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो
लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभावः ॥ ४३ ॥

तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं
प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ॥
पितेव पुत्रस्य सखेव सख्युः
प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ॥ ४४ ॥

एतदेव स्पष्टयति । पितेत्यादिना ॥ ४३ ॥ ४४ ॥

वर जें भगवंताचें माहात्म्य सांगितलें त्याचें स्पष्टीकरण करितातः– ज्याच्या सामर्थ्यास तुळना नाहीं, असा जो तूं श्रीकृष्ण तो चराचर जगाचा बाप आहेस; आणि पूज्य अशा गुरु व आचार्यादिकांच्या अंतर्यामीं राहून, योग्य अधिकाऱ्यास सदसद्विवेकाचा उपदेश करितोस; यावरून तूं श्रेष्ठच आहेस. रमा आणि ब्रह्मरुद्रादि जीवजडात्मक प्रपंचाहून तूं विलक्षण शक्तिमान् असा आहेस, तूं अति उत्तम असल्यानें या तिन्ही लोकांत तुझ्यासारखा कोणीही नाहीं. मग तुझ्यापेक्षां श्रेष्ठ कोण असणार? हे क्रीडादिगुणविशिष्टा श्रीकृष्णा, तूं अगण्य गुणांचा समुद्रच आहेस ह्मणून मी तुला दंडवत ( नमस्कार ) करून, जगत्स्वामी परमपूज्य असा तूं प्रसन्न हो, अशी तुझी प्रार्थना करितों. ज्याप्रमाणें पुत्राचे अपराध पिता, मित्राचे मित्र, आणि भार्येचे अपराध भर्ता क्षमा करितो, त्याप्रमाणें तूंही या दीन भक्तावर कृपा करून मी केलेल्या अपराधांची क्षमा कर. ॥ ४३ ॥ ४४ ॥

अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा
भयेन च प्रव्यथितं मनो मे ॥
तदेव मे दर्शय देव रूपं
प्रसीद देवेश जगन्निवास ॥ ४५ ॥

तदेवरूपं दर्शय ॥ ४५ ॥

हे परमेश्वरा श्रीकृष्णा, पूर्वीं कधींही न पाहिलेलें असें तुझें विश्वव्यापी विश्वरूप पाहून मी चकित झालों आहें. आणि तुझ्या विश्वरूपदर्शनानेंच माझें मन भयानें व्यापिलें आहे. याकरितां मला तुझें पूर्वींचें शांत रूप दाखीव. हे देवाधिदेवा जगन्निवासा, भगवान् श्रीकृष्णा प्रसन्न हो. ॥ ४५ ॥

किरीटिनं गदिनं चक्रहस्त-
मिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ॥
तेनैव रूपेण चतुर्भुजेन
सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥ ४६ ॥

तेनैव रूपेण भवेति अनंतरूपगोपनेन तदेवप्रकाशयेत्यर्थः ॥४६॥

हे विश्वव्यापका प्रभो, किरीट, गदा व सुदर्शन धारण केलीं आहेत, असें तुझें रूप पाहण्याची मी इच्छा करितों. हे भगवान् सहस्रभुजमंडिता कृष्णा, चतुर्भुज रूपानें तूं प्रकट हो. ॥ ४६ ॥

श्रीभगवानुवाच ।

मया प्रसन्नेन तवार्जुनेदं
रूपं परं दर्शितमात्मयोगात् ॥
तेजोमयं विश्वमनंतमाद्यं
यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥ ४७ ॥

भक्त्यातिशयोत्पादनाय विश्वरूपदर्शनस्य दौर्लभ्यं दर्शयन् भगवानुवाच । मयेत्यादिना । आत्मयोगात्स्वसामर्थ्याद्विश्वं पूर्णगुणं विश्वनामा स भगवान् यतः पूर्णगुणःप्रभुरितिवचनात् अनंतं देशकालापरिच्छिन्नं यन्मेरूपं त्वयैवेंद्रशरीरेण दृष्टं त्वदन्येनाधमेन त्वयैव वा न दृष्टपूर्वं । उक्तंच । विश्वरूपं प्रथमतो ब्रह्मापश्यच्चतुर्मुखः । तच्छतांशेन रुद्रस्तु तच्छतांशेन वासवः । यथेंद्रेण पुरा दृष्ट मपश्यत्सोर्जुनोपिसन् । तदन्ये क्रमयोगेन तच्छतांशांशदर्शिनः ॥ ४७ ॥

अर्जुनास भक्त्यातिशय उत्पन्न व्हावा ह्मणून, हें विश्वरूप दर्शन दुर्लभ ह्मणून भगवान् सांगतातः—हे अर्जुना, तुझ्या भक्तीनें मी संतुष्ट होऊन, आपल्या सामर्थ्यानें तेजस्वी, गुणपूर्ण, सर्वोत्तम, श्रेष्ठ, अनादि, तुझ्यासारख्या दुसऱ्यांनीं न पाहिलेलें असें हें विश्वरूप, मी तुजवर कृपा करून दाखविलें. हें विश्वरूप प्रथमतः ब्रह्मदेवानें पाहिलें होतें; आणि आपल्या योग्यतेप्रमाणें

त्याचा शंभरावा भाग रुद्रानें पाहिला होता; त्याचा शंभरावा भाग आपल्या योग्यतेप्रमाणें इंद्रानें पाहिला होता; त्याचप्रमाणें इंद्राचा अंश जो अर्जुन त्यानें तें स्वरूप पाहिलें. त्याशिवाय अन्यलोक आपल्या योग्यतेप्रमाणें शंभरावा हिस्सा—जशी योग्यता कमी तसा कमी कमी भाग—तें विश्वरूप पहातात. असा भावार्थ. ॥ ४७ ॥

न वेदयज्ञाध्ययनैर्न दानै-
र्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ॥
एवंरूपः शक्य अहं नृलोके
द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥ ४८ ॥
मा ते व्यथा मा च विमूढभावो
दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम् ॥
व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं
तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥ ४९ ॥

ननु मदन्येनापि वेदादिसाधनैरपि तथा दृश्यतामित्यत आह । न वेदेति । वेदादिभिरपि त्वदवरेणैवं द्रष्टुमशक्यः अन्यथा दृष्ट्वाद्भुतं-रूपमित्यादिविरोधः ॥ ४८ ॥ ४९ ॥

अर्जुनाशिवाय इतर लोकांनीं वेदाध्ययनादि साधनानें तें विश्वरूप पाहिलें असेल, अशी कोणास शंका येईल तिचें निराकरण करितात:-हे कुरुकुलश्रेष्ठा अर्जुना, तुझ्याशिवाय, मला कोणीही पाहण्यास समर्थ नाहीं. माझें हें विश्वरूप, यज्ञ करून, वेदाध्ययन करून, दानें देऊन, जपजाप्य करून, उत्तम तपश्चर्या करूनही, दिसण्याचा संभव नाहीं. ह्मणजे या साधनांनीं तें विश्वरूप पहाण्यास लोक असमर्थ आहेत. हे अर्जुना, सांप्रतचें हें माझें अलौकिक विश्वरूप पाहून, तूं व्यथित होऊं नकोस; व भ्रांतींतही पडूं नकोस; तूं आतां भीति टाकून संतुष्ट मनानें माझें तेंच ( पूर्वींचेंच ) कृष्ण-रूप पुनः पहा. ॥ ४८ ॥ ४९ ॥

संजय उवाच ।

इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा
स्वकं रूपं दर्शयामास भूयः ॥
आश्वासयामास च भीतमेनं
भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥ ५० ॥

स्ववत्क्रीयते प्रदर्श्यते इति स्वकं रूपं विश्वरूपमज्ञानां स्वरूपवन्न दर्शयति एतज्ज्ञानामपि तथैवदर्शयतीति विशेषः अन्यथा द्रष्टुमिच्छामि-तेरूपमिति विरुद्धं स्यात् । उक्तंच । परापर विभेदस्तु मुग्धदृष्टिमपेक्ष्य तु । प्रादुर्भावं स्वरूपाणां विश्वरूपस्य च प्रभोः । अन्यथा न विशेषोस्ति व्यक्तिर्ह्यज्ञव्यपेक्षयेति ॥ ५० ॥

याप्रमाणें भगवान् बोलल्यावर काय झालें तें **संजय** धृतराष्ट्रास सांगतोः—हे राजन् धृतराष्ट्रा, सर्व भूतांत असलेला परमात्मा क्रीडादि गुण-विशिष्ट श्रीकृष्णानें, याप्रमाणें बोलून शंखचक्रादि धारण केलेलें असें आपलें सौम्य कृष्णरूप अर्जुनास पुनः दाखविलें, आणि भययुक्त झालेल्या अर्जुनास, तो सौम्य देह धारण केलेला श्रीकृष्ण ‘ भिऊं नको ’ असें ह्मणाला—त्यास आश्वासन दिलें,—या ठिकाणीं ‘ विश्वरूप घेतलें व पुनः सौम्य रूप झाला ’ याचा अर्थ असा कीं, तो परमात्मा भगवान् सर्वदा एका प्रकारचाच असून, ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें, समयविशेषीं त्यांस अनेक प्रकारचीं रूपें दाखवितो; आणि “ द्रष्टुमिच्छामि ते रूपं ” या वाक्यानेंही, असलेलेंच रूप दाखीव, अशी, अर्जुनानें प्रार्थना केली आहे. परमात्म्याच्या स्वरूपाला परापर भेद हा, मूढ जनाच्या ज्ञानाला अनुसरून योग्यच होय; खरें पाहिलें असतां, अवतार रूपें आणि मूळरूप व विश्वरूप यांत कांहींच भेद नाहीं असें समजावें. ॥ ५० ॥

अर्जुन उवाच ।

दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ॥
इदानीमस्मि संवृत्तः सचेतः प्रकृतिं गतः ॥ ५१ ॥

किंचित् मनुष्यवद्दृश्यमानत्वान्मानुषंरूपं दृष्ट्वा सचेताः प्रसन्नचित्तः संवृत्तोजातोस्मि प्रकृतिं पूर्वस्वभावं स्वस्थतां गतोस्मि ॥ ५१ ॥

यानंतर अर्जुन काय बोलला तें ( संजय धृतराष्ट्रास ) सांगतो:—हे भगवान् भवभंजना कृष्णा, मनुष्यासारखें दिसणारें हें तुझें सौम्य असें कृष्णरूप पाहून, आतां सावध होऊन, माझें मन पूर्वींसारखेंच स्वस्थ झालें. ५१

श्रीभगवानुवाच ।

**सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम ॥**
**देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः ॥ ५२ ॥**

यन्मे रूपं दृष्टवानसि अस्यरूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणोदेवा अपि इदानीं दृष्टवंतः तदिदं सुदुर्दर्शमितियोजना ॥ ५२ ॥

असें अर्जुनाचें भाषण ऐकून श्रीकृष्ण ह्मणतात:—हे अर्जुना, पहाण्यास फारच भयंकर असें माझें विश्वरूप तूं पाहिलेंस. आणि त्या रूपाच्या दर्शनाची नित्य इच्छा करणाऱ्या देवांनींही तें आज पाहिलें. तुझ्यापेक्षां ( योग्यतेनें ) कमी असे लोक तें रूप पहाण्यास असमर्थ आहेत. ॥ ५२ ॥

**नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ॥**
**शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ ५३ ॥**

न वेदयज्ञादिनोक्तमर्थं स्पष्टयति । नाहमिति ॥ ५३ ॥

वेदादिसाधनांनीं हें स्वरूप दिसत नाहीं असें सांगितलें, त्याचें जास्त स्पष्टीकरण करितात:—अर्जुना, तूं जसें माझें विश्वरूप पाहिलेंस, त्या प्रकारचा मीं वेदाध्ययनानें, तपाचरणानें, दानें दिल्यानें व यज्ञयागादिकांनींही तुझ्यापेक्षां कनिष्ठ अधिकाऱ्यांस पहाण्यांस शक्य नाहीं. ॥ ५३ ॥

**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ॥**
**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परन्तप ॥ ५४ ॥**

वेदादीनां मुख्योपायत्वाभावात् । कस्तर्हि वेदादिसाध्यो योपायइत्यत आह । भक्त्येति । भक्त्येति तत्त्वेन ज्ञातुं द्रष्टुं

साक्षात्कर्तुं प्रवेष्टुं सायुज्यं प्राप्तुमनन्यया असहाययाभक्त्यैव शक्यः ॥ ५४ ॥

वेदाध्ययनादिक साधनांनीं विश्वरूपाचें दर्शन होत नाहीं. यावरून त्याचें दर्शन व्हावयास कांहींच साधन नाहीं कीं काय? अशी शंका येईल ह्मणून तिचें समाधान सांगतातः—हे अर्जुना, पूर्वी सांगितल्याप्रमाणें, अनेकगुणविशिष्ट विश्वरूपी असा मी, अनन्यभक्तीच्यायोगानें समजण्यास व दृष्टीस पडण्यास शक्य आहे व सायुज्य मुक्तींत गमन करण्यासही शक्य असा आहे. अतएव माझें दर्शनादिक होण्यास अनन्यभक्तीच मुख्य साधन आहे. ॥ ५४ ॥

मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः ॥
निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पाण्डव ॥ ५५ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां० विश्वरूपदर्शनयोगो नामैकादशोऽध्यायः ॥११॥

एतदेव भक्तिस्वरूपं दर्शयन्नाह । मत्कर्मकृदिति ॥ ५५ ॥

इति श्रीमद्भगवद्गीताविवृतौ विद्याधिराजभट्टोपाध्याय विरचितायाम् श्रीमध्वमतानुवर्तिनी व्याख्योपेतायाम् एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥

भक्तीचें स्वरूप सांगतातः—हे पांडवा अर्जुना, माझ्या संतोषाकरितांच सर्व कर्म कारितो, व या ब्रह्मरुद्रादिजीवगणांपेक्षां मी श्रेष्ठ आहें असें समजतों, माझें ठायीं ज्याची असाधारण भाक्ति आहे असा, पुत्र, मित्र, कलत्रादिकांचे ठायीं ज्याची आसक्ति नाहीं असा, हरिभक्तियुक्त अशा सर्व प्राण्यांच्या ठायीं वैरभावरहित असणारा, असा जो सद्गुणी मनुष्य तो माझें स्थान जें वैकुंठ त्यांत, माझ्या जवळ भिन्न राहूनच आनंदाचा अनुभव घेतो. ह्मणून तूंही मला संतोष देणारें, आणि तुझ्या धर्मास योग्य असें जें युद्ध तें करण्यास आळस सोडून तयार हो. ॥ ५५ ॥

येथें श्रीमदिन्द्राकान्ततीर्थ श्रीपादविरचित प्राकृत टीकेचा अकरावा अध्याय समाप्त झाला.

# अथ द्वादशोऽध्यायः

अर्जुन उवाच ।

एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ॥
ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥

श्रीगुरुभ्यो नमः । अस्मिन्नध्याये भगवदव्यक्तोपासनयोर्मध्ये भगवदुपासनाधिक्यं निर्णीयते । अंतवत्तुफलंतेषामिति ब्रह्माद्युपासकानामंतवत्फलवत्वस्योक्तत्वात्तेभ्योभगवदुपासकानामुत्तमत्वं निर्णीतम् लक्ष्म्यास्तु चतुष्कपर्दा युवतिः सुपेशा । अहं रुद्रेभिर्वसुभिश्चराम्यहमादित्यैरुत विश्वदेवैः । त्वयाजुष्टऋषिर्भवति देवित्वया ब्रह्मागतश्रीरुतत्वयेत्यादिश्रुतिषुमहामहिमत्वेनप्रसिद्धायाउपासनं श्रियंवसाना अमृतत्वमायन्नित्यादौ मोक्षसाधनत्वं श्रूयते अतो मार्गद्वयेनैकमेव फलं प्राप्नुवतांमध्येकेश्रेष्ठाइति विशेषादर्शनात्कस्यचित्संशयः स्यात् तदनुग्रहार्थं सूक्ष्मयुक्तिज्ञानार्थं च भगवदुपासकानामुत्तमत्वं जानन्नप्यर्जुनउवाच । एवमिति । एवं दृष्टश्रुतरूपं त्वां ये भक्ताः सततमुद्युक्ताः एवं मत्कर्मकृदित्याद्युक्तप्रकारेणोपासते येचाप्यक्षरमव्यक्तं चित्प्रकृतिमुपासते तेषां मध्ये के योगवित्तमाः अतिशयेनोपायविदः यद्यप्यव्यक्तादिशब्दाः भगवद्वाचकाः अव्यक्तोक्षरइत्युक्तत्वात् तथापि भगवत्प्रतियोगित्वेनोक्तत्वात्परब्रह्मणश्च भगवतोन्यस्याभावादत्र चित्प्रकृतिवाचिनएव तथा कूटस्थोक्षरउच्यते इत्यत्रापि अक्षरादन्यस्योत्तमत्वाभिधानात् अव्यक्ताक्षरादिशब्दाः पुराणादिषु चित्प्रकृतावपि प्रसिद्धाः १

या ( बाराव्या ) अध्यायांत भगवान् श्रीनारायण आणि तत्परिग्रहभूत चित्प्रकृति लक्ष्मी या दोहोंच्या उपासनेंत श्री नारायण भगवानाचीच उपासना श्रेष्ठ आहे असा निर्णय केला आहे. ब्रह्मदेवादिकांची उपासना करणारांस, अनित्य असे जे स्वर्गादिलोक ते प्राप्त होतात, असें " अंतवत्तुफलं तेषां " या वाक्यानें सांगितलें आहे, त्यावरून, भगवंताचे भक्तांस ( उपासकांस ) नित्यसुखात्मक मुक्ति मिळते असें उघड होतें; त्यामुळें भगवंताची

उपासनाच श्रेष्ठ असेंहि सिद्ध होतें. तरी कित्येक श्रुतींत, ब्रह्मरुद्रादि–पद-दायक ह्मणून महालक्ष्मीचें मोठें माहात्म्य वर्णन केलेलें आहे. व "श्रियं वसाना अमृतत्त्वमायन्" या श्रुतीचा अर्थही "लक्ष्मीच्या आश्रयानें मोक्षास जातात" असा दिसतो; या दोन कारणांमुळें, लक्ष्मीच्या भक्तांस तिच्या भक्तीनें मोक्ष प्राप्त होण्याचा संभव असल्यावरून, तिच्या भक्तांपेक्षां परमात्म्याचे (भगवंताचे) भक्तच श्रेष्ठ असें कां ह्मणावें? दोघांची भक्ति करणारांला प्राप्त होणारें मुक्तिरूप फळ एकच आहे ह्मणून, परमात्म्याचे भक्तच श्रेष्ठ आहेत, असें ह्मणण्यास कित्येक लोकांस शंका आल्यावाचून राहणार नाहीं; ह्मणून, अशा संशयग्रस्त दीनजनांस, त्यांचा संशय दूर करण्यासाठीं, भगवंताचें वचनरूपी अमृत पाजावें किंवा त्यांतील सूक्ष्म मर्म समजावें ह्मणून, लक्ष्मी किंवा ब्रह्मरुद्रादिक देवांचे भक्तांपेक्षां, भगवंताचे भक्तच श्रेष्ठ होत हें जाणत असूनही अर्जुन, भगवान् श्रीकृष्णास प्रश्न करितो, हे परमात्मन् श्रीकृष्णा, तुझ्या आराधनेंत निरंतर तत्पर असे जे तुझे भक्त, पूर्वीं पाहिलेल्या आणि ऐकिलेल्या रूपानेंयुक्त अशी तुझी, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें उपासना करितात; किंवा नाशरहीत अशा लक्ष्मीची उपासना करितात; या दोघांच्या भक्तांमध्यें, मुक्तीस जाण्यास श्रेष्ठ असा उपाय करणारे कोण समजावे हें स्पष्टपणें मला सांगा. ॥ १ ॥

श्रीभगवानुवाच ।

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ॥**
**श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २ ॥**

**अव्यक्तोपासकेभ्योमदुपासकाएवोत्तमाइत्युत्तरम् भगवानुवाच । मयीति । ये मयि मनआवेश्य नित्ययुक्ताः सततोद्योगिनः परया श्रद्धया आधिक्येनोपेतायुक्तामामुपासते ते युक्ततमाः साधकोत्तमा मताः ॥ २॥**

लक्ष्मीभक्तांपेक्षां माझेच भक्त श्रेष्ठ आहेत असें श्रीकृष्ण भगवान् सांगतातः—भगवान् ह्मणतात, हे अर्जुना, जे मनुष्य माझ्या ठिकाणींच चित्त लावून माझ्या सेवेचाच उद्योग करितात ह्मणजे माझी उत्तमप्रकारें भक्ति करितात, व मजला लक्ष्मीपति असें समजून, माझी उपासना वगैरे करितात, ते मुक्तीस साधन श्रेष्ठ उपाय करणारे असें मी समजतों. ॥ २ ॥

**ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ॥**
**सर्वत्रगमचिन्त्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३ ॥**

ननु त्वदुपासकानां मोक्षफलवत्वेनोत्तमत्वे अधमत्वादव्यक्तोपासकानां मोक्षफलगामित्वं नस्यात्ततश्च श्रुतिविरोधइत्यत आह। येत्विति। अक्षरमविनाशि सूक्ष्मत्वादनिर्देश्यं अप्रसिद्धत्वात्सर्वजगदुपादानप्रकृत्यभिमानित्वाच्चाव्यक्तम् लक्ष्म्यानामैतादितरत् विशेषणं सर्वत्रगं देशतोव्याप्तं गुणबाहुल्यादचिंत्यं सूक्ष्मत्वादप्रसिद्धत्वाद्गुणबाहुल्यतस्तथा। अनिर्देश्यौ तथा व्यक्तावाचिंत्यौश्रीश्चमाधवौइतिवचनात् कूटे आकाशे अभिमानित्वेन स्थितं कूटस्थं आकाशे संस्थितात्वेषा ततः कूटस्थितामतेत्युक्तेः अचलं कदापि स्वपदादभ्रष्टं नचलेत्स्वात्पदाद्यस्मादचला श्रीस्ततोमतेतिवचनात् ध्रुवंनिर्विकारम् ॥ ३ ॥

तुझ्या भक्तांस जर मोक्षरूप फळ मिळतें ह्मणून ते उत्तम होत असें ह्मणतोस तर, अव्यक्त अशा लक्ष्मीच्या भक्तांस अधमत्व येतें असें सहजच सिद्ध होतें. आणि त्यांस मुक्तिरूप फळ मिळणार नाहीं असेंही सिद्ध होतें. आणि यामुळें " लक्ष्मीभक्तांस मुक्ति मिळते " असें ज्या श्रुतींत सांगितलें आहे त्या श्रुतीचा विरोध तुझ्या वाक्यास येतो; अशी अर्जुनास शंका येईल असें समजून तिचें समाधान करितात:—जे लोक, नाशरहित, अतिसूक्ष्म, सर्वव्यापी, अनेक गुणयुक्त असल्यामुळें चिंतन करण्यास कठीण, आकाशाभिमानी असल्यामुळें निर्विकार, सर्वदा अचंचल ( स्थानभ्रष्ट न होणारी ) अशी जी अव्यक्त शब्दवाच्य महालक्ष्मी तिची उपासना करितात:— ॥ ३ ॥

**सन्नियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ॥**
**ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४ ॥**

येत्विंद्रियाणां ग्रामं समूहं सम्यक् नियम्य सर्वत्र समबुद्धयः षष्ठोक्तप्रकारेण जीवचिदादिसाम्यज्ञानवंतः भगवदविरोधि सर्वभूतहितेरताः संतः अक्षरत्वादि विशेषणविशिष्टं मोक्षदानसामर्थ्ययुक्तमव्यक्तं परितः सदाचारविष्णुभक्त्यादिसाधनसंपत्योपासते ते मामेव प्राप्नुवंति ॥ ४ ॥

जे ज्ञानी समस्त इंद्रियांचा निग्रह करतात व सहाव्या अध्यायांत सांगितल्याप्रमाणें साम्य ज्ञान असणारे व भगवंतास अविरुद्ध असणाऱ्या सर्व प्राणिमात्रांच्या हिताविषयीं प्रयत्न करणारे, अक्षरादि विशेषणांनीं युक्त, अशा चित्प्रकृति लक्ष्मीची उपासना सदाचार व विष्णुभक्ति इत्यादि साधनांनीं युक्त होऊन करतात तेही मजप्रत पावतात. माझी प्राप्ति त्यांस होते. ॥ ४ ॥

**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ॥**
**अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥**

कथंतर्हि त्वदुपासकानामुत्तमत्वमित्यतआह । क्लेशइति । केवले अव्यक्ते आसक्तचित्तानां क्लेशोधिकतरःकथं गम्यतइति गतिर्मार्गः । अव्यक्तोपासनद्वारकोमत्प्राप्तिमार्गोदुःखं यथा तथाऽवाप्यतेही पृथगव्यक्तोपासने उक्तप्रकारेण पर्युपासनमिंद्रियग्रामातिनियमनं सर्वत्रसमबुद्धित्वं सर्वभूतहितेरतत्वादि सुष्टवाचारमंतरेणाव्यक्तप्रसादो न भवति किंचिद्भगवदुपासनं कृत्वा बहुकालं पृथक्श्रियमुपास्य पुनः श्रियासह निरंतरं भगवदुपासनं कर्तव्यं ततो मुक्तिरिति चिरेणैव भवतीति क्लिष्टोयं मार्गः ॥ ५ ॥

माझ्या प्राप्तीचा उपाय, जे लक्ष्मी देवीची भक्ति करितात त्यांस अंतीं दुःखदायक होतो; याकरितां ज्यांचें अंतःकरण केवळ लक्ष्मीचेच ठिकाणीं आहे त्यांस, शुद्धाचाररूप अतिक्लेश होतात. परमात्म्याच्या उपासनेशिवाय, केवळ लक्ष्मीदेवीची उपासना केल्यास, ती ( लक्ष्मी ) शाप देते, ह्मणून आधीं परमात्म्याची उपासना करून नंतर लक्ष्मीदेवीची उपासना करावी; ह्मणजे लक्ष्मी प्रसन्न होते; श्रीविष्णुभक्त्यादि साधनानीं प्रसन्न झालेली लक्ष्मीदेवी, परमात्म्याची उपासना करण्याकडे बुद्धीची प्रेरणा करिते. मग परमात्म्याचे उपासनेच्या योगानें अपरोक्षज्ञान उत्पन्न होऊन, त्या परमात्म्याच्याच प्रसादानें मोक्षप्राप्ति होते. यामुळें लक्ष्मीदेवीची उपासना फार कष्टानें साध्य होणारी आहे असें समजावें. ॥ ५ ॥

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ॥**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ॥ ६ ॥**

श्रीपतित्वेन भगवदुपासने परमश्रद्धामात्रयुक्तानां सुष्ठ्वाचारादे- रूनत्वेपि श्रीपतिप्रसादसंभवादचिरान्मोक्षोभवतीति सुगमोयं पंथाइ- त्याह । येत्वित्यादिना । येत्वनन्येनैव योगेन विष्णोरन्यन्नस्मरेद्यो- विना तत्परिवारताम् तदधीनतां वाऽनन्ययोगी सपरिकीर्तित इत्युक्त- रीत्या लक्ष्म्यादीनां परिवारत्वादिना तत्साहित्यलक्षणेन नतु पृथ- क्त्वेन मामुपासते ॥ ६ ॥

जे सर्व कर्मे मला समर्पण करून, सर्वोत्तम आहे असें जाणून लक्ष्मी- पति, असें समजून मुख्यतः माझेठायींच असलेली, अशा एकांतभक्तीनें माझें ध्यान करून माझी उपासना करितात. ॥ ६ ॥

**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।**
**भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ ७ ॥**

तेषां मृत्युरूपात् संसारात् न चिराच्छीघ्रमुद्धर्त्तास्मि । उक्तंच । अविष्णुज्ञैरतद्भक्तैस्तदुपासाविवर्जितैः । शपेदुपासिता प्येषा श्रीस्तांस्त- द्धरितत्ववित् । मद्भक्तस्तमुपास्यैव श्रियं ध्यायीत नित्यदा । तेन तुष्टातु साऽच्छिद्रं दद्याद्विष्णोरुपासनम् । ततस्तद्दर्शनान्मुक्तिं यात्यसौ नात्र संशयः । तथापि सर्वपरमां सर्वदोषविवर्जिताम् । ज्ञात्वा श्रियं तत्परमं तत्पतिं पुरुषोत्तमम् । विज्ञायोपासते नित्यं ते हि युक्ततमामताः । यतः क्लेशोधिकस्तेषां पृथक्श्रियमुपासताम् । विष्णुना सहिता ध्याता सा- पि तुष्टिं परां व्रजेत् । अन्यथा तु पुनर्विष्णोः श्रीपतित्वेन चिन्तनम् । अच्छिद्रमेव कर्तव्यमिति मुक्तिश्रिराद्भवेत् । तस्मादक्लेशतो मुक्तिः क्षिप्रं विष्णुमुपासतामिति ॥ ७ ॥

याप्रमाणें माझेठिकाणींच चित्त ठेवणाऱ्या ( आसक्तचित्त ) भक्तांचा, मी फार लौकर ( उशिरां नव्हे ) या क्षणिक जननमरणरूप संसारसागरा- पासून, उद्धार करितों. ॥ ७ ॥

**मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ॥**
**निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥ ८ ॥**

भगवदुपासनस्योत्तमत्वमभिधायोत्तमत्वादेवकुरु तदलाभे तत्सिद्ध्यर्थमुपायांतराणि संपादयेत्याह । मयीत्यादीना । मय्येव मनः- आधत्स्व मामेवोपास्व बुद्धिं मयिनिवेशय मां जानीहि अतऊर्ध्वमेतत्संपत्त्यनंतरं मय्येव निवासिष्यासि निर्दुःखानंदात्मिकांस्थितिं प्राप्स्यसि ॥ ८ ॥

ह्मणून माझ्याठिकाणींच दृढ मन ठेवून, ज्ञानपूर्वक माझीच उपासना कर; उपासना करण्यास अशक्य वाटलें तर विश्वासानें शास्त्र श्रवण करून ज्ञान संपादन कर; ह्मणजे, माझ्याठिकाणींच स्वरूपसुखानें भिन्न राहून वास करशील, यांत संशय नाहीं. ॥ ८ ॥

**अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् ॥**
**अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनञ्जय ॥ ९ ॥**

अथ मयिस्थिरं चित्तं समाधातुं न शक्नोषि ततोभ्यासयोगेन मामाप्तुमिच्छ ॥ ९ ॥

हे धनंजया, माझे ठिकाणीं चित्त ठेवणें तुला जड वाटत असेल तर, दरदिवस त्याचा थोडथोडा अभ्यास करीत जा; ह्मणजे तुझें चित्त स्थिर होईल. त्या ज्ञानरहित अभ्यासानें माझ्या प्राप्तीची इच्छा कर. ॥ ९ ॥

**अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ॥**
**मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ॥ १० ॥**

अभ्यासेप्यसमर्थश्चेदसि ततः सर्वकर्माणि मद्विषयाणि कुर्वन् मत्कर्मपरमोभव सिद्धिं मोक्षम् ॥ १० ॥

हे अर्जुना, ज्ञानरहित जें ध्यान त्याच्या अभ्यासाविषयींही जर तूं असमर्थ आहेस तर मला संतोष होईल अशीं कर्मे करूं लाग; कारण माझ्या प्रीत्यर्थच कर्मे केल्यास तुला सिद्धि मिळेल. ॥ १० ॥

**अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ॥**
**सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ ११ ॥**

अथैतदपि कर्तुमशक्तोसि तर्हि अन्यदेवादिपूजनं कृत्वाऽन्ते मत्समर्पणलक्षणं योगमात्रमाश्रितः यतात्मवान् शुद्धचित्तः सर्वकर्मफलत्यागं कुरु । उक्तंच । वैष्णवान्येव कर्माणि यः करोति सदा नरः । जपार्चामार्जनादीनि स्वाश्रमोक्तानि यानि च । स तत्कर्मेति विज्ञेयोयोन्येदेवादिपूजनम् । कृत्वाहरावर्पयति स तु तद्योगमात्रवानित्यादि ॥११॥

हेंही ( माझ्या प्रीत्यर्थ कर्म करणें ) तुझ्यानें होत नसेल तर, माझ्याशिवाय इतर देव ह्मणजे रमा किंवा ब्रह्मरुद्रादि देवांची पूजा करून, ती शेवटीं मला समर्पण केलीस ह्मणजे चित्त शुद्ध होईल. त्या कर्मांपासून मिळणारीं जीं स्वर्गादि अनित्य फळें, त्यांची इच्छा धरूं नको. जो मनुष्य विष्णूला संतोष देणाऱ्या अशा अष्टाक्षरादि वैष्णव मंत्रांचा जप करितो, आपल्या आश्रमाला योग्य अशा रामकृष्णादि अवतारांची पूजा, अथवा, भगवान् श्रीहरी नारायण सर्वांतर्यामी असून, फलदाता तोच आहे, असें समजून ब्रह्मरुद्रादि देवांची पूजा—ते भगवंताचे परिवार आहेत असें समजून—करितो, व ती श्रीहरीपरमात्म्याला अर्पण करितो, तो मोक्षप्राप्तीचा उपाय जाणतो ( असें समजावें. ) सर्व साधनांमध्यें मोक्षप्राप्तीला मुख्य साधन माझी उपासनाच असल्यानें तिचा सज्जनानीं आश्रय करावा, हें तात्पर्य. ॥ ११ ॥

## श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ॥
## ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छान्तिरनन्तरम् ॥ १२ ॥

ध्यानालाभे ज्ञानं तदलाभेऽभ्यास इत्येतसमर्थयते। श्रेयोहीति। अभ्यासादज्ञानपूर्वाज्ज्ञानमेव श्रेयः ज्ञानमात्रात्सज्ञानं ध्यानं विशिष्यते तस्मात्ध्यानात्कर्मफलत्यागः ज्ञानपूर्वे ध्यानेपि सकामान्निष्काममेवध्यानमधिकमितियावत् त्यागात् फलत्यागोपलक्षितानिष्कामध्यानादनंतरं ज्ञानमात्रव्यवधानेन शांतिर्मुक्तिर्भविष्यति । तदुक्तम् । असम्यक् ज्ञानिनोध्यानाज्ज्ञानमेव विशिष्यते। ज्ञात्वा ध्यानं ततस्तस्मात्तत्फलच्छाविवर्जितः । तस्माज्ज्ञानाद्भवेन्मुक्तिस्त्यागाद्ध्यानयुतात्स्फुटमिति ॥१२॥

ध्यान करण्यास असमर्थ असशील तर ज्ञानाचा आश्रय कर; तेंही होत नसल्यास अभ्यास कर, या ह्मणण्याचें प्रतिपादन करितातः—ज्ञानरहित ध्याना-

पेक्षां सद्गुरु वैष्णवोपदिष्ट ज्ञान श्रेष्ठ; ज्ञानरहित ध्यानापेक्षां ज्ञानसहित ध्यान श्रेष्ठ; ज्ञानसहित सकाम कर्मापेक्षां, कर्मफळाची इच्छा न करितां ज्ञानपूर्वक ध्यान श्रेष्ठ; कर्मफळेच्छारहित ज्ञानपूर्वक ध्यानापेक्षां भगवंताचें अपरोक्षज्ञान श्रेष्ठ; ज्या अपरोक्षज्ञानानें प्रसन्न झालेल्या परमात्म्यापासून, जन्ममरणरूप संसारबंधनांतून मुक्त होऊन तो, नित्यसुखात्मक अशा वैकुंठास जातो ॥ १२ ॥

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ॥**
**निर्ममो निरहङ्कारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥**

**ये तु सर्वाणि कर्माणीत्यादिनोक्तं प्रपंचयति । अद्वेष्टेत्यादिना मैत्रः समेषु सत्सुस्नेहवान् करुणः अधमेषु सत्सुकृपावान् ॥ १३ ॥**

"येतु सर्वाणि" या मागील वचनाचा अभिप्राय उघड करून सांगतातः—जो मनुष्य, आपल्यापेक्षां श्रेष्ठ आहेत त्यांचा द्वेष करीत नाहीं, आपल्या बरोबरीच्यांशीं स्पर्धा करीत नाहीं, व त्यांजबरोबर मित्रत्वानें वागतो, आपल्यापेक्षां कनिष्ठ आहेत त्यांचा तिरस्कार करीत नाहीं तर त्यांजवर दयाच करितो, ( त्यांच्याविषयीं दयाळू असतो ) पुत्र—मित्र-कलत्रादिकांचे ठिकाणीं ममता ठेवीत नाहीं, ज्याला अहंकार मुळींच नाहीं, त्या त्या काळीं आपल्या योग्यतेप्रमाणें परेच्छेनें प्राप्त होणारें सुख किंवा दुःख यांपासून मनांत आनंद अगर खेद मानीत नाहीं, व निरंतर क्षमाशील असतो, तो माझा प्रीतिपात्र आहे असें समज. ॥ १३ ॥

**संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ॥**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मे भक्तः स मे प्रियः ॥ १४ ॥**

**यदृच्छालब्धेन संतुष्टः ॥ १४ ॥**

जो मनुष्य इष्ट ( वस्तूचा ) वियोग झाला असतां किंवा अनिष्ट ( नावडत्या वस्तूचा ) प्राप्त झालें असतां संतुष्टच असून कर्म किंवा ध्यानयोग यांत निरत असून, मी परमात्माच सर्वोत्तम असें निश्चयपूर्वक समजतो, ज्याची बुद्धि माझ्या चरणांचें ध्यान करण्यांत निरंतर आसक्त असते, अशा गुणांनीयुक्त जो माझा भक्त तो मला अतिशय आवडतो असें समज. ॥ १४ ॥

**यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ॥**
**हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ १५ ॥**

नोद्विजते न बिभेति सचेति च शब्दाद्भक्तइत्यनुकृष्यते । १५ ।

ज्याच्यापासून लोकांनां भीति ( ची शंकासुद्धां ) मुळींच नाहीं; व दुसऱ्याचें दुःख पाहून आनंद व सुख पाहून दुःख होणें इत्यादि दुर्गुणांनीं रहित असतो, तो मला प्रिय आहे असें समज. ॥ १५ ॥

**अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ॥**
**सर्वारम्भपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १६ ॥**

शुचिर्बाह्यांतरशुद्धिमान् दक्षः पटुः उदासीनः सर्वत्रसमः सर्वारंभपरित्यागीति सर्वारंभाभिमानत्यागेन फलत्यागेन भगवति समर्पणरूपेणचत्यागी। तस्यैवप्रपंचः शुभाशुभपरित्यागीति भक्त्यादिव्यतिरेकेणेतराकांक्षारहितः । उक्तंच । भक्तिंज्ञानंचवैराग्यमृतेयोनेच्छति कचित् । शुभाशुभपरित्यागी विद्वद्भिः कीर्तितोहिस इतिवचनात् ॥१६॥

दैवानें प्राप्त होणाऱ्या वस्तूविषयीं निरिच्छ, मृत्तिका जलादिकेंकरून बाह्यशरीरशुद्धि व रागद्वेषादिकांचा त्याग ही अंतःकरणशुद्धि यांनीं युक्त पवित्र—ब्रह्मज्ञानाविषयीं समर्थ, शत्रुमित्रादि दोष ज्यास नाहींत, मानसिक व्यथारहित, विष्णुप्रिय भक्ति इत्यादि कर्मांशिवाय अवैष्णव कर्मांची ज्यास आसक्ति नाहीं, अशा गुणांनीं जो युक्त असतो, तो माझा भक्त व मला मान्य जाणावा. परमात्मभक्ति, ज्ञान, त्याचप्रमाणें संसारासारतारूप वैराग्य यांवांचून इतर शुभाशुभांचा त्याग करणारांसच ‘ सर्वारंभ परित्यागी ’ असें ह्मणतात. ॥ १६ ॥

**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति ।**
**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥१७॥**

हर्षादिभिर्मुक्तइत्युक्ते कादाचित्कमपि भवतीति यो न हृष्यतीत्यादि हर्षामर्षेत्यादिकमुपचारपरिहारार्थम्। उक्तंच। धृतिर्मदादधर्माय-हर्षोनामप्रकीर्तित इत्यभिधानात् ॥ १७ ॥

हर्षादिक न होणें हें कोणालाही क्वचित् ज्ञात्यावांचून रहात नाहीं, तर तोच ज्ञानी किंवा काय? याविषयीं सांगतात:—जो मनुष्य मदानें अधर्म करण्यास प्रवृत्त होत नाहीं, अप्रिय वस्तूची प्राप्ती झाली तरी दुःख मानीत नाहीं व प्रिय वस्तुचा वियोग झाला तरीही दुःखी होत नाहीं; जी वस्तु मिळाली नाहीं तिची इच्छा करित नाहीं; भक्ति, ज्ञान व वैराग्य हीं ज्याचे ठिकाणीं आहेत, सकाम कर्में करण्यांत रत नसलेला, असा जो माझा भक्त तोच माझ्या प्रीतीलापात्र आहे, असें समज. ।। १७ ।।

**समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ॥**
**शीतोष्णसुखदुःखेषु समः सङ्गविवर्जितः ॥ १८ ॥**

**सुखादिषु साम्यं हर्षादिराहित्यं च प्रायिकमेव । उक्तंच । प्रायः सुखादिषुसमः प्रायो हर्षादि वर्जितः । तथोच्यते यथाल्पस्वो निःस्वइत्युच्यते जनैः । नहि मुख्य तया साम्यं कस्यचित्सुखदुःखयोः । न च हर्षादिसंत्यागो यावन्मुक्तिः कुतश्चनेति ॥ १८ ॥**

शत्रु आणि मित्र ज्यास सारखेच वाटतात. मान किंवा अपमानानें हर्ष किंवा विषाद न मानणारा, शीत—उष्ण, सुख—दुःख, हीं प्राप्त झालीं असतां त्यांस समान मानणारा, ज्याला विषयांची आसक्ति नाहीं, असा जो असतो तो मला प्रिय आहे असें समज. सुखदुःखांचे प्राप्तीनें हर्ष किंवा शोक न मानणें हें सर्व काळीं होत नाहीं हें कधीं कधीं होतें; जरी इष्टानिष्टप्राप्तीनें ज्याला हर्ष किंवा खेद होत नाहीं.—ज्याप्रमाणें अल्प धन ज्याच्या जवळ आहे अशा मनुष्यास " त्याच्या जवळ काय आहे? " असें ह्मणण्याचा परिपाठ आहे तरी, त्याच्या जवळ ( अल्प धन असलेल्या जवळ ) कांहींच नाहीं असें ह्मणतां येत नाहीं, त्याप्रमाणें येथेंही, हर्षादिक अधिक नाहींत असा अभिप्राय समजावा. कारण ज्ञान्याला मुक्ति मिळेपर्यंत, हर्षादिकांचें राहित्य निःशेष होत नाहीं, असें प्रमाणसिद्ध आहे. ।। १८ ।।

**तुल्यनिन्दास्तुतिर्मौनी संतुष्टो येन केन चित् ॥**
**अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥**

**अनिकेतः अनियतवासः भगवदाश्रयो वा ॥ १९ ॥**

जो मनुष्य निंदेनें किंवा स्तुतीनें समचित्त ( दोन्हींही झालीं असतां ज्याच्या मनाला हर्ष अथवा शोक होत नाहीं ) असून नियमित भाषण कर-

णारा, ज्या ज्या वेळीं जें जें प्राप्त होईल त्यानेंच संतुष्ट असणारा, एकाच ठिकाणीं कायमचा न रहाणारा, परमात्म ज्ञानाचे ठिकाणीं स्थिर बुद्धि असलेला असा जो माझा भक्त तो मला आवडतो असें समज. ॥ १९ ॥

**ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ॥**
**श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥ २० ॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां भक्तियोगो नाम द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥**

भक्तेराधिक्यं ज्ञापयितुं पुनर्भक्ताइत्युक्तं पृथग्द्वेषादिसाधनवंतो-भक्ताः प्रियाः समस्तसाधनवंतोभक्ताः अतीवप्रियाःइत्याशयेनोपसंहरति । येत्विति । धर्मोविष्णुस्तस्मादनपेतं तद्विषयं धर्म्यं अमृतमित्यादि संसारनाशकंचेति धर्म्यामृतं यथोक्तं सर्वम् ॥ २० ॥

इति श्रीमद्भगवद्गीताविवृतौ विद्याधिराजभट्टोपाध्यायविरचितायाम्
श्रीमध्वमतानुवर्तिनी व्याख्योपेतायाम्
द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

निश्चयानें आस्तिक्यबुद्धीनेंयुक्त मी परमात्मा सर्वोत्तम आहें अशा दृढनिश्चयानें भक्ति करणारे अद्वेषादिरूप मोक्षसाधननिरत असे जे माझे भक्त आहेत, ते मला फार प्रिय आहेत असें समज; भक्त दोन प्रकारचे आहेत; त्यांत अद्वेषादि साधनवंत ते प्रिय भक्त जाणावे व अद्वेषादि साधनें असून, पूर्वीं सांगितलेले कर्मयोगादि विशिष्ट साधनयुक्त धर्म ह्मणजे विष्णुसंबंधीं वैष्णव धर्म हाच संसारांतून तारणारा आहे असें समजून यथोक्त प्रकारानें माझी उपासना ( भक्ति ) करणारे हे अतिप्रिय भक्त आहेत असें समजावें. ज्याकरितां असार अशा संसारांतून तारणारें उत्तम साधन भक्तीवांचून दुसरें नाहीं, त्याकरितां, माझ्या भक्तीला साधन असणारें व तुझ्या वर्णाला उचित—तुझा धर्मच—असें युद्ध तूं करावें. हें भगवंताच्या बोलण्याचें तात्पर्य जाणावें. ॥ २० ॥

येथें श्रीमदिन्दिराकान्ततीर्थ श्रीपादविरचित प्राकृत टीकेचा
बारावा अध्याय समाप्त झाला.

# अथ त्रयोदशोऽध्यायः

श्री भगवानुवाच ।

**इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते ॥**
**एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥ १ ॥**

**श्रीगुरुभ्यो नमः । यत्प्रथमषट्के प्राचुर्येण ज्ञानसाधनमुक्तं यच्च द्वितीये भगवत्स्वरूपं निरूपितं नत्वेवाहमित्यादौ यज्जीवस्वरूपं प्रदर्शितं । भूमिरापइत्यादौ यत् क्षेत्रस्वरूपमभिहितं तद्विप्रकीर्णतयोक्तं सर्वं बुद्ध्यारोहार्थं संक्षिप्यास्मिन्नध्याये प्रदर्श्यते तत्र क्षेत्रादिस्वरूपं वक्तुं भगवज्ज्ञानस्यैव मोक्षहेतुत्वात्किं क्षेत्रादिस्वरूपनिरूपणेनेत्याशंकां तावत्परिहरति। इदमिति । इदं देहेंद्रियादिरूपेण परिणतमुपहतं सज्जीव-हिंसाव्यवहारहेतुः भगवता प्रेर्यतेचेति शरीरमव्यक्तादि क्षीयते भगवता स्थीयते अस्मिन्निति क्षेत्रं उच्यते । हिंसाहेतुश्च जीवस्य परेण प्रेर्यते च यत् । अव्यक्तादिशरीरं तु तत्क्षेत्रं क्षीयतेत्रयदितिवचनात् । एतत्क्षेत्रं योवेत्ति तं तद्विदः क्षेत्रविदः क्षेत्रज्ञइति प्राहुः ॥ १ ॥**

प्रथम षट्कांत ( पहिल्या ६ अध्यायांत ) बहुतकरून ज्ञानाचें निरूपण केलें; दुसऱ्यांत ( अध्याय ७ ते १२ ) भगवंताचें स्वरूप सांगितलें ' नत्वेवाहं ' इत्यादि श्लोकांनीं जीवाचें स्वरूप सांगितलें आणि " भूमिराप " इत्यादि श्लोकांनीं जें देहाचें स्वरूप सांगितलें तें, भिन्न भिन्न ठिकाणीं सांगितलें असल्या-मुळें साधारण बुद्धीच्या मनुष्याचे मनांत तत्काळ येणार नाहीं—त्यास लवकर समजणार नाहीं—ह्मणून, ह्या ( तेराव्या ) अध्यायांत संक्षेपानें त्यांचें निरूपण करितातः—भगवंताचें ज्ञान झालें असतां जर मोक्षप्राप्ति होते, तर देहादिकांचे ज्ञानाचें प्रयोजन काय? अशी शंका येईल तिचा परिहार " इदं शरीरं " या श्लोकानें करितात, ( या अध्यायांत प्रथमच एक क्षेपक श्लोक आहे तो, व त्याचें तात्पर्य:—" प्रकृतिं पुरुषं चैव क्षेत्रं क्षेत्रज्ञमेव च । एतद्वेदितुमिच्छामि ज्ञानं ज्ञेयं च केशव " असा भगवंतास अर्जुन प्रश्न करितो, हे इंद्रियांस प्रेरणा करणाऱ्या भगवान् श्रीकृष्णा, प्रकृति आणि पुरुष, तसेंच क्षेत्र आणि

क्षेत्रज्ञ, व ज्ञान आणि ज्ञेय, हें काय आहे तें जाणण्याची मी इच्छा करितों, ) श्रीकृष्ण भगवान् ह्मणतात, हे कुंतिपुत्रा अर्जुना, जीवांच्या हिंसादिक व्यवहाराला, परमात्म्यानें प्रेरणा केलेल्या देहेंद्रियादिरूपानें परिणत, असें जें अव्यक्तादि तत्त्व याळाच शरीर असें ह्मणतात. यांत जीव प्रेरकरूपानें भगवान् असल्यामुळें, याला क्षेत्र असें नांव आहे; हें जो जाणतो त्याला, क्षेत्र जाणणारा, असें त्याचा विचार जाणणारे ज्ञानी ह्मणतात. ॥ १ ॥

**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत ॥**
**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ २ ॥**

एतद्योवेत्तीत्युक्ते जीवस्यापि किंचित् ज्ञानात् क्षेत्रज्ञत्वप्राप्तेस्तन्निराकरणार्थमुक्तं क्षेत्रज्ञंचेति क्षेत्रज्ञं मां सर्वक्षेत्रेषु स्थितत्वेन विद्धीत्यर्थः। उक्तंच। क्षेत्रज्ञोभगवाविष्णुर्नह्यन्यः क्षेत्रमंजसा। वेत्यसौ भगवाञ्ज्ञेयो व्यक्ताव्यक्तविलक्षण इति। अतः क्षेत्रादिज्ञानस्य क्षेत्रज्ञत्वादिविशिष्टभगवज्ज्ञानोपयोगित्वादुभयोः क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तदेव सम्यगज्ञानमिति मे मतम् ॥ २ ॥

क्षेत्राचें ज्ञान ज्यास आहे त्यास जर क्षेत्रज्ञ असें ह्मटलें तर, जीवालाही थोडेंसें त्याचें ज्ञान असतें ह्मणून त्यासही क्षेत्रज्ञ ह्मणावें लागेल; अशी शंक येईल तिचें समाधान सांगतात:—हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, सर्व क्षेत्रांचा क्षेत्रज्ञ ज्यास ह्मणतात तो मी होय; जीवानें कांहीं क्षेत्रें जाणिलीं तरी, क्षेत्रांचें संपूर्णज्ञान नसल्यामुळें, त्यास क्षेत्रज्ञ असें ह्मणतां येत नाहीं. मीच सर्व क्षेत्रें पूर्णपणें जाणतों ह्मणून मीच क्षेत्रज्ञ आहे असें समज; क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचें ज्ञान होणें ह्मणजे माझेंच ज्ञान होणें हें मला मान्य आहे. क्षेत्र ह्मणजे शरीर, त्याचें ज्ञान झाल्याशिवाय, क्षेत्रज्ञ जो परमात्मा त्याचें ज्ञान होत नाहीं. याकरितां क्षेत्र ह्मणजे काय त्याचें ज्ञान अवश्य असलें पाहिजे ॥ २ ॥

**तत्क्षेत्रं यच्च यादृक् च यद्विकारि यतश्च यत् ॥**
**स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु ॥ ३ ॥**

क्षेत्रादिस्वरूपं वक्तुं प्रतिजानीते। तत्क्षेत्रमिति। यद्यत्स्वरूपं यादृक् यत्प्रकारं यद्विकारि येन विकारेण युक्तं यतो यादृशप्रवृत्त्य-

नुकूलधर्मवतः पुरुषाद्यत् गच्छत् प्रवर्तत इत्यर्थः स च प्रवर्तको यः यत्स्वरूपः यत्प्रभावः यादृशप्रवृत्त्यनुकूलेतर सामर्थ्यवान् तत्सर्वं समासेन संक्षेपतो मे सकाशाच्छृणु ॥ ३ ॥

क्षेत्रादिकांचें स्वरूप सांगण्यास आरंभ करितातः—त्या क्षेत्राचें स्वरूप कोणतें, व कसें आहे, तें कोणत्या विकारांनींयुक्त आहे आणि तें कोणत्या विशिष्टधर्मानें उत्पन्न होतें, त्याला उत्पन्न करणारा कोण, त्या उत्पन्नकर्त्याचा प्रभाव—सामर्थ्य—कसा आहे, तें तुला संक्षेपानें सांगतों. तें ऐक. ॥ ३ ॥

**ऋषिभिर्बहुधा गीतं छन्दोभिर्विविधैः पृथक् ॥**
**ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥ ४ ॥**

तव विश्वासोत्पादनार्थं प्रामाणिकमेवाहं वदइत्याह । ऋषिभिरिति । गीतमिति सर्वत्र संबंधः ऋषिसंप्रदायप्राप्तंनानावेदैर्विविच्योक्तं । ज्ञानानुकूलन्यायवद्भिरथातोब्रह्मजिज्ञासेत्यादिभिर्ब्रह्मसूत्रपदैश्च निर्णीतं ॥ ४ ॥

आपल्या बोलण्यावर अर्जुनाचा विश्वास बसावा ह्मणून, हें तुला मी प्रमाणांनीं सिद्ध करून सांगतों असें ह्मणतात. त्या क्षेत्राचें स्वरूप, वासिष्ठादिऋषींनीं अनेक प्रकारें वर्णिलें आहे. निरनिराळ्या वेदांनीं ( त्याचें ) वर्णन केलें आहे. त्याचप्रमाणें, निश्चयानें ज्ञान झालें आहे असा श्रीमन्नारायणाचा अवतार भगवान् वेदव्यास यांनीं केलेल्या ब्रह्मसूत्रांतही त्याचें प्रतिपादन निर्णयपूर्वक केलें आहे. ॥ ४ ॥

**महाभूतान्यहङ्कारो बुद्धिरव्यक्तमेव च ॥**
**इन्द्रियाणि दशैकं च पञ्च चेन्द्रियगोचराः ॥ ५ ॥**

प्रतिज्ञातमाह । महाभूतानीत्यादिना । पंचमहाभूतानि महत्तत्वमप्यहंकारशब्देन गृह्यते बुद्धिरंतः करणवृत्तिविशेषः अव्यक्तं त्रिगुणात्मकं प्रधानं श्रोत्रत्वक्चक्षुर्जिह्वाघ्राणाख्यानि ज्ञानेंद्रियाणि पंच वाक्पाणिपादपायूपस्थाख्यानि कर्मेंद्रियाणि पंच मनश्चैकमित्येकादशेंद्रियाणि इंद्रियगोचराः विषयाः शब्दस्पर्शरूपरसगंधाः पंच ॥ ५ ॥

प्रतिज्ञात अर्थाचें विवरण करितातः—पृथ्वी, आप ( पाणी ) तेज, वायु व आकाश हीं पांच महाभूतें, अहंकारतत्व, महत्तत्व, बुद्धि ( सदसद्विचारशक्ति ) सत्वादिगुणयुक्त जडप्रकृति ( माया ), कान, त्वचा, डोळे, जीभ, नाक हीं पांच ज्ञानेंद्रियें व वाणी, हात, पाय, पायू, उपस्थ, हीं पांच, कर्मेंद्रियें मिळून दहा, आणि एक मन मिळून अकरा इंद्रियें. पांच इंद्रियांचे विषय—शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे ( होत ) ॥ ५ ॥

**इच्छा द्वेषः सुखं दुःखं सङ्घातश्चेतना धृतिः ॥**
**एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ ६ ॥**

इच्छादयः प्रसिद्धः संघातोदेहः चेतना चित्तव्याप्तिः धृतिः धैर्य इच्छादयोविकाराः इच्छा द्वेषः सुखं दुःखं देहोव्याप्तिश्च चेतसः । तद्विकारा इति ज्ञेयाश्चिद्रूपेच्छादिमिश्रिताइतिवचनात् अव्यक्तादीनामभिमानिन्योदेवतास्तात्पर्यनिर्णयादावुक्तास्तत्रैव द्रष्टव्याः उक्तमुपसंहरति । एतदिति ॥ ६ ॥

इच्छा, द्वेष, सुख, दुःख, संघात ( देह ) चेतना ( चित्तव्याप्ति ) धैर्य या विकारांनीं युक्त हें शरीर यास क्षत्र असें ह्मणतात; हें तुला संक्षेपानें सांगितलें. ( यांत पंचमहाभूतादिक क्षेत्र होत, व इच्छादिक हे क्षेत्रविकार होत असें समजावें. अव्यक्तादिकांच्या अभिमानी देवता श्रीमदानंदतीर्थप्रणीत गीता, तात्पर्यनिर्णयादि सद्ग्रंथांत पहाव्या. ) ॥ ६ ॥

**अमानित्वमदम्भित्वमहिंसा क्षान्तिरार्जवम् ॥**
**आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥ ७ ॥**
**इन्द्रियार्थेषु वैराग्यमनहङ्कार एव च ॥**
**जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥ ८ ॥**

ज्ञेयं वक्तुं ज्ञानसाधनानि ज्ञानं च विकारांतर्भावेनादावाह । अमानित्वमित्यादिना । अमानित्वमात्मश्लाघाराहित्यं आत्माल्पत्वं ज्ञात्वापि महत्वप्रदर्शनं दंभः । ज्ञात्वापि स्वात्मनोल्पत्वं दंभोमाहात्म्य-

भावनमित्यभिधानात् तद्राहित्यमदंभित्वं । क्षांतिः सहिष्णुत्वं । आर्जवं मनोवाक्कायकर्मणामवैपरीत्यं । आचार्योपासनं । ज्ञानिसेवा । शौचं बाह्यांतरशुद्धिः शौचंतु द्विविधं प्रोक्तं बाह्यमभ्यंतरं तथा । मृज्जलाभ्यां स्मृतं बाह्यं भाव शुद्धिस्तथांतरमितिस्मरणात् । स्थैर्यं भयादिना स्वधर्मादचलनं । आत्मविनिग्रहो विशेषेण मनोनियमनं ॥ ७ ॥ ८ ॥

ज्ञेयवस्तु कोणती तें समजण्याकरितां ज्ञानाचीं साधनें आणि ज्ञान विकारांतर्गत भावानें सांगतातः—आपले गुण आपल्या तोंडानें न सांगणें, आपली थोरवी ( मोठेपणा ) न दाखविणें,( ढोंगीपणा नसणें ) हिंसाकर्म न करणें, प्राप्त होणारीं सुखदुःखें प्रारब्धानें प्राप्त होतात असें समजून तीं सहन करणें, मनानें, शरीरानें आणि वाणीनें विपरीत कर्म न करणें, सद्गुरूच्या सेवेंत तत्पर असणें, अंतरबाह्य शुद्ध असणें--( मृत्तिका, जल यानीं बाह्य शुद्धि व मनांत दुष्टविकार नसणें ही अंतःशुद्धि ) भयादिकांमुळेंही स्वधर्मापासून न ढळणें, आणि विशेषेंकरून मनाचा निग्रह करणें. ॥ ७ ॥ इंद्रियांचे जे विषय ते निःसार आहेत, असें समजून त्यांचेठिकाणीं प्रीति न ठेवणें, मनांत अहंकार न धरणें, जन्म, मृत्यु, म्हातारपण ( जरा ) दुःख इत्यादि दोष या संसारांत आहेत असें समजणें. ॥ ८ ॥ ( ७–८ )

**असक्तिरनभिष्वङ्गः पुत्रदारगृहादिषु ॥**
**नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ ९ ॥**

असक्तिः स्नेहाभावः अनभिस्वंगोऽतिपक्वस्नेहाभावः स्नेहः सक्तिः सएवातिपक्वोभिष्वंगउच्यतइत्यभिधानात् दाराः स्त्रियः इष्टानिष्टप्राप्तिषु समचित्तत्वं हर्षविषादाभावः ॥ ९ ॥

मुलगा, बायको, घर इत्यादिकांवर आसक्ति नसणें व त्यांपासून प्राप्त होणारीं सुखदुःखें सदोदित मनांत चिंतन न करणें, इष्ट किंवा अनिष्टप्राप्ति झाली असतां त्यापासून हर्ष किंवा विषाद न पावणें. ॥ ९ ॥

**मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ॥**
**विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ १० ॥**

विविक्तदेशसेवित्वं शुद्धस्थानस्थितिः ॥ १० ॥

अन्य विषयांवरून चित्त आवरून, केवळ माझ्याच ठिकाणीं तें लावून, माझी भक्ती करून, चित्त शुद्ध करून, दुर्जनसभेंत आसक्ति नसतां राहणें. १०

अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ॥
एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥ ११ ॥

अध्यात्मज्ञाने नित्यत्वं नियतत्वं तत्वज्ञानार्थे अपरोक्षज्ञानार्थे दर्शनं शास्त्रदर्शनं । अथवा तत्वज्ञानविषयस्य विष्णोरपरोक्षदर्शनं एतज्ज्ञानमिति निगमनं । ज्ञायतेनेनेतिज्ञानं ज्ञप्तिर्ज्ञान मितिच व्युत्पत्त्या ज्ञानशब्देन ज्ञानसाधनं ज्ञानंचोच्यते । अतोन्यथा तद्विपरीतं यत्तदज्ञानं ज्ञानं तत्साधनंच नभवतीत्यर्थः ॥ ११ ॥

अध्यात्मज्ञानाचे ठिकाणीं निरत रहाणें, अपरोक्षज्ञान होण्याकरितां शास्त्रांचें ज्ञान संपादन करणें, हे अमानित्वादि गुण ज्ञानाला साधन आहेत. यांतील परमात्म्याचे ज्ञानाशिवाय असलेले गुण ज्ञानप्राप्तीस साधन होत असें जाणावें. परमात्म्याचें अपरोक्षज्ञान यालाच ज्ञान असें समजावें. याशिवाय जे गुण आहेत ते अज्ञानास कारण आहेत असें समजावें. ॥ ११ ॥

ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते ॥
अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥ १२ ॥

बहुत्वात्साधनात्युपयोगाच्च पूर्वप्रतिज्ञातं यतश्चयदित्यर्थं पश्चाद्वक्तुं स च योयत्प्रभावश्चेति प्रतिज्ञातार्थं प्रतिपादयन्नेवाह । ज्ञेयमित्यादिना । यत्प्रभावइत्येतदुपपाद्यते । आदिरस्यास्तीत्यादिमत् न आदिमदनादिमत् अनादीत्येवोक्ते छांदसं लिंगव्यत्ययं विभक्तिलोपं वा मन्यमानस्य बहुव्रीहितत्पुरुषसंदेहे स्वयं कारणं न भवतीत्याशंकास्यात्तन्निवृत्त्यर्थं अनादिमदित्युक्तं यद्वा आदिरेषामस्तीत्यादिमंति देहेंद्रियादीनि तद्वर्जितमनादिमत् । मुख्यतोगुणपूर्णत्वात्परं ब्रह्म मूर्तातीतत्वान्नसत् अमूर्तातीतत्वान्नासत् । उक्तंच । मुख्यतो गुणपूर्णत्वात्परं ब्रह्म जनार्दनः । मूर्तामूर्तव्यतीतत्वान्नसन्नैवासदुच्यतइतिवचनात् । मूर्तसदिति-

संप्रोक्तममूर्तमसदुच्यते । मूर्तामूर्तेतरब्रह्म नसत्तन्नासदुच्यते। यदन्यद्वायोश्चांतरिक्षाच्चैतत्सद्वायु रंतरिक्षंचासत् ॥ १२ ॥

ज्ञानसाधनें पुष्कळ आहेत, तीं प्रथम सांगून नंतर पूर्वीं सांगितलेल्या साधनांनीं समजण्यास योग्य वस्तु कोणती तें स्पष्ट करून सांगतात:—ज्या वस्तूंच्या ज्ञानानें अधिकाऱ्यास मोक्षप्राप्ति होते, त्या वस्तूंचें सामर्थ्य असें आहे कीं, यापूर्वीं सांगितलेल्या साधनांनीं, जाणतां येतो असा क्षेत्रप्रेरक परमात्मा, कारणयुक्तदेह आणि इंद्रियें यांनीं रहित असल्यामुळें, त्यास अनादिमत् असें ह्मणतात; अथवा तो सर्व सद्गुणांनीं परिपूर्ण असल्यामुळें त्यास परब्रह्म असेंही ह्मणतात; पुरुषाला, ( आपल्या ) सामर्थ्यानें जाणण्यास योग्य असलेलीं जीं पृथ्वि, आप व तेज यांस मूर्त व सत् असें ह्मणतात; स्थूल दृष्टीनें पहाणारास दिसण्यास अशक्य अशीं जीं वायु व आकाश, यांला अमूर्त व असत् असें ह्मणतात; या दोहोंपासून तें ज्ञेय असें परमात्मस्वरूप—ब्रह्म—नित्य भिन्न असल्यामुळें, त्यास मूर्तामूर्तेतर असें ह्मणतात. परमात्मा श्री नारायण हा पृथिव्यादि मूर्त आणि वायु, आकाश अमूर्त, यांहून निरंतर भिन्न असून तो गुणपूर्ण असल्यामुळें त्यास परब्रह्म असें ह्मणतात. हें श्रुतिस्मृतिसिद्ध आहे. यावांचून दुर्मतीनें मानिलेलें अनिर्वचनीयत्व त्या परमात्म्यास लावूं नये; कारण, ( तो ) अनिर्वचनीय ( आहे ) असें सांगून, तोच परब्रह्म आहे असें ह्मणणें हें अगदीं परस्पर विरुद्ध आहे. पुढील श्लोकांत त्याच्या स्वरूपाचें वर्णन केलें आहे, त्यांत अनिर्वचनीय ह्मणजे काय तें सांगितलें असतां आपल्या बोलण्यास विरोध येणारच, यावरून दुर्मत ( वाईट मत ) सर्वदा उपेक्षा करण्यासच योग्य होय. ॥ १२ ॥

सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ॥
सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १३ ॥

केशादिष्वपि सर्वत्र पाणिपादादिशक्तिमत्वस्य कृष्णकेशे कृष्णे दृष्टत्वात्सर्वतःपाण्यादीत्युच्यते । अथवा पाण्यादियुक्तैरणुतरैरूपैः सर्वत्रस्थितत्वात्सर्वतः पाणिपादादिमत् । उक्तंच । सर्वत्रपाणिपादादिर्यतः पाण्यादिशक्तिमान् । केशादिष्वपि सर्वत्र कृष्णकेशोहि यादवः ।

अणोरणुतरैरूपै पाणिपादादिसंयुतैः । सर्वत्रसंस्थितत्वाद्वा सर्वतःपाणिपाद्वान् इति ॥ १३ ॥

तो क्षेत्रप्रेरक परमात्मा ह्मणजे ज्यास ब्रह्म असें ह्मणतात, तो सर्व जगाचे अंतर्यामि असून, त्यास सर्वत्र ( चोहोंकडेही ) हातपाय आहेत, सर्वत्र डोळे, डोकीं, तोंडें आहेत, सर्वत्र त्यास कान आहेत, याप्रमाणें असलेला तो परमात्मा सर्वांला व्यापून राहिला आहे असें समजावें. येथें सर्वतः करचरणादियुक्त तो ( परमात्मा ) आहे असें जें ह्मटलें आहे तें असें कीं, कृष्णकेशात्मक यदुकुलोत्पन्न श्रीकृष्णाचे ठिकाणींही हातपाय इत्यादि सर्व अवयव असल्यामुळें, अथवा सर्वांच्या अंतर्यामीं त्या त्या वस्तूच्या प्रेरकरूपानें असणाऱ्या परमात्म्याचीं अति सूक्ष्म रूपेंही हातपाय इत्यादि अवयवांनींयुक्त असतात; याकरितां तें ब्रह्म अनिर्वचनीय निराकार असें ह्मणणें हें जगन्मिथ्यात्वादि दुराग्रहानें जे व्यापिले आहेत अशांसच मात्र शोभेल. ॥ १३ ॥

## सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम् ॥
## असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १४ ॥

सर्वाणींद्रियाणि सर्वे गुणाः विषयाश्च भास्यंते ज्ञायंते ज्ञाप्यंते चानेनेति सर्वेंद्रियगुणाभासं प्राकृतानां भिन्नानां चेंद्रियाणामभावात्सर्वेंद्रियवर्जितं । न तु सर्वथाऽभावात्सर्वतः पाणिपादं तदित्यादेः । उक्तंच । अपाणिपादोजवनोगृहीता पश्यत्यचक्षुः सश्रुणोत्यकर्णः । सवेत्तिवेद्यं नच तस्य वेत्ता तमाहुरग्र्यं पुरुषं महांतं । न तस्य कार्यं करणं च विद्यते न तत्समश्चाभ्याधिकश्च दृश्यते । परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञानबलक्रियाचेति असक्तं निर्लेपं सर्वं भुक्तइति सर्वभुक् निर्गुणं सत्वादि गुणहीनं कल्याण गुणवर्णनप्रकरणात् अगुणोऽगुणदेहत्वादितिवचनात् । गुणभोक्तृ सर्वगुणभोक्तृत्वेपि सारभूतमानंदादिकमेव भुंक्ते । सर्वत्र सारभुक्देवो नासारं स कदाचनेतिवचनात् ॥ १४ ॥

तें परब्रह्म सर्व इंद्रियें आणि सर्व इंद्रियांचे विषय, सकल जनांस दाखविणारें, प्राकृत इंद्रियानीं रहित, पुण्यपापांचा गंध ज्यास नाहीं, स्वतंत्रपणानें,

सर्व जगाचें धारण करणारें, सत्वादिगुणरहित, सर्व आनंदादिसार सेवन करणारें इत्यादि अनेक गुणांनीयुक्त असें आहे ॥ १४ ॥

**बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च ॥**
**सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत् ॥ १५ ॥**

भूतानां नित्यसिद्धानां जीवानां बहिरंतश्च व्यवस्थितं । अन्यथा भावराहित्यादचरम् । सर्व देशेषु चरणाच्चरम् । सूक्ष्मत्वादिंद्रियाग्राह्यत्वादनुमानस्यानियतत्वाद्वेदैर्विज्ञातुमशक्यं सर्वगतत्वात्दूरस्थं अंतिकेऽवस्थितम् ॥ १५ ॥

तें ब्रह्म नित्य अशा प्राणिमात्रांचे आंत आणि बाहेर व्याप्त असून विकाररहित व सर्व देशांत व्याप्त असलेलें अतिसूक्ष्म आहे; ह्मणून, इंद्रियादिकांनीं जाणण्यास अशक्य आहे. सर्वत्र व्याप्त असल्यामुळें जरी तें दूर आहे तरी, समीपच आहे असें समजावें.

**अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ॥**
**भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥ १६ ॥**

विभक्तेष्वपि भूतेषु स्थितमविभक्तमेव विभक्तमिवाज्ञानां प्रतिभाति । भूतानां भर्तृ धारणादिकर्तृ तद्ब्रह्म ज्ञेयं परैर्ज्ञातव्यं ग्रसिष्णु प्रलये सर्वभक्षकं प्रभविष्णु सृष्टिकाले सर्वोत्पादकम् ॥ १६ ॥

तें परब्रह्म ज्ञानिजनांनीं जाणण्यास योग्य असें आहे. भिन्न भिन्न सर्व जीवांत अंतर्यामीरूपानें असून त्या जीवांचें धारणपोषण करणारें आहे व प्रलयकाळीं सर्व भूतांचा संहार करतें व सृष्टिकाळ प्राप्त झाला असतां त्या त्या जीवांच्या योग्यतेप्रमाणें त्या त्या जीवांस उत्पन्न करतें. तें ब्रह्म अनेक रूपांनीं, अनेक जीवांत असलें तरी त्या परब्रह्माच्या रूपांत परस्पर भेद नाहीं. त्याचीं रूपें सर्वही परस्पर अभिन्न आहेत. अज्ञानिजन मात्र जीवसमुदाय परस्पर भिन्न असल्यामुळें त्यांच्या अंतर्यामि परमात्म्याचीं रूपेंही भिन्न आहेत असें समजतात. परमात्म्याचीं रूपें स्वतः अभिन्न असून जीवांपासून मात्र अत्यंत भिन्न आहेत. असें ज्ञान मोक्षास कारण आहे असें समजावें. ॥ १६ ॥

**ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ॥**
**ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम् ॥ १७ ॥**

ज्योतिषां सूर्यादीनामपि ज्योतिः प्रकाशशक्तिप्रदम् । तमसः अव्यक्तान्मृत्योरज्ञानाद्वा परं ज्ञानं प्रकाशस्वरूपं ज्ञेयं स्वेन प्रकाश्यम् । उक्तंच । स्ववेत्तावेदनं च स्वं स्वेन वेदश्च केशवः । परस्य वेत्ता वित्तिश्च वेद्यश्च स्यात्परैः क्वचिदितिवचनात् । ज्ञानगम्यं ज्ञानेन मुक्तौ प्राप्यं सर्वस्य जगतोत्हृदि विशेषेण स्थितं अन्यत्र विरुद्धत्वेनप्रतीयमाना धर्माः भगवत्यविरोधेन वर्तंते । उक्तंच । अनंताव्ययशक्तित्वात्तदन्यत्र विरोधिनः । संति सर्वगुणास्तत्र न च तत्र विरोधिनइति ॥ १७ ॥

तें परब्रह्म प्रकाशयुक्त अशा सूर्यादिकांस प्रकाशशक्ति देणारें, तमोनामक अव्यक्त तत्वाहून श्रेष्ठ, अथवा मृत्यु नामक अज्ञानापासून दूर, त्याच्या अनुग्रहानेंच जाणण्यास योग्य, ज्याचें अपरोक्षज्ञान ( होणें ) हें मोक्षप्राप्तीस मुख्य साधन आहे, सर्व जगदंतर्यामीं नियामक रूपानें असणारें, याप्रमाणें परब्रह्मस्वरूपी जो परमात्मा त्याचे ठिकाणीं, श्रुतिस्मृतींनीं अनेक विलक्षण गुण प्रतिपादन केले आहेत, त्यांत साधारण ( बुद्धीचे ) जनांस आपाततः विरोध दिसला तरी, अघटित घडविण्याची शक्ति असलेल्या परमात्म्यास, अशक्य असें कांहींच नसल्यामुळें, तसा विरोध मानूं नये. ॥ १७॥

**इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ॥**
**मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥ १८ ॥**

उक्तमुपसंहृत्य तज्ज्ञानं स्तौति । इतीति । मद्भावाय मयिभावाय ॥ १८ ॥

महाभूतांपासून आरंभ करून धृतिपर्यंत विकारांसहित क्षेत्र सांगितलें, ' अमानित्वा ' येथपासून आरंभ करून " तत्वज्ञानार्थे दर्शनं " येथपर्यंत
ं ब्रह्म ' येथपासून आरंभ करून ' हृदिसर्वत्र-
ाधनानें समजण्यास योग्य, क्षेत्रप्रेरक परमात्म्याचें
जो माझा भक्त, हें क्षेत्र किंवा क्षेत्रादिकांचें

स्वरूप, योग्य रीतीनें जाणतो, तो माझ्या देहांत भिन्नत्वानें राहून, सुखोपभोगास योग्य अशी सायुज्यमुक्ति प्राप्त करून घेतो. ॥ १८ ॥

**प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ॥**
**विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसम्भवान् ॥ १९ ॥**

यतश्चयदिति प्रतिज्ञातं वक्तुं प्रकृतिविकारपुरुषान् संक्षिप्याह । प्रकृतिमित्यादिना । प्रकृतिशब्देन चेतनाचेतनप्रकृत्योः पुरुषशब्देन जीवपरयोर्ग्रहणायोभावपीत्युक्तम् द्वे प्रकृती द्वौ पुरुषौ चानादी विद्धि विकारांश्च गुणांश्च प्रकृतिसंभवान् प्रकृत्युपादानकान् विद्धि । सत्वादि-गुणानां विकारत्वेप्यन्येषामधिकविकारत्वाविवक्षया पृथगुक्तिः ॥१९॥

प्रतिज्ञात वस्तु सांगण्याकरितां प्रकृतिविकार व पुरुष, यांचें संक्षेपानें वर्णन करितात:—प्रकृति ह्मणजे जडप्रकृति आणि चित्प्रकृति, महालक्ष्मी व पुरुष ह्मणजे अल्पज्ञत्वादिगुणांनींयुक्त असा जीव व सर्वज्ञत्वादिगुणयुक्त असा परमात्मा; याप्रमाणें दोन प्रकृति व दोन पुरुष, हे अनादि, नित्य आणि निरतिशय भेदयुक्त आहेत असें समजावें; इच्छादि गुण किंवा विकार हे, जड-प्रकृतिरूप उपादान कारणापासून उत्पन्न झालेले व सत्वादि गुणही विकारानेंच उत्पन्न झालेले आहेत; तथापि ( ते ) स्पष्टपणें समजावे ह्मणून या ठिकाणीं ते प्रत्येक घेतले आहेत. ॥ १९ ॥

**कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ॥**
**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ २० ॥**

कार्यं शरीरं शरीरंकार्यमुच्यतइत्यभिधानात् कारणानींद्रियाणि कर्तृत्वं क्रियाविकारः हेतुः कारणं भोक्तृत्वं भोगोनुभवात्मकः यद्यपि सर्वे विकाराः प्रकृतिसंभवाः तस्याएव परिणामित्वात् तथापि भोक्ता-रश्चेतनाएव अचेतनस्य भोक्तृत्वासंभवादित्यर्थः अथवा भगवतः सर्व-कर्तृत्वेपि चित्प्रकृतिर्भोक्तृत्वप्रदाने स्वप्रवृत्तिमपेक्ष्य कार्यकारणकर्तृ-त्वेऽधिकप्रवृत्तिमती पुरुषोविष्णुः सर्वकर्तापि जीवंप्रति भोक्तृत्वदाने देव्याअल्पप्रवृत्तित्वात्स्वयमेव सुखादिभोक्तृत्वे हेतुरिति विभागेनोभयोः

कर्तृत्वव्यपदेशोयुज्यते अतएवोच्यतइत्यर्थद्वयेप्युक्तम्। उक्तंच । स्वदेहें-द्रियहेतुत्वं यज्जीवस्य स्वकर्मभिः । आवृत्य विष्णुतत्वं तद्धेतुश्चित्प्रकृतिर्मता । जीवस्य सुखदुःखानां भोगशक्तिप्रदः सदा । परमः पुरुषो-विष्णुः सर्वकर्तापि सन् सदा । विशेषकर्ता केषांचिदुक्तोयद्वद्विकुंठय । उच्यते सर्वपालोपि विशेषेण स्वकर्मणेति ॥ २० ॥

शरीर आणि इंद्रियांचे विषय यांच्या ठिकाणीं जडप्रकृति कारण मानिली आहे व सुखदुःखादि भोगण्यास जीव कारण ( मानिला ) आहे. सर्व विकार जरी जडप्रकृतिपासून उत्पन्न होतात तरी, त्यांचे भोक्ते जीवच होत; कारण जडास भोक्तृत्वशक्ति नाहीं. अथवा, भगवान् श्रीकृष्ण नारायण हा सर्व कर्ता असला तरी, चित्प्रकृति ही, भोक्तृत्व देण्याविषयीं परमात्म्याचे मनाप्रमाणें अनुकूल होऊन, कार्यकारण व कर्तृत्व यांविषयीं प्रवृत्त होते. पुरुषशब्दवाच्य विष्णु हा सर्व कर्ता असला तरी, आपल्या आज्ञेप्रमाणें जीवांस सुखदुःख देणाऱ्या लक्ष्मीस आपणच प्रेरणा करून, ( जीवांस ) लक्ष्मीच्याद्वारें सुख-दुःखादि देतो; याकरितां तो परमात्मा सर्व कार्यकर्ता असला तरी, येथें सुखदुःख देणारा असा अर्थ घेतला आहे ॥ २० ॥

**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान्गुणान् ॥**
**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥ २१ ॥**

यज्जीवानां कार्यकारणसंबंधे सुखदुःखादिभोगे च लक्ष्मी-नारायणौ कारणमित्युक्तं तदसत् देहादिसंबंधस्य सुखदुःखादि-भोगस्य च मिथ्यात्वादित्यतआह । पुरुषइति । पुरुषोजीवः प्रकृति-कार्ये देहादौ स्थितः प्रकृतिजान् गुणान् दुःखादीन् भुंक्तेहीत्यनुभव-सिद्धत्वाद्बाधकाभावाच्च असत्यत्वं न युज्यतइति भावः । पुरुषशब्दे-नोभयोः प्रकृतत्वेपि योग्यतया जीवएव परामृश्यते । उक्तंच । बहूनां सह निर्देश एकयाभिधयैव तु । तथैवाभिध या तेषां परामृश्यैक-मुच्यतइति । ननु स्वतःशुद्धस्य जीवस्य प्रकृतिस्थत्वे किं कारण मित्यतआह । कारणमिति । अस्य जीवस्य सदसद्योनिजन्मसु सत्वादिगुणसंगः कारणम् ॥ २१ ॥

जीवांस कार्यकारणसंबंधाविषयीं व सुखदुःखादि भोग देण्याविषयींही श्रीलक्ष्मीनारायणच मुख्य कारण आहे असें सांगितलें; पण तसें संभवत नाहीं; कारण देहादिसंबंध किंवा सुखदुःखादि भोग हा जीवांस मिथ्याच आहे, अशी शंका येते तिचा परिहार करितातः—जडप्रकृति कार्य देहांत रहात असलेला जीव, प्रकृतिसंबंधानें सुखदुःखादि अनुभवितो; त्या अनुभवास उत्तरकालीं बाधकज्ञान होत नसल्यामुळें तो असत्य ह्मणतां येत नाहीं. या जीवास, सुखदुःखादि अथवा सद्योनिभूत अशीं देवशरीरें प्राप्त होण्यास व असद्योनिभूत नरतिर्यगादि शरीरें प्राप्त होण्यास सत्वादिगुणांचा संगच कारण होय. "पुरुष" या शब्दानें परमात्मा व जीव हे दोन्हीही घेतां येतात, परंतु या ठिकाणीं शरीरसंबंधीं दुःखभोग सांगितल्यामुळें, पुरुष शब्दानें "जीव" असाच अर्थ घेतला पाहिजे. कारण परमात्मा हा, नित्य, शुद्धानंदसुखमूर्ति, स्वतंत्र, दुःखादिक सर्व दोष ज्याला नाहींत असा असल्यामुळें, "पुरुष" शब्दानें परमात्मा असा अर्थ घेतला असतां, त्यास सुखदुःखादि दोष येतील, त्यामुळें पुष्कळ सच्छास्त्रांचा विरोध येईल याकरितां, पुरुष ह्मणजे जीव असाच अर्थ घेणें योग्य आहे. ॥ २१ ॥

**उपद्रष्टानुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः ॥**
**परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ॥ २२ ॥**

ननु जीवस्य शरीरसंबंधे सत्वादिगुणसंगोनिमित्तमात्रं जडत्वेनास्वतंत्रत्वात् स्वतंत्रकारणंतु किमित्यपेक्षायामाह । उपद्रष्टेत्यादि । अनुमंतृत्वे हेतुः सर्वेभ्यः उपरिस्थितोद्रष्टा उपद्रष्टा भर्ता सर्वकारकः भोक्ता सकलकर्मफलसारभुक् महेश्वरोऽचिंत्यशक्तिः परमात्मा सर्वचेतनेभ्यउत्तमः इतिहेतोरनुमंता सपरः पुरुषः अस्मिन्सर्वस्मिन्देहे स्थित्वा नियमयतीति क्षेत्रज्ञंचापिमां विद्धीत्युक्तः तेनाहमेवानुमंतेति दर्शयति । उक्तंच । सर्वेभ्यउपरिद्रष्टा यउपद्रष्टृनामकः । स्वातंत्र्यात्स्वानुकूल्येन मर्त्यं प्रेरयति स्म यत् । अनुमंतेति कथितः स्वयं प्रभुरजोहरिः । महाशक्तियुतोविष्णुर्महेश्वरइतीरितः । परमत्वात्तु तस्यैव ह्यनुमंतृत्वमुच्यते सएव सर्व देहेषु देहिनोन्योन्यवस्थितइति । एतेन यतश्चयदिति प्रतिज्ञातं चोपपादितं भवति ॥ २२ ॥

जीवास शरीरसंबंध आणि सुखदुःखादि प्राप्त होण्यास सत्वादि गुणांचा संग हें निमित्तमात्र आहे. कारण, तो ( सत्वादि गुणसंबंध ) जड असल्यामुळें अस्वतंत्र आहे. ह्मणून जीवास सुखदुःख देणारा स्वतंत्र कोण तें सांगतात–सर्वांहून श्रेष्ठ असून पहाणारा, सर्वांचें धारण करणारा, सर्वसारभोक्ता, अचिंत्य ऐश्वर्यानें युक्त, सर्व जीवजडादिकांपेक्षां श्रेष्ठ; जीवांपासून भिन्न असून, षड्गुणैश्वर्यसंपन्न असा परमात्मा या देहांत एकंदर जीवांपेक्षां अधिक द्रष्टृत्वादि विशेषणांनींयुक्त असल्यामुळें संशयरहित बुद्धियुक्त तो परमात्मा स्वतंत्र आहे; तोच सर्व जीवांना सत्वादिगुणनिमित्त करून त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें सुखदुःख देतो, हें तात्पर्य होय. ॥ २२ ॥

**य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ॥**
**सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥ २३ ॥**

**प्रकृतिं पुरुषंचैवेत्याद्युक्तार्थेबुभुत्सातिशयोत्पादनाय तज्ज्ञानफलमाह । य एवमिति । एवं द्विविधं पुरुषं द्विविधां च प्रकृतिं तद्गुणैः सह सम्यक् ज्ञात्वा पश्यति सप्रमादादन्यायेन वर्तमानोपि नियतमोक्ष इत्यर्थः ॥ २३ ॥**

" प्रकृतिं पुरुषंचैव " या श्लोकाचा अर्थ योग्य रीतीनें समजावा अशी इच्छा अधिकाऱ्यास उत्पन्न व्हावी ह्मणून, त्यापासून ( प्राप्त ) होणाऱ्या ज्ञानाचें फळ सांगतात:–जो मनुष्य स्वतंत्र अशा परमात्म्याला किंवा अस्वतंत्र अशा जीवरूप पुरुषाला, त्याचप्रमाणें चित्प्रकृति महालक्ष्मी, किंवा जडप्रकृतिरूप प्रकृतीला, त्यांस त्यांच्या पूर्वोक्त गुणांप्रमाणें जाणतो, तो प्रमादामुळें विधिनिषेधाकडे लक्ष न देतां अन्यायमार्गानें वागला तरी, निश्चयानें, भगवंताचें अपरोक्षज्ञान संपादन करून वैकुंठास जातो. ॥ २३ ॥

**ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना ॥**
**अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥ २४ ॥**

**परमपुरुषादिदर्शने किं साधनमित्यतआह । ध्यानेनेति । केचिदात्मना बुद्ध्यात्मनि हृदये आत्मानं परमात्मानं ध्यानेन पश्यंति**

अन्ये सांख्येन योगेन वेदोक्तभगवत्स्वरूपज्ञानेन ज्ञात्वा पश्यंति अपरे कर्मयोगेन श्रुत्वा ज्ञात्वा पश्यंति तेपि च श्रवणनिरताः मृत्युमतितरंत्येव अन्यइत्याद्यशक्तानमप्युपायदर्शनार्थमवस्थाभेदमाश्रित्योक्तम् । उक्तंच । कर्मकृच्चापि तं श्रुत्वा ज्ञात्वा ध्यात्वा नुपश्यति । श्रावकोपि तथा ज्ञात्वा ध्यात्वा ज्ञान्यपि पश्यतीति । यद्वा केचिदृषयोध्यानेनात्मनि पश्यंति केचिन्नारदादयोबहिरपि पश्यंति अन्ये देवाः सांख्येन योगेन स्वप्रतिभानुसारेण तारतम्येन पश्यंति अपरे राजानः कर्मयोगेन यजंतोयज्ञभागार्थमागतं श्रवणप्रतिभाभ्यां विष्णुं स्मरंतः पश्यंति । उक्तंच । ऋषयः केचिदृषयोन्नारदाद्याबहिस्त्वपि । देवा विष्णुप्रसादेन लब्धसत्प्रतिभाबलात् । सर्वं क्रमेण विज्ञाय प्रतिभास्पष्टताक्रमात् । पश्यंति बहिरंतश्च विष्णुंध्यानमृतेपि तु । येषां ध्यानमृतेदृष्टिस्तेषांध्यानेपि दर्शनम् । स्यादेव सांख्ययोगास्तेदेवा ब्रह्माधिकोत्र च । केचित्तुक्षत्रियवरा अश्वमेधादिकर्मभिः । यजंतोभक्तिमंतश्च यज्ञभागार्थमागतम् । श्रवणप्रतिभाभ्यां च स्मरंतः पुरुषोत्तमम् । पश्यंत्यन्ये तथान्येभ्यः सर्वं श्रुत्वानुमन्य च । उपास्यैवतु पश्यंति नान्यथातु कथंचन २४

यापुढें परमपुरुषाचें दर्शन होण्यास साधन कोणतें तें सांगतातः— कित्येक लोक आपल्या हृदयांत मनानें परमात्म्याचें ध्यान करून, त्याला पहातात. कित्येक वेदांत सांगितलेल्या ज्ञानानें ध्यान करून त्याला पहातात; कित्येक कर्मयोगानें किंवा श्रवणानें किंवा ध्यान करून त्याला पहातात. तेही श्रवणांतच निरत होऊन, संसाररूप मृत्यूपासून मुक्त होतात. कित्येक ऋषि, ध्यान करून, जीव बिंबरूपानें परमात्म्यास जाणतात; कित्येक नारदादिक प्रतिमादि बहिस्थळांत प्रतिमेच्या अंतर्यामी आहे असें समजतात. कित्येक देव, सांख्ययोगानें आपापल्या ज्ञानाप्रमाणें—तारतम्यानें त्या परमात्म्यास पहातात; कित्येक राजे, कर्मयोगाचें ( यज्ञयागादिक ) आचरण करून, यज्ञभागाचा स्वीकार करून भक्तजनांस धन्य करण्यास प्रकट झालेल्या भगवद्रूपाचें माहात्म्य ऐकून त्या परमात्म्याला पहातात. ज्यानां ध्यानावांचून ज्ञान प्राप्त होतें, त्यांनीं ध्यान केलें असतां भगवंताचें अपरोक्ष दर्शन होतें. कृष्णार्पणबुद्धीनें केलेल्या अश्वमेधादि यज्ञानें, ज्ञान प्राप्त होऊन त्यानें कित्येक क्षत्रीयही

मुक्त होतात. तात्पर्य कोणत्याही रीतीनें भगवंताची उपासना केली असतां मुक्ति प्राप्त झाल्याशिवाय रहात नाहीं. ॥ २४ ॥

**अन्ये त्वेवमजानन्तः श्रुत्वान्येभ्य उपासते ॥**
**तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥ २५ ॥**

अन्ये मनुष्याः अल्पमतिभानत्वादन्येभ्यः श्रुत्वोपासतइत्यादि व्याख्येयं अन्येषां किंचिच्छ्रवणे विद्यमानेऽपि मनुष्याणामेवाल्पप्रतिभानत्वाच्छ्रुत्वान्येभ्यइति विशेषणं मनुष्याणां प्रतिभामूलप्रमाणापेक्षा प्रायोनसम्यगुत्पद्यतइत्यतउक्तम् । तेच श्रुतिपरायणाइति । तदुक्तम् । ऋषीन् राज्ञस्तथारभ्य प्रतिभाभ्यधिका क्रमात् । यावद्ब्रह्मा ब्रह्मणस्तु प्रायोनाप्रतिभासितम् । विष्णोः प्रीत्यर्थमेवास्य श्रोतव्यं प्रायशोभवेत् । अन्येषां श्रवणाज्ज्ञानं क्रमशोमानुषोत्तरं । अत्यल्पप्रतिभानत्वान्मानुषाः श्रुतवेदिनः । सर्वे ते दर्शनात्तस्मात्स्वयोग्यान्मुक्तिगामिनः । अश्रुता प्रतिभा यस्य श्रुतिस्मृत्याविरोधिनी । विश्रुतानृषु जातं च तं विद्याद्देवसत्तममिति ॥ २५ ॥

याप्रमाणें केवळ श्रवणेंकरून परमात्म्याचें स्वरूप न जाणणारे, श्रवणादिक न करणारे, सत्कर्म करणारे, असे जे पुरुष सद्गुरूंच्या मुखानें भगवंताचें चरित्रामृत श्रवण करितात, ते श्रवणपरायण होऊन नंतर मनन आणि ध्यान करून परमात्म्याला प्रत्यक्ष पाहून, मरणादि दुःखापासून मुक्त होतात. कित्येक ऋषिजन ध्यानानें किंवा बुद्धीनें आपल्या हृदयांत जीवांतर्यामीं असणाऱ्या परमात्म्यास पहातात. सद्गुरूंच्या मुखानें भगवद्गुण श्रवण करून, उपासना करणें हें मनुष्यांसच आहे. कारण, मनुष्य हा अल्पज्ञानी आहे. याप्रमाणें चतुर्मुख ब्रह्मदेवापर्यंत सर्व जीवगण आपापल्या योग्यतेप्रमाणें, श्रवणादि साधनानीं परमात्म्यास पहातात. ब्रह्मदेव हा सर्व जीवगणांत श्रेष्ठ, मोठा विष्णुभक्त ( वैष्णव ) आहे. ह्मणून बहुधा त्यास अज्ञान नाहींच; तथापि, तोही भगवत्प्रीत्यर्थ श्रवणादिक करितोच. त्याशिवाय जे रुद्रादिक त्यांस श्रवणमननादिक केल्यानें अधिक ज्ञान प्राप्त होतें, असें समजावें.॥२५॥

**यावत्सञ्जायते किंचित्सत्त्वं स्थावरजङ्गमम् ॥**
**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥ २६ ॥**

**पुनश्च साम्यादिधर्मयुक्तं प्रकृत्यादिरूपमाह । यावदित्यादिना । यावत्स्थावरजंगमात्मकं सत्वं जीवजातं संजायते तत् क्षेत्रक्षेत्रज्ञयोश्चित्प्रकृतिपरमात्मनोः संयोगात् जायते प्रादुर्भवतीति विद्धि । सत्वं जीवः कचित्प्रोक्तः कचित्सत्वं जनार्दनः । सत्वं नाम गुणः कापि कचित्साधुत्वमुच्यत इत्यभिधानात जीववाची सत्वशब्दः ॥ २६ ॥**

पुनः साम्यादिधर्मयुक्त प्रकृत्यादिकांचें स्वरूप सांगतातः—हे भरतकुलश्रेष्ठा अर्जुना, स्थावरजंगमात्मक जो जीवसमुदाय उत्पन्न होतो, तो चित्प्रकृति महालक्ष्मी व परमात्मा श्रीहरी या उभयतांच्या संबंधानें उत्पन्न होतो, असें समज. "सत्व" शब्दाचे अर्थ अनेक आहेत, सत्व ह्मणजे जीव, जनार्दन, आणि सत्व नामक (तीन गुणांतला) एक गुण; सत्व ह्मणजे साधुत्व; येथें (या श्लोकांत) सत्व याचा अर्थ जीव असाच घेतला पाहिजे, नाहीं तर पूर्वापर विरोध येतो; आणि देहप्राप्ति ही (जीवाशिवाय) दुसऱ्यास संभवत नाहीं. ॥ २६ ॥

## समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम् ॥
## विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति ॥ २७ ॥

**परमेश्वरस्य सर्वशरीरस्थत्वमुक्तं तर्ह्यधिष्ठानतारतम्यात्तस्य तारतम्यं दुःखिसहावस्थानात् दुःखं च स्यादित्यत आह । सममिति । सर्वेषु विलक्षणेषु दुःखसंयोगादिरूपेण विनश्यत्सु भूतेषु जीवेषु स्थितं समं तारतम्यरहितं अविनश्यंतं दुःखसंयोगादिरहितं परमेश्वरं यः पश्यति । सएव पश्यति ज्ञानीत्यर्थः ॥ २७ ॥**

कारण परमात्मा सर्व प्राण्याचे अंतर्यामी रहातो असें ह्मटलें तर, जीव हे परस्परभिन्न व तारतम्यानें श्रेष्ठ कनिष्ठ असे असल्यामुळें, त्यांच्या अंतर्यामी रहाणाऱ्या भगवत्स्वरूपालाही भेद व तारतम्य हीं असलीं पाहिजेत; व दुःख भोगणाऱ्या जीवगणांसह देहांत असलेल्या त्या परमात्म्याचे रूपासही दुःख आहे कीं काय ? अशी शंका येईल तिचा परिहार करितातः—सर्व जीवांत प्रेरकत्वानें असलेलीं परमात्म्याचीं रूपें आनंदादि गुणांनीं सम आहेत, आणि दुःखयुक्त व देह नाशवंत अशा जीवांत प्रेरकत्वानें तो परमात्मा असला तरी, त्यास देहनाश आणि दुःखप्राप्ति हीं नाहींत, असें जो मनुष्य जाणतो,

त्यासच परमात्मस्वरूप आणि जीवस्वरूप जाणणारा ज्ञानी, असें ह्मणावें. यावर अशी शंका येते कीं, जीव आणि परमात्मा हे एकाच अधिष्ठानांत ( ठिकाणांत ) असतात ह्मणून ज्याप्रमाणें जीवास देहनाश आणि दुःखप्राप्ति होते, त्याप्रमाणें परमात्म्यासही होणें योग्य आहे. ज्याप्रमाणें एकाच घरांत दोन मनुष्यें असतां, तें घर आग लागून जळून गेलें तर त्या दोघांपैकीं एक जळून गेला व एक जिवंत राहिला हें असंभवनीय होय, त्याचप्रमाणें, परमात्मा आणि जीव हे एकाच देहांत असून, परमात्म्याला नाश नाहीं व तो नित्य सुखी असतो; आणि जीवाला देहाचा नाश व दुःख होतें, हें ह्मणणें कसें संभवतें? या शंकेचें समाधान असें आहे कीं, एकाच घरांत दोन मनुष्यें असतां तें घर जळालें, तरी ज्याला अग्निस्तंभनशक्ति आहे तो जळणार नाहीं; व ज्याला ती शक्ति नाहीं तो मात्र जळेल. त्याप्रमाणें या ठिकाणीं परमात्मा हा सर्वज्ञ, सर्वशक्ति, स्वतंत्रतादि अखिल गुणांनींयुक्त आहे ह्मणून, त्याला दुःख देणारी किंवा त्याचा नाश करणारी अशी कोणती वस्तु आहे? जीव हा अल्पज्ञ, अल्पशक्ति, अस्वतंत्र असा आहे ह्मणून, आपल्या योग्यतेप्रमाणें परमात्मा जशी प्रेरणा करील तसें, सुखदुःखादिक तें भोगतो आणि लौकिकांतही आपल्या अपराधाचें नियमित दुःख भोगण्यास कारागृहांत पडणारे अनेक जीव असून त्यांचें नियमन करणारा, ( नियंता ) आपल्या अंगच्या विद्यादि कौशल्यानें ज्याला अधिकार ( राजाकडून ) प्राप्त झाला आहे, असा एक पुरुष त्याच कारागृहांत असतो; ते दोघेही ( कैदी आणि नियंता अधिकारी ) एकाच ठिकाणीं ( कारागृहांत ) रहातात ह्मणून तो अधिकारी पुरुषही, त्या बंदीवानाप्रमाणेंच दुःखी आहे असें समजतात काय? नाहीं, अशा अनेक उदाहरणांनीं, परमात्मा हा दुःखादि कलंकरहित आणि जीव हे दुःखी, बद्ध, अवर इत्यादि सर्व दोषांनीं युक्त असल्याचें उघड प्रत्यक्षानुमानागमांत दिसत असल्यामुळें, त्या परमात्म्याला व जीवाला समानत्व आहे असें सांगून कोणता अज्ञानी त्या ईश्वरास कलंक लावूं शकेल? ॥ २७ ॥

**समं पश्यन्हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ॥**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् । २८ ।**

तत् ज्ञानफलमाह । सममिति । सर्वजीवेष्ववस्थितं सर्वगुणैः

समं अचिंत्यशक्तिं भगवंतं पश्यन्नात्मना बुद्ध्या स्वात्मानं न हिनस्ति नरके न पातयति ततोज्ञानात्परां गतिं मुक्तिं याति। उक्तंच। दुःखयोगादिरूपेण जीवेषु विनशत्स्वपि । दुःखयोगादिरहितः सर्वजीवेष्ववस्थितः। गुणैः सर्वैः समोनित्यं न हीनो हीनगोपिसन्। इतिपश्यति योविष्णुं सएव न तमोव्रजेदिति। जीवानां नाशलक्षणं तु द्वितीयाध्यायउक्तं ॥ २८ ॥

याप्रमाणें परमात्म्याचें स्वरूप जाणलें असतां काय फळ मिळतें तें सांगतात:-सर्व प्राणिमात्रांचे ठिकाणीं नियामकरूपानें असणारीं परत्म्याचीं स्वरूपें, ज्यांना अचिंत्यशक्तीनें दोषादिक नाहींत अशीं, सद्गुणांनीं पूर्ण, ज्यांच्या रूपांत थोडाही भेद नाहीं अशीं समजतो, तो पुरुष आपल्या बुद्धीनेंच आपल्यास नरकांत पाडून घेत नाहीं; ( आपला नाश करीत नाहीं. ) आणि परमात्म्यास सर्वोत्तमत्व व त्याचे जे रामकृष्णादि अवतार किंवा जीवप्रेरक, परमात्म्याचीं सर्व रूपें अचिंत्यशक्तीनेंयुक्त व परमात्म्यासारखीं आहेत असें समजतो तो, श्रेष्ठगति असा जो वैकुंठ त्या वैकुंठांत जाऊन नित्य सुखी असा परमात्म्याचा सेवक होतो. ॥ २८ ॥

**प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ॥**
**यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥ २९ ॥**

उपद्रष्टेत्यनेन परमात्मनः स्वातंत्र्यमुक्तं तज्ज्ञानफलमाह। प्रकृत्येति। च शब्दानुकृष्टेन प्रकृतेन परमात्मना कर्ताप्रकृत्या च निमित्तभूतया क्रियमाणानि सर्वाणि कर्माणि स्वात्मानमकर्तारं यः पश्यति सः परमेश्वरं पश्यतीत्यर्थः । अथवेश्वरः कर्मानपेक्षएव सदसद्योनिजन्मसु कारणं चेत्तर्हि तस्य वैषम्यादिकं स्यात् कर्मापेक्षत्वे च स्वातंत्र्यं न स्यात् तथा तस्यापि कर्तृमद्भावाच्चास्वातंत्र्यमित्यत आह। प्रकृत्येति। प्रकृत्या प्रारभ्य स्वयमेव कर्मादिकं प्रबोध्य प्रकृतेनेश्वरेण क्रियमाणानि कर्माणि तथात्मानं परमेश्वरमकर्तारं कर्तृरहितं यः पश्यति सपश्यति कर्तृराहित्यात्स्वातंत्र्यं पूर्वकर्मापेक्षया कर्तृत्वेनावैषम्यादिकं वेदा प्रामाण्यानापादकत्वाच्च सदप्येतादृशं वैषम्यादिकमदोषः। उक्तंच। न विष्णोर्विषमत्वं तु योग्यतापेक्षया

क्वचित् । योग्यतायास्तन्नियत्याविषमत्वंभवेत्तवेति । वैषम्यंचैव नैर्घृण्यं वेदाप्रामाण्यकारणम् । नांगीकार्यमतोऽन्यत्तु न वैषम्यादिनामकमिति २९

" उपद्रष्टाऽनुमंताच " या श्लोकानें पूर्वी सांगितलेलें परमात्म्याच्या स्वातंत्र्याचें ज्ञान झालें असतां काय फळ मिळतें तें सांगतातः-परमात्माच प्रकृतिद्वारां आपल्या प्राक्तनकर्माप्रमाणें सगळीं कर्में करवितो, असें जो मनुष्य समजतो तोच सदसद्विचार पहाणारा ज्ञानी समजावा; अथवा प्रकृतिद्वारां सर्व जीवांस परमात्माच सुखदुःखादि देतो त्या परमात्म्यास सुखदुःख देणारा किंवा त्याला उत्पन्न करणारा अथवा त्याचा नाश करणारा कोणीही नाहीं, असें जो जाणतो, तोच ज्ञानी होय; अथवा सर्व जीवांना ज्यांचें त्यांचें कर्म पाहून ईश्वर त्यांनां सुखदुःखादि देत नसून स्वेच्छेनें ( आपल्या मर्जीप्रमाणें ) वाटेल ती—भलतीच—शिक्षा देतो, असें ह्मटलें तर, कित्येकांस सुखी आणि कित्येकांस दुःखी केल्यानें तो परमात्मा विषम स्वभावाचा व निर्दय असा ठरतो; आणि तो जीवांचें बरेंवाईट कर्म पाहून त्याप्रमाणें त्यांनां फळ देतो, असें ह्मटलें, तर तो स्वतंत्र कसा ? या प्रकारचे हे वेदप्रतिपादित भगवद्गुणाच्या विरुद्ध आक्षेप मनांत आणीत नसून, आपल्या अनादि कर्माप्रमाणें ईश्वर फळ देतो, असा वेदांचा निश्चयपूर्वक अर्थ समजून, त्या परमात्म्याला वैषम्य व निर्दयपणा इत्यादि वेदास अप्रामाण्यकारक दोष, जो लावित नाहीं, तोच सदसद्विवेक पहाणारा ज्ञानी होय, असें समजावें. ॥ २९ ॥

**यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ॥**
**तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥ ३० ॥**

न केवलं भगवतः सर्वप्रेरकत्वादिज्ञानमात्रेणालं किंतु तस्य सर्वाधारत्वाद्यपि ज्ञातव्यमित्याह । यदेति । यदा भूतानां पृथग्भावं पृथग्भूतानीति यावत् एकस्थं एकस्मिन्नेव विष्णौ स्थितं ततएव विष्णोर्विश्वस्य विस्तारमुत्पत्तिं पश्यति तदा ब्रह्म संपद्यते प्राप्नोति । उक्तंच । एकविष्ण्वाश्रयाणांच जीवानां भेदमेव यः । ततः परस्परं चैव तारतम्येन पश्यति । विष्णोरेव च विस्तारं जगतः सविमुच्यतइति ३०

परंतु परमात्मा सर्व प्रेरक व दुःखरहित इतकेंच केवळ जाणून भागत नाहीं, तर, तो ईश्वर सर्वांचें धारण करणारा इत्यादि अनेक गुणांनीयुक्त आहे

असेंही समजलें पाहिजे. ह्मणून सांगतातः—जरी आपापल्या योग्यतेप्रमाणें भिन्न भिन्न असे तारतम्यानें श्रेष्ठ कनिष्ठ असलेले अनेक जीवांचे समुदाय हे, विश्वव्यापी जो एक विष्णूच, त्याच्या आश्रयानें आहेत व त्या सर्वांला आधार असणाऱ्या विष्णूच्याच सत्तेनें या जगाचा अनेक प्रकारांनीं विस्तार उत्पन्न होतो, असें जाणतो, तो अनंतगुणपरिपूर्ण असा जो विष्णू, त्याच्या लोकाची ह्मणजे वैकुंठाची प्राप्ति करून घेतो. ॥ ३० ॥

अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः ॥
शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते ॥ ३१ ॥

नच शरीरसंबंधेन विष्णोर्व्ययादिरित्याह । अनादित्वादिति । यद्यपि भावरूपं तत्सादिगुणात्मकं च अतादृशत्वादव्ययः परमात्मा लौकिकक्रियादिराहित्यान्नकरोति न लिप्यते यद्वा परमात्मनः सर्वचिदात्मकत्वात्कथं भूतानां ततः पृथग्भावइत्यतआह । अनादित्वादिति । शरीरगत दुःखादिभोगलक्षणादभिमानाच्छरीरस्थोजीवः शरीरतोऽप्युत्पत्तिराहित्यात्सर्वात्मना त्रिगुणसंबंधाभावाच्छरीरतोऽपि व्ययाभावाच्चायं परमात्मा शरीरस्थोजीवो न भवति किमुत जडं न भवतीत्यपि शब्दार्थः किंच परमात्मा सर्वं करोति न लिप्यते जीवस्तु न करोति लिप्यतएवेत्यर्थः । उक्तंच । शरीरस्थस्तु संसारी शरीराभिमतेर्मतः । विष्णुःशरीरगोऽप्येष न शरीरस्थउच्यते । शरीराभिमतिर्यस्मान्नैवास्यास्ति कदाचन । तद्भावानां तु दुःखानां भोगोऽभिमतिरुच्यते । तदभावान्नाभिमानी भगवान्पुरुषोत्तमः कुर्वाणोपि यतः सर्वं पुण्यपापैर्न लिप्यते । जन्ममृत्यादिरहितः सत्वादिगुणवर्जितः । विष्णुस्तद्विपरीतस्तु जीवोऽन्तस्थोऽपृथक्सदेति ॥ ३१ ॥

आतां परमात्म्याच्या शरीरादिकास नाश नाहीं, असें सांगतातः—हे **अर्जुना**, परमात्म्याला उत्पत्ति नाहीं आणि त्याला सत्वादिगुणांचा संबंध नाहीं, असा असल्यामुळें तो या जीवशरीरांत असला तरी, त्याला नाश नाहीं. तो लौकिकक्रियादिकांनीं रहित असल्यामुळें, पुण्य आणि पाप यांचा संबंधही त्यास नाहीं. यावरून, त्यास शरीराभिमानी, सुखदुःख भोगणारा जीव, असें ह्मणतां येत नाहीं. तो नित्य, ज्ञानी असल्यामुळें, ज्ञानादिक क्रिया ज्यास

नाहींत असा जडही नाहीं. त्यानें सृष्टी वगैरे कर्में केलीं तरी, त्या ( कर्मा ) च्या फळाची त्याला इच्छा नसल्यामुळें, त्या कर्मांनीं तो लिप्त ( बद्ध ) होत नाहीं. जीव हा, कर्मफळाची इच्छा करणारा व शरीराचा अभिमान धरणारा असल्यामुळें, तो पुण्यपापांनीं बद्ध होतो. याप्रमाणें अनेक कारणांनीं जीव आणि परमात्मा हे नित्य भिन्न आहेत. जीव हे ( त्यांच्या ) अनादि योग्यतेनें श्रेष्ठ कनिष्ठ असल्यामुळें परस्पर नित्य निराळे आहेत. जड हें, सदोदित ज्ञानरहित असल्यामुळें तें ईश्वर आणि जीव यांपासून निरंतर भिन्न आहे. तें भगवंताच्या इच्छेप्रमाणें परमाणुरूपांनीं अथवा पर्वतादिरूपांनीं अनेक भेदांनी निरंतर युक्त असतें; याप्रमाणें वेदादिकांत उघड ( सांगितलें ) असल्यानें सर्व ऐक्यतारूप संकर जाणणें हें ज्ञानिजनांस शोभणार नाहीं. ॥ ३१ ॥

**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ॥**
**सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥ ३२ ॥**

परमात्मनो लेपाभावं दृष्टांतेनोपपादयति । यथेति । सर्वगतं पंकादि सर्वपदार्थेषु स्थितमाकाशं सौक्ष्म्यादसंगत्वान्नोपालिप्यते । तथा सर्वत्र नीचोच्चदेहेऽवस्थित आत्मा परमात्मा देहधर्मैर्न लिप्यते ३२

परमात्मा हा पुण्यपापादिकांनीं लिप्त होत नाहीं, हें ह्मणणें दृष्टांतानें दृढ करितातः-ज्याप्रमाणें सर्वव्यापि आकाश सूक्ष्मरूपानें असंग असल्यामुळें, पंकादि अनेक वाईट पदार्थांतही ( दिसत ) असलें तरी, त्या पंकादिकांनीं लिप्त होत नाहीं; (त्याला त्या चिखलाचा वगैरे मळ लागत नाहीं ) त्याप्रमाणें उत्तम, अधम व मध्यम अशा प्रकारचे देहधारण करणाऱ्या जीवांत प्रेरकरूपानें सर्वत्र असणारा परमात्मा, असंग ( संगरहित ) असल्यामुळें, त्या जीवांच्या किंवा देहांच्या पुण्यपापादिकांच्या संबंधानें तो कधींही लिप्त होत नाहीं. ।३२।

**यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ॥**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ ३३ ॥**

यदर्थं क्षेत्रादिस्वरूपं निरूपितं तत्क्षेत्रज्ञस्वरूपं दृष्टांतेन दर्शयति३३

ज्या परमात्म्याचें ज्ञान व्हावें याकरितां, या पंचमहाभूतात्मक क्षेत्राचें वर्णन केलें आहे, त्या क्षेत्रज्ञ-परमात्म्याचें-स्वरूप, दृष्टांतानें सांगतातः-

हे भरतकुलश्रेष्ठा अर्जुना, ज्याप्रमाणें एकटाच सूर्य आपल्या प्रभेनें हा सर्व लोक प्रकाशमान करितो, त्याप्रमाणें क्षेत्रज्ञ नामक परमात्मा या पंचमहाभूतात्मक क्षेत्रांस प्रकाशवंत करितो. सूर्य हा स्वतंत्र नाहीं तसा क्षेत्रज्ञ नामक परमात्माही अस्वतंत्र आहे, असें समजूं नये. मंदमती जनांचे बुद्धीस समजावें ह्मणून, हा दृष्टांत सांगितला आहे. सूर्यांत आणि परमात्म्यांत अनंतपटीनें फरक आहे. ३३

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा ॥**
**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम् ॥ ३४ ॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां**
**प्रकृतिपुरुष निर्देशयोगो नाम**
**त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥**

अध्यायार्थमुपसंहरति । क्षेत्रक्षेत्रज्ञयोरिति । एवमुक्तप्रकारेण क्षेत्रक्षेत्रज्ञयोरंतरं भेदं ज्ञानचक्षुषा विवेकदृष्ट्या ये विदुः तथा भूतेभ्यः पृथिव्यादिभ्यः प्रकृतेश्च मोक्षो येन भूतानां जीवानामचेतनप्रकृतेः सकाशान्मोक्षोयेनेति वा तदमानित्वादिकं ये विदुः ते परं ब्रह्म यांति ३४

इति श्रीमद्भगवद्गीताविवृतौ विद्याधिराजभट्टोपाध्याय
विरचितायाम् श्रीमध्वमतानुवर्तिनी व्याख्योपेतायाम्
त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

या अध्यायांतील अर्थाचा उपसंहार करितातः—हे अर्जुना, पूर्वी सांगितल्याप्रमाणें ज्ञानदृष्टीनें पंचमहाभूतात्मक क्षेत्रांला आणि तदभिमानी जीवांला, त्याप्रमाणेंच त्यांचा प्रेरक जो परमात्मा त्याला, परस्पर भेद आहे असें जे जाणतात—ते पंचमहाभूतांपासून किंवा जड प्रकृतिरूप शरीरबंधापासून जीवाला मुक्त करण्याचीं अमानित्वादि साधनें जे जाणतात—ते या भवबंधापासून मुक्त होतात. ह्मणून तूंही संसारबंधाला कारण असलेला जो अभिमान त्याचा त्याग करून, मला संतोष देणारें व क्षत्रियाला उचित असें युद्धरूप कर्म तें कर; असें तात्पर्य. ॥ ३४ ॥

येथें श्रीमदिन्दिराकान्ततीर्थ श्रीपादविरचित प्राकृत टीकेचा
तेरावा अध्याय समाप्त झाला.

# अथ चतुर्दशोऽध्यायः

श्री भगवानुवाच ।

**परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ॥**
**यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥१॥**

**श्रीगुरुभ्यो नमः । साधनं प्राधान्येनोत्तरैरध्यायैरुच्यते । तत्र बंधनप्रकारपरिज्ञानएव तन्मोक्षसाधनानुष्ठानं युज्यते बंधश्च त्रिगुणात्मकः अतोयावत्संजायतइत्युक्तविवरणपूर्वकं त्रिगुणविकारास्थितिः तदत्ययोपायश्च अस्मिन्नध्याये प्रदर्श्यते वक्ष्यमाणार्थं प्रतिज्ञाय स्तौति परमितिश्लोकद्वयेन । परं कर्माद्यपेक्षयोत्कृष्टं ज्ञानानां मध्ये उत्तमं ज्ञानं भूयः प्रकर्षेण वक्ष्यामि यज्ज्ञात्वा मुनयः मननशीलाः इतः संसारात् परां सिद्धिं गताः ॥ १ ॥**

आतां पुढील अध्यायांत संसारापासून मुक्त होण्याचीं साधनें कोणतीं तीं सांगतात:—प्रथमतः बंध हा त्रिगुणात्मक व " यावत्संजायते किंचित् " या श्लोकातील अर्थ विवरणपूर्वक विकारस्थिति आणि त्याच्या नाशाचा उपाय या अध्यायांत दाखवितात. वक्ष्यमाणार्थ प्रतिज्ञा करून, त्याच्या फलाची स्तुति श्रीकृष्ण भगवान् करितात:—हे अर्जुना, सर्व कर्मादिकांहून श्रेष्ठ व ज्ञानांत उत्तम, असें ज्ञान तुला सांगतों; तें ज्ञान समजूनच मनन करणारे अनेक ऋषिसमुदाय संसारबंधनापासून मुक्त होऊन, परम सिद्धिरूप जी मुक्ति त्या मुक्तीस गेले आहेत. असें तें मीं सांगितलेलें उत्तमोत्तम ज्ञान तूं ऐक. १

**इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः ॥**
**सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च ॥ २ ॥**

**इदं ज्ञानमवलंब्य मम साधर्म्यं सारूप्यादिलक्षणमाश्रिताः ॥२॥**

मी जें आतां ज्ञान सांगणार आहें; त्या ज्ञानाची प्राप्ति झाल्यानें कित्येकांस माझें साधर्म्य ह्मणजे चतुर्भुजरूप व जननमरणराहित्य असे समान धर्म प्राप्त झालेले आहेत, ह्मणूनच ते सृष्टिकाळीं उत्पन्न होत नाहींत

व प्रलयकालींही दुःख पावत नाहींत. तात्पर्य त्यांना पुनः जननमरण हीं नाहींत. ॥ २ ॥

**मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् ॥**
**सम्भवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ ३ ॥**

प्रतिज्ञातमर्थमाह । ममेति । महद्ब्रह्म चित्प्रकृतिः । महती ब्रह्मणी द्वे तु प्रकृतिश्च महेश्वरः इत्युक्तेः मम योनिर्भार्या । योनिर्भार्या तथा स्थानं योनिः कारणमेवचेत्यभिधानात् तस्मिन्नहं गर्भं दधामि ततः सर्वजीवानां देहसंबंधलक्षणउद्भवोभवति ॥ ३ ॥

प्रतिज्ञात अर्थ सांगतातः—हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, चित्प्रकृति अशी जी महालक्ष्मी ती माझी भार्या होय; तिचेठायीं मी गर्भ ठेवितों, आणि त्या गर्भापासून ब्रह्मरुद्रादि जीवगणांची उत्पत्ति होते. ॥ ३ ॥

**सर्वयोनिषु कौन्तेय मूर्तयः सम्भवन्ति याः ॥**
**तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥ ४ ॥**

न केवलमादिसर्वएवानयोः कारणत्वं किंतु सर्वदेत्याह । सर्वयोनिषु इति । मनुष्यतिर्यगादिसर्वयोनिषु याः मूर्तयः कार्यव्यक्तापन्नाः संभवंति तासां महद्ब्रह्म लक्ष्मीर्योनिः क्षेत्ररूपं कारणं अहं बीजप्रदः गर्भाधानकर्ता पिता ॥ ४ ॥

केवळ प्रथमोत्पत्तीलाच आम्हीं ( मी व लक्ष्मी ) कारण नसून, सर्वकाळ जगाची उत्पत्ति होण्याला कारण आहों असें सांगतातः—देव, मनुष्य, तिर्यगादि योनींच्याठायीं जे देह उत्पन्न होतात त्यांस, चित्प्रकृति अशी महालक्ष्मी जगदंबा—माता होय, आणि मीं बीजदाता पिता होय. ॥ ४ ॥

**सत्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसम्भवाः ॥**
**निबध्नंति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ ५ ॥**

गुणत्रयकृतबंधनप्रकारं दर्शयति । सत्त्वमिति । अत्रगुणत्रयाभिमानिन्योलक्ष्म्याद्यास्तिस्रोमूर्तयोजीवंबध्नंतीतिबोद्धव्यं । श्री भू दुर्गा महती तु माया सा लोकसूतिर्जगतोबंधिका चेतिश्रुतेः ॥ ५ ॥

गुणत्रयांनीं केलेल्या बंधनाचा प्रकार सांगतात:—हे महाबाहो अर्जुना, सत्व, रज, तम हे प्रकृतिपासून उत्पन्न झालेले तीन गुण, प्रकृतीचें कार्य जो देह, त्याचेठायीं—त्या देहांत—रहाणाऱ्या नाशरहित अशा जीवाला संसारबंधनानें बांधून टाकितात. या ठिकाणीं जीवास बंधन करणाऱ्या, श्री, भू, आणि दुर्गा, अशा महालक्ष्मीच्या तीन मूर्ति जाणाव्या. ॥ ५ ॥

**तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् ॥**
**सुखसङ्गेन बध्नाति ज्ञानसङ्गेन चानघ ॥ ६ ॥**

सर्वान् बध्नंति सर्वाश्च तथापि तु विशेषतः श्रीर्देवबंधिका नृणां भूर्दैत्यानामथापरेत्युक्त न्यायेन बंधकत्वं क्रमेणाह । तत्रेत्यादिना । तत्र तेषु गुणेषु मध्ये स्वच्छत्वात्प्रकाशकं निरुपद्रवं सत्त्वं सुखज्ञानशक्तिजननेन देवान् बध्नाति ॥ ६ ॥

वर सांगितलेल्या लक्ष्मीच्या तीन्ही मूर्ति, सर्व प्राण्यांस बंधन करितात, परंतु बहुतकरून श्रीदेवी ही देवांस, भूदेवी मनुष्यांस आणि दुर्गादेवी दैत्यांस बंधन करितात, ह्मणून समजावें. हे निष्पापा अर्जुना, या सत्वादि गुणामध्यें सत्वगुण हा निर्मळ असून तो शुद्ध स्फटिकाप्रमाणें ज्ञानाचा प्रकाशक आहे; आणि तो निरुपद्रवी व शांतही आहे. सत्वगुणाभिमानिनी श्रीदेवी, सत्वगुण कार्यभूत ज्ञानशक्तीनें व सुखशक्तीनें देवांस बद्ध करिते. ॥ ६ ॥

**रजो रागात्मकं विद्धि तृष्णासङ्गसमुद्भवम् ॥**
**तन्निबध्नाति कौन्तेय कर्मसङ्गेन देहिनम् ॥ ७ ॥**

अनुरंजनरूपं विद्धि तत्कर्मसंगेन मानुषं बध्नाति ॥ ७ ॥

हे कुंतीपुत्रा अर्जुना, रजोगुण हा अनुरंजन स्वरूपाचा असून अप्राप्त आणि प्राप्त वस्तूंच्या ठिकाणीं प्रीति उत्पन्न करणारा असा आहे. रजोगुणाभिमानिनी भूदेवी ही, देहाभिमानी असा जो मनुष्य त्यास, स्वर्गादि अनित्य फळ देणाऱ्या यज्ञयागादिकांविषयीं आसक्ति उत्पन्न करिते. ॥ ७ ॥

**तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् ॥**
**प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ ८ ॥**

अज्ञानं जायते यतस्तदज्ञानजं तमोमोहनं विद्धि तत्प्रमादादिभिरसुरं बध्नाति ॥ ८ ॥

हे भारता, तमोगुण हा, अज्ञानोत्पत्तीस कारण असून, तो सर्व प्राण्यांस मोह उत्पन्न करणारा आहे असें समज; तमोगुणाभिमानिनी दुर्गादेवी, त्या तमोगुणकार्यभूत, प्रमाद, निरुद्योग, निद्रादिकांनीं दैत्यांस बंधन करिते, ॥ ८ ॥

**सत्वं सुखे सञ्जयति रजः कर्मणि भारत ॥**
**ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे संजयत्युत ॥ ९ ॥**

सत्वादीनां बंधकत्वं सुखादिसंगापादनेनैवेति नियमं दृढयति। सत्वमिति। संजयति सुखयुक्तंकरोति ॥ ९ ॥

सत्वादिक गुण हे सुखादिक संपादन करूनच बद्ध करितात, असें निश्चयानें सांगतात. हे भारता अर्जुना, सत्वगुण हा सुखाची आसक्ति उत्पन्न करितो; रजोगुण कर्में करण्याविषयीं प्रवृत्ति करितो; आणि तमोगुण हा ज्ञान झांकून टाकून स्तब्धता ( गैरसावधपणा ) उत्पन्न करितो, ह्मणजे आळस, झोंप वगैरे गुणांनीं युक्त करितो. ॥ ९ ॥

**रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत ॥**
**रजः सत्वं तमश्चैव तमः सत्वं रजस्तथा ॥ १० ॥**

ननु त्रयाणां गुणानां समत्वात्कथं कदाचित्कस्यचिदेव गुणस्य कार्यं दृश्यत इत्यत आह। रजइति। ईश्वरेच्छया सत्वं कदाचिद्रजःस्तमसी अभिभूय स्वयमुत्कटं भवति कदाचिद्रजः सत्वतमसी अभिभूयोल्बणं भवति तमः सत्वरजसी अभिभूय प्रादुर्भवतीत्यर्थः ॥ १० ॥

हे तीन्ही गुण सारखेच आहेत. कधीं कधीं तर एखाद्या मनुष्यांत एकाच गुणाचीं कार्यें कशीं दिसतात? याविषयीं सांगतात:—त्या त्या जीवाच्या भावी फळाला अनुसरून, भगवंताच्या इच्छेनें कधीं कधीं सत्वगुण हा रज आणि तम या गुणांस जिंकून, आपण बलिष्ठ होऊन सुख आणि ज्ञान याचीं इच्छा उत्पन्न करितो. कधीं कधीं रजोगुण हा सत्व आणि तम यांस जिंकून

( स्वतः बलिष्ठ होऊन ) तृष्णादि कार्यांचे ठिकाणीं प्रवृत्त करितो. कधीं कधीं तमोगुण हा सत्व आणि रजोगुण यांस जिंकून, ( स्वतः बलिष्ठ होऊन ) प्रमाद व आळस यांचे ठिकाणीं इच्छा उत्पन्न करितो. या सर्वांचा मुख्य कर्ता परमात्मा, व तदनुयायी गुणाभिमानी चित्प्रकृति महालक्ष्मी आणि त्या त्या जीवांचें अदृष्टच कारण होय. ॥ १० ॥

**सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते ॥**
**ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत ॥ ११ ॥**

केन लिंगेन गुणस्य कस्य वृद्धिरनुमेयेत्यपेक्षायामाह । सर्वद्वारेष्वित्यादिना । यदा श्रोत्रादिद्वारेषु शब्दादिज्ञानात्मकः प्रकाशउपजायते उपशब्दात्सुखादि ज्ञायते तदा तत्कारणं सत्वं विवृद्धमिति विद्यात् ॥ ११ ॥

कोणत्या वेळीं कोणत्या गुणाचें श्रेष्ठत्व झालें, हें कसें समजावें तें सांगतातः-हे **अर्जुना**. ज्या काळीं या देहांत श्रोत्रादिक ज्ञानेंद्रियांस ज्ञानाचा प्रकाश व सुखादिक सद्गुण उत्पन्न होतात, त्या काळीं प्रकाशरूप चिन्ह ज्याचें आहे, असा सत्वगुण बलिष्ठ झाला असें समजावें. ॥ ११ ॥

**लोभः प्रवृत्तिरारम्भः कर्मणामशमः स्पृहा ॥**
**रजस्येतानि जायन्ते विवृद्धे भरतर्षभ ॥ १२ ॥**

लोभो धनत्यागेच्छाभावः प्रवृत्तिविषयोद्योगः कर्मणां काम्यानामारंभः अशमश्चित्तस्यानुपरतिः स्पृहाअप्राप्तेऽभिलाषः एतानि रजसि विवृद्धे जायंते एतैर्लिंगैरजोविवृद्धिं जानीयात् ॥ १२ ॥

भरतकुलश्रेष्ठा **अर्जुना**, ज्या समयीं लोभ ( धनाचा व्यय न करावयाची इच्छा ) दुष्ट विषयांच्या ठिकाणीं प्रवृत्ति होणें, काम्यकर्मांचा आरंभ, इंद्रियांचेठायीं चित्त न धांवणें, ( स्वस्थ बसणें, ) अप्राप्य अशा वस्तूची इच्छा करणें, हीं सर्व चिन्हें झालीं असतां, रजोगुण अभिवृद्ध झाला आहे असें समजावें. ॥ १२ ॥

**अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च ॥**
**तमस्येतानि जायन्ते विवृद्धे कुरुनन्दन ॥ १३ ॥**

अप्रकाशः श्रोत्रादिषु शब्दादिज्ञानाभावः अप्रवृत्तिरनुद्यमः प्रमादोऽनवधानं मोहोविपर्ययः एतानि तमसि वृद्धे जायंते एतैर्लिंगैस्तमोवृद्धिंजानीयात् ॥ १३ ॥

हे कुरुनंदना, श्रोत्रादि इंद्रियांस शब्दादिकांचें ज्ञान न होणें, निरुद्योगीपणा, गैरसावधपणा, सत्य अशा या जगास मिथ्या मानणें, हीं सर्व चिन्हें, तमोगुण अभिवृद्ध झाला असतां होतात. ॥ १३ ॥

**यदा सत्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत् ॥**
**तदोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते ॥ १४ ॥**

तत्तद्गुणवृद्ध्यवस्थायां मृतानां गतिभेदमाह । यदासत्वइत्यादिना । सत्वे प्रवृद्धे सति यदा यदि देहभृत् प्रलयं मरणं याति तदा तर्हि उत्तमाविदां सर्वोत्तमं विष्णुंजानतां निर्दोषाल्लोकान् देहान् प्रतिपद्यते सात्विकदेहान् प्रविश्य ततोजायते ॥ १४ ॥

प्राण्यास मृत्युसमयीं ( अंतकाळीं ) कोणत्या गुणांचे आधिक्य झालें असतां कोणत्या लोकाची प्राप्ति होते तें सांगतातः—सत्वगुणाचें आधिक्य झालेलें असतां देहधारी जीवानें देहाचा त्याग केला तर तो परमात्म्याला सर्वोत्तमत्व जाणणाऱ्या उत्तम कुळांत जन्म पावतो ह्मणजे सात्विक देह त्यास प्राप्त होतो. ॥ १४ ॥

**रजसि प्रलयं गत्वा कर्मसङ्गिषु जायते ॥**
**तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥ १५ ॥**

रजसि प्रवृद्धे प्रलयं गत्वा फलार्थं कर्म कुर्वतां कुलेषुजायते । तथा तमसि प्रवृद्धेतु प्रलीनोमूढयोनिषु श्वसूकरादिषु जायते ॥ १५ ॥

रजोगुणाची अभिवृद्धि झाली असतां मरण आलें तर तो यज्ञादि कर्मनिष्ठ अशा कुळांत जन्म घेतो; आणि तमोगुणाची अभिवृद्धि झाली असतां मरण आलें तर तो कुत्रा, डुकर वगैरे ( तिर्यक् योनींत ) जन्म घेतो. ॥ १५ ॥

**कर्मणः सुकृतस्याहुः सात्विकं निर्मलं फलम् ॥**
**रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम् ॥ १६ ॥**

सात्विकादिकर्मणां फलमाह । कर्मणइति । विद्वत्कुलप्रसूतेन सुष्टुकृतस्य कर्मणः सात्विकं निर्मलं दुःखगंधरहितफलमाहुः रजसो-राजसस्य कर्मणोदुःखं दुःखमिश्रसुखमाहुः । दुर्दुःखमिति संप्रोक्तं खं नामसुखमुच्यते इत्यभिधानात् अन्यथा दुःखस्यातिकष्टत्वात्तमोधिकत्वं रजसो न स्यात् तमसस्तामसस्य कर्मणः अज्ञानं अज्ञानतत्कार्यरूपं-फलमाहुः ॥ १६ ॥

सात्विकादि कर्मांचें फळ सांगतातः—सात्विक कुळांत जन्म घेऊन, सात्विक कर्में करून, त्यांपासून उत्पन्न होणारें पुण्य—म्हणजे ज्याला दुःखाचा गंधही नाहीं असें सुख, प्राप्त होतें. असे कपिलादिक जे भगवंताचे अवतार ते सांगतात. कर्मनिरत लोकांत ( कुळांत ) जन्म घेणारा, राजस कर्में करून ज्यांत दुःख मिसळलेलें आहे, असें फळ प्राप्त करून घेतो. आणि पश्वादिकांच्या योनींत जन्मलेला तामस कर्में करून अज्ञानापासून उत्पन्न होणारें महद्दुःखरूप फळ भोगतो. ॥ १६ ॥

**सत्वात्सञ्जायते ज्ञानं रजसो लोभ एव च ॥**
**प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥ १७ ॥**

निर्मलादिफलं किमित्यत आह । सत्वादिति । सत्वात् ज्ञानं परमात्मविषयं रजसः लोभः स्वर्गादिविषयासक्तिः तमसः प्रमादमोहौ भवतः अज्ञानं च भवति ॥ १७ ॥

निर्मलादिक फळ कोणतें तें सांगतातः—सत्वगुणापासून, संसारनिवृत्तीला साधन असें जें परमात्मज्ञान तें उत्पन्न होतें. रजोगुणापासून लोभ व स्वर्गादि-लोकांविषयीं इच्छा आणि तमोगुणापासून प्रमाद ( गैरसावधपणा ) व मोह हे उत्पन्न होतात व त्यापासून अज्ञान उत्पन्न होतें. ॥ १७ ॥

**ऊर्ध्वं गच्छन्ति सत्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसाः ॥**
**जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामसाः ॥ १८ ॥**

एतत्साक्षात्फलं न ज्ञानादीनां स्वरूपेणाफलत्वात्तेषामपि फल-माह । ऊर्ध्वमिति । सत्वस्थाः सत्वशीलाः ज्ञानेनोर्ध्वं जनादिलोकं

गच्छंति राजसाः काम्यकर्माणो मध्ये स्वर्गादौ तिष्ठंति जघन्योनीचो गुणस्तमस्तस्यवृत्तमज्ञानादि तत्स्थास्तमः शीलाः अधोनिरयं गच्छंति १८

यज्ञादिकांपासून उत्पन्न होणारें फळ सांगतातः—सात्विक ( सत्वगुणविशिष्ट ) लोक जनोलोकादि ऊर्ध्व ( वरच्या ) लोकांत जातात; राजस लोक, ज्याला पुनरावृत्ति आहे अशा मध्य—स्वर्गादि लोकांत जातात; कनिष्ठ जो तमोगुण त्याचीं कर्मे आचरणारे, अज्ञानानें युक्त असे तामस लोक तामिस्रादि नरकांत जातात. ॥ १८ ॥

**नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ॥**
**गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥ १९ ॥**

त्रयोगुणाः विविच्योक्तास्तेषां जगद्बंधने हेतुत्वं चोक्तं ततश्च तेषामेव स्वातंत्र्यं न तु ततोऽन्यः स्वतंत्रः कश्चिदिति शंका स्यात्तां निराकरोति । नान्यमिति । द्रष्टा जीवोयदा गुणेभ्यः अन्यं कर्तारं परिणामिनं नानुपश्यति गुणेभ्यश्चापरं स्वतंत्रं परमात्मानं वेत्ति सः मयिभावमधिगच्छति अथवा एतेभ्यः सत्वादिगुणेभ्योऽन्यं कर्तारमीशं यदा पश्यति तदैवायं ना पुरुषः अन्यथा पशुसमः न केवलं कर्तारं विष्णुमन्यत्वेन पश्यन् पुरुषः किंतु गुणेभ्यः परं उत्तमत्वेन च कथं सएव पुमान् यस्मान्मद्भावं सोऽधिगच्छति । उक्तंच । एताभ्योऽन्यं परं चैव विष्णुं ज्ञात्वा विमुच्यते । सामर्थ्यातिशयादासां नैताभ्योविद्यते परम् । इति यावद्विजानाति तावत्तं नृपशुं विदुः । तस्मादेभ्योऽधिकगुणोविष्णुर्ज्ञेयः सदैवचेति ॥ १९ ॥

गुणत्रयांचा विचार सांगून, त्यास जगद्बंधकत्व सांगितलें, तर तेंच ( गुणत्रय ) स्वतंत्रपणानें जगाला बंधन करितात तर, त्यांवांचून इतर स्वतंत्र कर्ता असा ईश्वर नाहींच, अशी शंका मंदमतीजनांस येईल, तिचें निराकरण करितातः—जेव्हां हा जीव, ( द्रष्टा ) सत्व, रज, तमोगुणाशिवाय या जगास परिणामी कारण नाहीं असें समजतो व या गुणत्रयापेक्षां श्रेष्ठ असा जो परमात्मा त्यास जाणतो तेव्हां तो माझ्याठिकाणीं भिन्न राहून सायुज्य मुक्तीतें पावतो. अथवा या गुणत्रयांहून दुसरा स्वतंत्र कर्ता ईश्वर आहे ह्मणून

जो जाणतो तो " ना " ह्मणजे पुरुष जाणावा; त्याप्रमाणें हें ज्ञान ज्यास नाहीं तो शृंग नसलेला असा नरपशूच समजावा. केवळ स्वतंत्र कर्ता परमात्मा आहे असें जाणल्यानेंच पुरुष होतो असें नाहीं; तर तो परमात्मा अनंत सद्गुणांनीं मोठा श्रेष्ठ आहे, असेंही समजलें पाहिजे. हेंच ज्ञान सायुज्यमुक्ति मिळण्यास कारण आहे. ॥ १९ ॥

**गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् ॥**
**जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥ २० ॥**

एवं सुखदुःखादिबंधनस्य गुणत्रयनिबंधनत्वात्तदत्यये सत्येव बंधहानिर्नान्यथेत्याह । गुणानिति । देही देहसमुद्भवान् तत्तद्गुण परिणामदेहेषु तथा तथा प्रकाशीभुतान् एतांस्त्रीन् गुणानतीत्य जन्मादिभिः विमुक्तोऽमृतं परं ब्रह्माश्नुते ॥ २० ॥

सुखदुःखें हीं गुणत्रयांपासून उत्पन्न होत असल्यामुळें, त्या गुणत्रयांपासून मुक्त झाल्यावांचून भवबंधनांतून सुटत नाहीं ह्मणून सांगतातः—देहाभिमानी असा जीव या सात्विकादि देहांचेठायीं असणारे जे तिन्ही गुण, त्यांचें अतिक्रमण करून गेला ह्मणजे, गुणत्रयांपासून उत्पन्न होणाऱ्या जन्ममृत्युजरादि दुःखापासून मुक्त होऊन मोक्षास जातो. ॥ २० ॥

अर्जुन उवाच ।

**कैर्लिङ्गैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो ॥**
**किमाचारः कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते ॥ २१ ॥**

गुणातीत एवमुच्यते इत्युक्ते गुणातीतः कैर्लिंगैर्युक्तोभवति कीदृशाचारवान् केनोपायेन गुणानत्येतीति पृच्छन्नर्जुनउवाच ॥ २१ ॥

गुणातीतत्व हें कोणत्या साधनांनीं प्राप्त होतें, व तें प्राप्त होण्यास कोणता धर्म आचरावा लागतो आणि कोणता उपाय केला पाहिजे, याप्रमाणें प्रश्न करणारा अर्जुन ह्मणतो—हे भवभंजना, समर्था श्रीकृष्णा, देहाभिमानी असा हा जीव कोणत्या कर्मांनीं या गुणत्रयाचें अतिक्रमण करूं शकेल ? आणि मनुष्यानें गुणातीत व्हावयास कोणत्या धर्माचें आचरण करावें ? व कोणत्या उपायानें गुणत्रयाचें अतिक्रमण करून जातो, तें मला सांग. ॥ २१ ॥

श्रीभगवानुवाच ।

**प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पाण्डव ॥**
**न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ॥ २२ ॥**

कैरिति जानताप्यर्जुनेन विशेषजिज्ञासया पृष्टं लक्षणादिकम् । भगवानुवाच । प्रकाशमित्यादिना । प्रकाशं ज्ञानं प्रवृत्तिमुद्योगं मोहमज्ञानं सत्वादिकार्याणि प्रकाशादीनि स्वयं प्राप्तानि दुःखबुद्ध्या न द्वेष्टि निवृत्तानि च सुखबुद्ध्या न कांक्षतीत्यर्थः । अत्रायं विभागः सत्वादयोगुणाः द्विविधाः स्थूलाः सूक्ष्माश्च तत्र स्थूलेभ्यो लौकिकाः प्रकाशप्रवृत्तिमोहाः जायंते सूक्ष्मेभ्यस्तु परमात्मविषयाः तत्राद्येषु गुणातीतस्य द्वेषाकांक्षे प्रायो नस्तः नतु सर्वथा प्रारब्धवशात् कदाचित्संभवतः द्वितीयेषु कांक्षादिकंविद्यतएवेति । तथा च श्रुतिः रजस्तमः सत्वगुणान् प्रवृत्तान् प्रायोनचद्वेष्टि नचापि कांक्षेत् तथापि सूक्ष्मं सत्वगुणंच कांक्षेत् यदि प्रविष्टं सुतमश्च जह्यादिति । अथवा पुरुषान्तरे स्थितं प्रकाशादि साधु न द्वेष्टि तत्र मोहादि साधुनेच्छतीत्यर्थः २२

सर्व उपाय जाणणारा **अर्जुन** जरी आहे तरी विशेष ज्ञान प्राप्त व्हावें ह्मणून प्रश्न केला असतां भगवान् **श्रीकृष्ण** गुणातीताचीं लक्षणें सांगतातः— हे पंडुपुत्रा **अर्जुना**, जो अधिकारी सत्वगुण कार्यज्ञान आणि रजोगुणकार्यविषयसेवा, त्याचप्रमाणें तमोगुणकार्य अज्ञान हीं स्वयं आपण प्राप्त झालीं असतां हीं दुःखसाधनें आहेत अशा बुद्धीनें त्यांचा द्वेष करीत नाहीं व सुखसाधनाची इच्छा करीत नाहीं. ‘ सत्वादिगुण दोन प्रकारचे आहेत; एक स्थूल आणि दुसरा सूक्ष्म; स्थूल गुणापासून लौकिक—प्रकाश—प्रवृत्ति, मोह हे उत्पन्न होतात; आणि सूक्ष्म सत्वादिगुणापासून परमात्म-विषय-प्रकाश-प्रवृत्ति, मोह आदिकरून उत्पन्न होतात; त्यापैकीं लौकिक प्रकाशादिकांचे ठायीं, गुणातीतास द्वेषाची इच्छा होत नाहीं, परंतु प्रारब्धकर्माप्रमाणें एखादे वेळीं, त्यांत द्वेषाची इच्छाही उत्पन्न होते. गुणातीतास परमात्मविषयक प्रवृत्तींत इच्छा होते त्याप्रमाणेंच परमात्मविषयक मोहादिकांनीं द्वेषाचीही इच्छा होते, असें

जाणावें. अथवा दुसऱ्याचे ठायीं असलेले परमात्म-प्रकाशादि गुण पाहून त्यांस अज्ञान ( प्राप्त ) व्हावें, अशी इच्छा साधु करीत नाहींत. ॥ २२ ॥

## उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ॥
## गुणा वर्तन्त इत्येव योवऽतिष्ठति नेङ्गते ॥ २३ ॥

उदासीनवदित्यादि आचारप्रदर्शनं उदासीनवदासीनो नतूदासीनो वैष्णवकर्मानुष्ठानात् गुणैः सत्वादिभिर्नविचाल्यते गुणाएवेश्वरेच्छया प्रवर्तते ॥ २३ ॥

गुणातीत असतो तो मनुष्य विष्णुप्रिय अशीं वैष्णवकर्मेंच करितो; अवैष्णव ( वैष्णव धर्मास अयोग्य ) कर्में करीत नसून, उदासीनाप्रमाणें असणारा जो पुरुष तो सत्वादिगुणांपासून उत्पन्न होणाऱ्या सुखदुःखादिकांनीं चंचल होत नाहीं. गुणादिक हे, ईश्वराच्या इच्छेनें सुखदुःख देणारे आहेत असें जाणून, तो स्वस्थ रहातो, कोणत्याही वेळीं कांहीं कष्ट झाले तरी अवैष्णव कर्में करीतच नाहीं. ॥ २३ ॥

## समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः ॥
## तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिन्दात्मसंस्तुतिः ॥ २४ ॥

प्रायः सुखादिषु समइत्याद्युक्तप्रकारेण समदुःखसुख इत्यादिकं व्याख्येयं यद्वा विष्णुभक्तित्यागयोर्दृष्टसुखदुःखाभावेऽपि विष्णुभक्तौ समइति समदुःखसुखः स्वस्थो वैष्णवमार्गादचलः गुणातीतस्यार्थादिना निमित्तेन विष्णुभक्तिऱ्हासोनास्तीत्याशयेनोक्तं समलोष्टाश्मकांचनइत्यादि नेंगते इति सामान्येनान्यत्र प्रवृत्त्यभाव उक्तः ॥ २४ ॥

जो मनुष्य सुखदुःखें सारखींच मानतो, स्वस्थ असतो, मातीचें ढेंकूळ, दगड, सोनें हीं ज्यास उपेक्षाबुद्धीनें सारखींच वाटतात, प्रिय वस्तूचा वियोग झाला असतां किंवा अप्रिय वस्तू प्राप्त झाली असतां जो समचित्त असतो, ज्याचें धैर्य खचत नाहीं, जो स्वतःच्या निंदेनें रागावत नाहीं व स्तुतीनें संतोषी होत नाहीं, असा असतो तो गुणातीत समजावा ॥ २४ ॥

मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः ॥
सर्वारम्भपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥ २५ ॥

सर्वारम्भपरित्यागीति विशेषप्रयोजनापेक्षयाप्यवैष्णवारम्भाः निषिद्ध्यंते इति भेदः । यद्वा नेंगतइति कादाचित्कवैष्णवप्रवृत्त्यभाव उक्तः सर्वारम्भपरित्यागीति दीर्घोवैष्णव प्रवृत्त्यभावउच्यते । इंगितं क्षणिकं कर्म दीर्घमारम्भ उच्यत इत्यभिधानात् ॥ २५ ॥

तसेंच मान आणि अपमान हे ज्याला सारखेच वाटतात, शत्रूंचा द्वेष किंवा मित्रांचा स्नेह न करणारा, तसेंच कांहीं विशेष कारण पडलें तरी अवैष्णवधर्माचें आचरण न करणारा, तो गुणातीत असें समजावें. 'प्रायः सुखादिषुसमः' इत्यादि मागील टीकेंत सांगितल्याप्रमाणें, समदुःखसुख इत्यादि पदांचा अर्थ घ्यावा; किंवा विष्णूची भक्ति केल्यानें सुखें व न केल्यानें दुःखें, हीं तत्काळ जरी प्राप्त झालीं नाहींत तरी, विष्णुभक्तीविषयीं सदोदित समचित्त असणारा, स्वस्थ ह्मणजे वैष्णवमार्गापासून कधींही न ढळणारा, असा गुणातीत मनुष्य धनादिकांनीं लुब्ध होऊन विष्णुभक्तीचा त्याग करणार नाहीं, अशा अभिप्रायानें "समलोष्टाश्मकांचनः" असें ह्मटलें आहे. 'नेंगते' या पदानें सामान्यतः अवैष्णवधर्मास प्रवृत्त होणार नाहीं असें सांगून, "सर्वारंभपरित्यागी" या पदानें सर्वथा अवैष्णवधर्माचा परित्याग सांगितला आहे. अथवा "नेंगते" या पदानें कादाचित्क अवैष्णवधर्माचा निषेध करून, "सर्वारंभपरित्यागी" या पदानें, दीर्घ अवैष्णवधर्मांत प्रवृत्ति होणार नाहीं असें सांगितलें आहे. "इंगित" ह्मणजे क्षणिक कर्म होय व आरंभ ह्मणजे दीर्घ कर्म असें जाणावें. ॥ २५ ॥

मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ॥
स गुणान्समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते ॥ २६ ॥

अव्यभिचारेण भक्तियोगेन सेवतइति गुणात्ययोपायकथनं गुणान्समतीत्य लक्ष्म्यादीनामनुग्रहात्तत्कृतं बंधमतीत्य ब्रह्मभूयाय मम

योनिर्महद्ब्रह्मेति प्रकृतं ब्रह्म लक्ष्मीस्तद्भूयाय लक्ष्मीवत्स्वयोग्यभगवत्प्रियत्वाय यद्वा ब्रह्मणि भूयाय लक्ष्मीप्राप्तये कल्पते ॥ २६ ॥

जो अधिकारी दृढनिश्चयानें व एकनिष्ठ भक्तीनें माझी सेवा करितो, तो सत्वादि त्रिगुणांचें अतिक्रमण करून, आपल्या योग्यतेप्रमाणें ईश्वरास (मला) प्रिय होतो. अथवा जो एकनिष्ठ भक्तीनें माझी सेवा करितो तो लक्ष्म्यादिकांच्या अनुग्रहानें त्यांच्या बंधनांतून मुक्त होऊन 'ब्रह्मभूयाय' ह्मणजे "ममयोनिर्महद्ब्रह्म" या श्लोकांत सांगितलेलें ब्रह्म जी लक्ष्मी, त्या लक्ष्मीप्रमाणेंच भिन्न असून आपल्या योग्यतेप्रमाणें मला प्रिय होतो. अथवा ब्रह्मशब्दवाच्य लक्ष्मीतें पावण्यास समर्थ होतो असाच अर्थ घ्यावा. यावांचून अद्वैतवाद्यांनां अभिमत असें ब्रह्मैक्य ( ब्रह्म व जीव यांचें ऐक्य ) घेणें हें पूर्वापार विरुद्ध असून, 'सत्यं भिदा सत्यं भिदा सत्य भिदा' "भिन्नाजीवाः परोब्रह्म" इत्यादि अनेक श्रुति व स्मृति विरुद्ध असल्यामुळें, योग्य नव्हे. २६

ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च ॥
शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकान्तिकस्य च ॥ २७ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रम्हविद्यायां गुणत्रयविभागयोगोनाम चतुर्दशोऽध्यायः १४

ननु गुणातीतस्य भगवत्प्राप्तिरेव वक्तव्या लक्ष्मीप्राप्तिः । किमर्थमुच्यतइत्यतआह । ब्रह्मणइति । अहं ब्रह्मणो लक्ष्म्याः अव्ययस्यामृतस्य च मुक्तवर्गस्य शाश्वतस्य अक्षयफलस्य निष्कामस्य धर्मस्य एकांतिकस्य दुःखासंमिश्रस्य सुष्ठु मोक्षस्य वा प्रतिष्ठा आधारः अतोमदवियोगिनीं लक्ष्मीं प्राप्तोऽपि मामेव प्राप्तइत्यर्थः लक्ष्मीसमीपं प्राप्य तदनुज्ञया भगवत्प्राप्तिरिति दर्शयितुं भगवत्प्राप्तिमनुक्त्वा लक्ष्मीप्राप्त्युक्तिः अतएव यथा द्वारपालमतीत्य राजानं गच्छतीत्युच्यते एवं गुणानतीत्येति व्यवहारोयुज्यत एव उक्तंचैतत्सर्वम् । लोकस्थितान् प्रकाशादीन प्रायो न द्वेष्टिनेच्छति । स्वयं प्रकाशी मोहोज्झस्तथापि पुनरिच्छति । विष्णोः प्रकाशं तं चैव नित्यभक्त्याभिसेवते । सुखदुःखादिभावेपि विष्णुभक्तौ समः सदा । अर्थार्थे वा प्रियार्थे वा निंदादीनां भयादपि ।

**न विष्णुभक्तिऱ्हासोऽस्य किंतुसाम्यमथोन्नतिः । अवैष्णवारंभवर्जी विष्णुंयाति न संशयः । लक्ष्म्यादिभिः कृतोबंधोयोनादिपुरुषस्य तु । तमत्येतीह योविद्वान् सविज्ञेयोगुणात्ययी । अतीत्य त्रीणि रूपाणि महालक्ष्मीं प्रपद्यते । तयात्वनुगृहीतोऽसौ वैष्णवोविष्णुगोभवेदिति २७**

**इति श्रीमद्भगवद्गीताविवृतौ विद्याधिराजभट्टोपाध्यायविरचितायाम् श्रीमध्वमतानुवर्तिनी व्याख्योपेतायाम् चतुर्दशोऽध्यायः ॥१४॥**

गुणातीतास भगवंताचीच प्राप्ति होते असें असून, त्याला लक्ष्मीची प्राप्ति होते असें कां सांगितलें याविषयीं सांगतातः-हे **अर्जुना,** ब्रह्मशब्द-वाच्य लक्ष्मीस, नाशरहित अशा मुक्तांस, मुक्तिसुखांस, तसेंच निष्कामधर्मास व मुक्तिप्राप्ति इत्यादिकांस मी आधार असल्यामुळें, जिला माझा कधींही वियोग होत नाहीं अशा लक्ष्मीकडे आलेला ज्ञानी मजजवळ येतो, ह्मणजे तो ज्ञानी लक्ष्मीकडे येऊन तिच्या आज्ञेनें भगवान् श्रीहरि जो मीं त्या माझ्याकडे तो जातो, असें दाखविण्यासाठीं त्यास एकदम भगवंताची प्राप्ति होतें असें सांगितलें नसून, लक्ष्मीची प्राप्ति होते असें सांगितलें आहे. ज्याप्रमाणें द्वारपाळा-जवळ प्रथम जाऊन, पुढें राजा वगैरेकडे जावें लागतें, त्याप्रमाणें श्री, भू व दुर्गादेवी, या तिहींनीं ज्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें, बद्ध झालेले असे जीव-गण, भगवत्सेवापूर्वक महालक्ष्मीचे अनुग्रहानें, सत्वादिगुणांचे बंधनापासून मुक्त होऊन, तिन्ही देवींचें अतिक्रमण करून, महालक्ष्मीप्रत पावतात. नंतर तिची कृपा झाल्यामुळेंच हे विष्णुभक्त तिची आज्ञा घेऊन, नंतर विष्णुसन्निध जातात. याकरितां असार असा दुस्तर संसार तरून जाण्यास भगवंताच्या भक्तीवांचून दुसरा उपाय नसल्यामुळें, तूंही स्वधर्माचरणरूप युद्ध करून परमात्मनिष्ठ हो, हें तात्पर्य. ॥ २७ ॥

येथें **श्रीमदिंदिराकांततीर्थ** श्रीपादविरचित प्राकृत टीकेचा चवदावा अध्याय समाप्त झाला.

# अथ पंचदशोऽध्यायः

श्रीभगवानुवाच ।

**ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ॥**
**छन्दांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥ १ ॥**

श्रीगुरुभ्यो नमः । अस्मिन्नध्याये समग्रसंसारस्वरूपंतदत्ययोपायविज्ञानादि प्रपंच्यते विष्णोः सर्वोत्तमत्वात् श्रियः परतंत्रेषूत्तमत्वादचित्प्रकृतेरचेतनेषूत्तमत्वादूर्ध्वान्युत्तमानि विष्ण्वादीनि मूलानि यस्य स ऊर्ध्वमूलस्त्वं तत्र जगद्वृक्षस्य विष्णुः पृथिवीदेवतावत्पृथग्भूतं मूलं अचित्प्रकृतिर्मृद्वदुपादानतया मूलं तदधिष्ठानत्वेन चित्प्रकृतिरपि मूलभाग्भवेत् अधोभागवदाद्यापेक्षया नीचा महदादयः शाखायस्यासावधः शाखस्तं श्वोऽप्येकप्रकारेण न तिष्ठतीत्यश्वत्थः अश्ववच्चंचलत्वेन स्थितोऽश्वत्थः इतिवा तं चंचलत्वेपि सर्वात्मनानुच्छिद्यमानःपूर्वब्रह्मकल्पे यथास्थितिस्तथा सर्वत्रापीत्यव्ययं प्राहुः लोके पर्णोत्पत्तावेव फलदर्शनात् छंदसां काममोक्षफलहेतुत्वादस्य जगद्वृक्षस्य छंदांसि श्रुतीः पर्णान्याहुः यस्तं जगद्वृक्षं वेद स वेदवित् ॥ १ ॥

या ( पंधराव्या ) अध्यायांत संपूर्ण संसाराचें स्वरूप सांगून त्यापासून सुटका होण्यास उपायभूत जें विज्ञान त्याचा विस्तार सांगतातः—आजच्यासारखाच उद्यांपर्यंत तरी टिकेल याविषयीं ज्याचा नियम नाहीं, अथवा घोड्यासारख्या चंचलवृत्तीचा असा अश्वत्थ नामक जगद्वृक्ष, त्यास सर्वोत्तम असा परमात्मा श्रीहरी नारायण व परतंत्र अशा ब्रह्मरुद्रादिजीवगणांत उत्तम अशी चित्प्रकृति महालक्ष्मी व अचेतनांत उत्तम अशी जडप्रकृति, सत्वादिगुणच ज्यास मूळ आहेत, त्या जगद्वृक्षास परमश्रेष्ठ अशीं तीन मुळें आहेत; त्यांपैकीं, पृथ्वींत ज्याप्रमाणें पृथिव्याभिमानी देवता भिन्न असते, तसा परमात्मा भिन्न असून तो ( जगद्वृक्षाचें मूळ आहे. अचित्प्रकृति ही मृत्तिका जशी घटास उपादान कारण आहे तशी जगतास उपादान कारण आहे व चित्प्रकृति जडप्रकृतीस अभिमानि असल्यामुळें तीही मूळ कारण आहे.

सत्वादिगुणांपेक्षां कनिष्ठ अशीं अहंकारतत्व, महत्तत्व, व पंचमहाभूतें आणि त्यांच्या अभिमानी देवता, ह्या त्या ( जगद्वृक्षा ) च्या शाखा ( फांद्या ) आहेत; सर्व कल्पांचेठायीं प्रवाहरूपानें नित्य असलेले, ज्यांची उत्पत्ति नाहीं असे वेद हे, त्याचीं पानें होत. वृक्षास पानें आल्यावांचून फळें उत्पन्न होत नसल्यानें धर्म, अर्थ, काम आणि मोक्षरूप फळें वेदांपासून उत्पन्न होतात. ह्मणून वेद हे त्या वृक्षास पानांप्रमाणें सांगितले आहेत. अशाप्रकारचा जगद्वृक्ष जो जाणतो तो वेदांचा अर्थ जाणतो असें समजावें, हें तात्पर्य. ॥ १ ॥

अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा
गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ॥
अधश्च मूलान्यनुसन्ततानि
कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके ॥ २ ॥

**तस्य शाखाभूतानि अधश्च स्वापेक्षयाप्रकृष्टे शरीरादौ कार्ये चोर्ध्वं चोत्तमेकारणेऽव्यक्ते च प्रसृताः सूक्ष्मरूपेण संति कीदृश्यः शाखा गुणैः सत्वादिभिः प्रवृद्धा अर्वाचीनमूलैर्हि शाखाः प्रवृद्धा भवंति सत्वादयश्चार्वाचीनमूलानीति प्रतीतिसमयमात्रे सुखहेतुत्वेन विमर्दनासहत्व साम्याद्विषया एवप्रवालाः पल्लवा यासांताः मूलानि भगवद्रूपादीनि अधश्च शाखास्वनुसंततानि कर्मापेक्षया फलदातृत्वात् कर्मसंबंधीनि कर्मानुबंधीनि मूलानि ॥ २ ॥**

या जगद्वृक्षाच्या शाखा जीं पंचमहाभूतें, तीं आपल्यापेक्षां कनिष्ठ अशा शरीरादिकांचेठायीं व ऊर्ध्वस्वकारणभूत जड प्रकृतिचेठायीं सूक्ष्म रूपानें व्याप्त आहेत. शब्दादि विषय हेच कोमलदल असलेल्या मनुष्यदेहाचेठायीं, कर्माप्रमाणें फळ देणारा मूळरूपी परमात्मा किंवा चित्प्रकृत्यादिक आपल्यापेक्षां कनिष्ठ अशा स्वकार्यशाखास्थानांतर होणाऱ्या महत्तत्वादिकांचेठायीं व्याप्त असतात; परमात्मा नामक मूळ, ज्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें, अपेक्षित फळ देतो. त्याचप्रमाणे लक्ष्मीनामक मूळ परमात्म्याच्या आज्ञेनें ज्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें फळ देतो. यावरून परमात्मा आणि लक्ष्मी यांस कर्मानुबंधी असें येथें सांगितलें आहे. या कर्मभूमींत मनुष्यदेहांसच कर्म करण्याचा

अधिकार आहे. त्याशिवाय देवादिकांस कर्म करण्याचा अधिकार नसल्यामुळें, लक्ष्मी व नारायण हे कर्माधिकारी नाहींत हें स्पष्टच आहे. ॥ २ ॥

न रूपमस्येह तथोपलभ्यते
नान्तो न चादिर्न च संप्रतिष्ठा ॥
अश्वत्थमेनं सुविरूढमूल-
मसङ्गशस्त्रेण दृढेन छित्त्वा ॥ ३ ॥

अस्य जगद्वृक्षस्य रूपमिह लोके यथास्थितं तथा नोपलभ्यते अस्य नाशजन्मास्थितिहेतुत्वादंतादिर्विष्णुः स केनापि नोपलभ्यते सुविरूढमूलमतिबद्धमूलमश्वत्थं दृढेनाऽसंगशस्त्रेण संगराहित्यसहित- ज्ञानासिना छित्वा विमर्शलक्षणं छेदं कृत्वा ज्ञानासिनोपासनया सितेन छिंदेत संसारतरुं मुमुक्षुः विमर्शोह्यस्य छेदः तं न बध्नातिचा- न्यानित्यादिवचनात् ॥ ३ ॥

या संसारांत असणाऱ्या प्राण्याकडून या लोकांत या जगद्वृक्षाचें, जडप्रकृतीच्या विकारानें झालेलें रूप, पहाणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें या जगाची उत्पत्ति, स्थिति व संहार करणाऱ्या परमात्म्यासही चांगल्या रीतीनें पहातां येत नाहीं. या जगद्वृक्षाला, वैराग्यसहित ज्ञानानें विचारपूर्वक जाणून नंतर परमात्म्याचें ज्ञान संपादन करावें. अति दृढ परमात्मा ज्याचें मूळ आहे असा फार बळकट हा अश्वत्थ नामक जगद्वृक्ष, त्याचा वैराग्यासहित ज्ञानरूप शस्त्रानें विचाररूप छेद करून, त्यानंतर ब्रह्मज्ञान संपादन करावें. ॥ ३ ॥

ततः पदं तत्परिमार्गितव्यं
यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः ॥
तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये
यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥ ४ ॥

ततः तत्परं ब्रह्म परिमार्गितव्यमन्वेषणीयं यस्मिन् गताः पुनर्न- निवर्तंते विमर्शेनोपायउच्यते । तमेवेति । यतःपुराणी चिरंतनी संसार- प्रवृत्तिः प्रसृता विस्तृता तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये प्रपद्येत व्यत्ययः

छांदसः भगवतोऽन्यस्य शरणस्याभावात् तमेवप्रपद्यइत्येवं परिमार्गितव्यमित्यन्वये तस्य परिमार्गिणत्वाभावादिति तं वै प्रपद्येत यं वै प्रपद्य न शोचतीत्यादिश्रुतिः ॥ ४ ॥

या जगद्वृक्षाचें ज्ञान झाल्यावर तें परब्रह्मस्वरूप विचारानें जाणणें योग्य आहे; या जगास उपादानादि कारणापेक्षां मुख्य कारण, चित्प्रकृति व परमात्मा आहे, असें सिद्ध होतें; ज्ञानाच्यायोगानें ज्याकडे जाऊन पोंचलें असतां पुनः परत फिरावें लागत नाहीं—संसारांत यावें लागत नाहीं; ज्याच्यापासून पुरातन अशी संसाराची प्रवृत्ति विस्तृत झाली आहे, त्या पुराणपुरुष परमात्म्यासच जगद्वृक्षकार्यत्वादि विचार ज्ञानप्राप्ति होण्याकरितां, भक्तियुक्त अंतःकरणानें शरण जावें. ॥ ४ ॥

निर्मानमोहा जितसङ्गदोषा
अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ॥
द्वन्द्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञै-
र्गच्छन्त्यमूढाः पदमव्ययं तत् ॥ ५ ॥

भगवत्प्राप्तौ साधनांतराण्याह । निर्मानेति । अहंकारविपर्ययहीनाः जितविषय संगदोषाः अध्यात्मज्ञाननिरता विशेषतोनिवृत्तकामाः सुखदुःखहेतुत्वात्सुखदुःखसंज्ञैर्द्वंद्वैः शीतोष्णादिभिर्मुक्ताः अमूढाः रजस्तमःस्वभावशून्याः अव्ययं तत्पदं स्वरूपं गच्छंति ॥ ५ ॥

भगवंताची प्राप्ति होण्यास कोणतीं साधनें आहेत तीं सांगतातः—अहंकार गेला आहे ज्यांचा, स्त्रीपुत्रादि विषयसंगरहित अध्यात्मरूप जो परमात्मा त्याचे ठिकाणीं ज्यांचें चित्त आसक्त आहे, ज्यांच्या विशेषेंकरून इच्छा नाहींशा झाल्या आहेत, सुखदुःख देणारीं शीतोष्णादि द्वंद्वें त्यांपासून रहित, रज आणि तम यांचा ज्यांच्या स्वभावांत लेशही नाहीं, असे जे ज्ञानी ते नाशरहित असें ब्रह्मस्वरूप, ज्ञानद्वारां जाणतात. त्यांस या जगद्वृक्षाचें ज्ञान झाल्यामुळें परमात्म्याचें ज्ञान होतें, हें तात्पर्य. ॥ ५ ॥

न तद्भासयते सूर्यो न शशाङ्को न पावकः ॥
यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ ६ ॥

कीदृशं तत्पदमित्यतआह । नतदिति । सूर्याद्यप्रकाश्यं मुक्तप्राप्यं धाम स्वरूपम् ॥ ६ ॥

तें भगवंताचें स्वरूप कसें आहे तें सांगतात:—ज्ञानानें जाणण्यास योग्य अशा परमात्म्याचे स्वरूपास, सूर्य, चंद्र, आणि अग्नि इत्यादि देवही प्रकाश करण्यास असमर्थ आहेत; योगीजन ज्याप्रत पावले ह्मणजे पुनरावृत्तिरूप संसारांत परत येत नाहींत तें माझें सर्वोत्कृष्ठ स्वरूप होय असें समज. ॥६॥

**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ॥**
**मनः षष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥ ७ ॥**

यदुक्तं जगद्वृक्षच्छेदनार्थं तमेवप्रपद्येतेति तदयुक्तं ब्रह्मादिप्रपत्यापि तत्संभवादित्यतआह । ममैवेति । जीवलोके जीवशरीरे जीवभूतोजीवाख्यः ब्रह्मादीनां मदंशाभासत्वेनासमर्थत्वाज्जगद्वृक्षच्छेदाय भगवंतमेवप्रपद्येतेत्याशयः अंशशब्दोभिन्नांशाभिप्रायः नतु मत्स्यादिवत्स्वरूपांशाभिप्रायः । उक्तंच । जीवराशिः समस्तोपि ब्रह्मरुद्रेंद्रपूर्वकः किंचित्सादृश्यमात्रेण भिन्नोऽप्यंश इवोच्यतइति अंशाभासत्वात्तर्हि कुत्रापि कार्ये जीवस्य सामर्थ्यं न स्यात् इत्यतआह । मनइति । प्रकृतिस्थानि प्रकृतिकार्ये शरीरे स्थितानि मनः षष्ठानि श्रोत्रादीनि पंचेंद्रियाणि गोलकेभ्योविषयान्प्रति जीवः कर्षति ॥ ७ ॥

या जगद्वृक्षाचा विचाररूप छेद करण्यास परमात्म्यासच शरण गेलें पाहिजे ह्मणून सांगितलें परंतु, ब्रह्मदेवादिकांस शरण गेलें असतां जर तें काम होतें, तर मोठ्या साधनानीं साधणारी परमेश्वराची उपासना कशाला करावी ? या शंकेचा परिहार करितात:—या सर्व देहांत अनादिकाळापासून माझाच अंश जीव या नावानें असतो. तो कोणता ? तर ब्रह्मादिजीवसमुदाय होय. तो मदाभासभूत जीवसमुदाय अस्वतंत्र, अपूर्ण, अल्पशक्ति, अल्पज्ञ इत्यादि गुणांनींयुक्त असल्यामुळें त्यांनां शरण गेलें असतां, या जगद्वृक्षाचा यथार्थ छेद होणें हें असंभवनीय होय. याकरितां त्या जगद्वृक्षाच्या विचाराकरितां परमात्म्या श्रीहरीळाच शरण गेलें पाहिजे. याठिकाणीं ‘ अंश ’ हा शब्द भिन्नांश या अभिप्रायानें घेतला आहे. परमात्म्याचे अंश दोनप्रकारचे आहेत.

एक स्वरूपांश व दुसरा भिन्नांश; त्यांत, मच्छ, कूर्म, राम, कृष्णादि अवतार हे व प्रेरकत्वानें असणारीं भगवंताचीं रूपें हीं, सर्व परमात्म्यापासून अभिन्न असतात; या स्वरूपांशाला व अंशिभूत परमात्म्याला आनंदादि सर्व गुणांनीं मुळींच भेद नसतो. ब्रह्मरुद्रादि सर्व जीवगण हे भिन्नांश होत; ते परमात्म्यापासून नित्य भिन्न, अस्वतंत्र ( पराधीन ) इत्यादि गुणांनीं युक्त असून किंचित् चेतनत्व व चिद्रूपसंबंधानें परमात्म्याचे अंश ह्मणवितात. येथें अंशाभासभूत भिन्नांशरूपी ब्रह्मादिजीवगण हे " अंश " या शब्दानें घेतले आहेत. ते अस्वतंत्र असल्यामुळें, त्यांच्या प्रसादानें जगद्वृक्षाचा विचाररूप छेद होणार नाहीं. हें या ह्मणण्याचें तात्पर्य होय. जीव हे अस्वतंत्र अंशाभास असतील तर त्यांची कोणत्याही कार्याविषयीं प्रवृत्ति होणार नाहीं, अशी शंका घेऊं नये; कारण तो परमात्म्यानें दिलेल्या स्वातंत्र्यानें युक्त असून प्रकृतिकार्यभूत शरीरांत असलेलीं मन आणि श्रोत्रादि पांच इंद्रियें, इंद्रियगोलकांपासून ओढून घेऊन विषयांकडे वळवितो. वेदाद्युक्त विधिनिषेध निरर्थक होऊं नये ह्मणून, परमात्म्यानें जीवगणांला स्वातंत्र्याचा अंश दिला आहे. आणि प्राणधारणशक्तीही जीवाला त्यानेंच दिली आहे. अशा अनेक कारणांवरून, येथें अंशशब्दानें परमात्म्याचा स्वरूपांश घेणें संभवत नाहीं. याविषयीं श्रुतिप्रमाणें:—

" चतुर्वेद शिखायां " " वासुदेवः संकर्षणो प्रद्युम्नोऽनिरुद्धोहं मच्छः कूर्मःवराहोनारसिंहोवामनोरामोरामः कृष्णोबुद्धः कल्किरहं शतधाहं सहस्रधाहममितोहमनंतोहं नैवैते जायंते न म्रियंते नैषामनुज्ञा न बंधोमुक्तिः सर्वेह्येते पूर्णा अजरा अमृताः परमाः परानंदाइति " " तथाच चतुर्वेद शिखायां " " तस्यहवा एतस्य परमस्य त्रीणि रूपाणि कृष्णोरामः कपिलइति तस्य ह वा एतस्य पंच रूपाणि दश रूपाणि शत रूपाणि सहस्ररूपाण्यमितरूपाणि तानि ह वा एतानि सर्वाणि पूर्णानि सर्वाण्यनंतानि सर्वाण्यसंमितानि " " अथावराः सर्वएवापूर्णाः सर्वएव बध्यंतेऽथ मुच्यंते च केचनेति ॥ वाराहेच द्विरूपावंशकौ तस्य परमस्यहरेर्विभोः ॥ प्रतिबिंबांशकश्चाथ स्वरूपांशकएव च । प्रतिबिंबांशका जीवाः प्रादुर्भावाः परे स्मृताः । प्रतिबिंबेष्वल्पसाम्यं स्वरूपाणीतराणि त्विति । पैंगिश्रुतौ सोपाधिरनुपाधिश्च प्रतिबिंबो द्विधेयते । जीवईशस्यानुपाधिरिंद्रचापो यथा रवेः । यथैषा पुरुषे छाया एतस्मिन्नेतदाततम् । वाराहेच । अंशाश्च देह योग्यत्वाज्जीवा बंधादि संयुताः । अनुग्राह्याश्चेश्वरेण न तु मत्स्यादिकोहरिः । अदेहबंधयोगित्वाद्यथा सूर्यप्रभाक्षिणि । यथामृत समुद्रस्य

श्लेष्मादेश्च द्विरूपता । अनुग्राह्यत्वमेतस्य तेनैवावृत्तिरोधनमिति । स्वांशश्चाथो विभिन्नांश इति द्वेधांश इष्यते ॥ अंशिनोयत्तुसामर्थ्यं यस्त्वरूपं तु या स्थितिः । तदेव नाणु मात्रोऽपि भेदःस्वांशांशिनोः क्वचित् । विभिन्नांशोऽल्पशक्तिःस्यात्किंचित्सादृश्य मात्र युगिति । वामने । चेतनस्तु द्विधा प्रोक्तो जीवआत्मेति च प्रभो । जीवाब्रह्मादयाः प्रोक्ता आत्मैकस्तु जनार्दनः । इतरेष्वात्मशब्दस्तु सोपचारः प्रयुज्यतइति । मत्स्यकूर्मवराहाद्याः समाविष्णोरभेदतः । ब्रह्माद्यास्त्वत्समाः प्रोक्ता प्रकृतिश्च समा समेति । भविष्यत्पर्वणिच । भिन्ना जीवाः परोभिन्नस्तथापि ज्ञानरूपतः । प्रोच्यंते भिन्नरूपेण वेदवादेषु सर्वशः । यथेश्वरस्य जीवस्य भेदः सत्योविनिश्चयात् । तेन सत्येन मां देवास्त्रायंतु सह केशवाइति ।" इत्यादि श्रुतिस्मृतींच्या अर्थांच्या अनुसंधानानें येथें ' अंश ' हा शब्द ब्रह्मादिजीवपरच घेणें योग्य असून, जे डोळे उघडीत नसून, परमात्मा हा अनेक जीवरूपानें सुखदुःख, नरकवास आदिकरून कष्ट भोगितो, असें प्रतिपादन करणारे जीवात्मवादीच, नित्य दुःखाचें साधन जें अज्ञान तें प्राप्त करून घेतात, असें समजून, परमात्मा नित्यसुखी, सर्व ब्रह्मरुद्रादि जीवजड प्रपंच–विलक्षण, सच्चिन्मूर्ति आहे असें ध्यान करण्यास सज्जनांस कांहींच प्रत्यवाय नाहीं. ॥ ७ ॥

**शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः ॥**
**गृहीत्वैतानि संयाति वायुर्गन्धानिवाशयात् ॥ ८ ॥**

जीवस्येंद्रियाकर्षण सामर्थ्यमपि ईश्वराधीनं न स्वतइत्याह । शरीरमिति । यद्यदा जीवः शरीरमवाप्नोति यदाप्युत्क्रामति च तदेश्वरएतानि सूक्ष्माणींद्रियाणि वायुराशयात्स्थानात्पुष्पादेर्गंधान् गंधवतः पुष्पाद्यवयवानिव गृहीत्वा शरीरं लोकांतरं च संयाति । यत्र यत्रैव संयुक्तोधाता गर्भे पुनः पुनः । तत्र तत्रैव वसति न यत्र स्वयमिच्छतीत्यादिवचनात् ॥ ८ ॥

जीवाला जें इंद्रियांचें आकर्षण करण्याचें सामर्थ्य असतें, तें सुद्धां परमेश्वराच्या आधीन आहे असें सांगतातः–ज्यासमयीं जीव देह धारण करितो व जेव्हां त्याचा त्याग करितो, त्या वेळीं देहांतर्यामी परमात्मा सूक्ष्म इंद्रियांना ओढून घेतो; ज्याप्रमाणें वायु वाहूं लागला असतां तो आपल्या बरोबर फुलांतल्या सुगंधाचा अंश घेऊन जातो, त्याप्रमाणें ईश्वरसत्तेनें ज्या ज्या ठिकाणीं

जीव गर्भांत येतो किंवा परलोकीं जातो त्या त्या ठिकाणीं सूक्ष्मेंद्रियें आकर्षित होतात, असें तात्पर्य. ॥ ८ ॥

**श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ॥**
**अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ॥ ९ ॥**

इंद्रियेषु प्रवर्तकत्वेन स्थितस्य विष्णोरिंद्रियद्वारा किं विषयभोगोऽस्तीत्यपेक्षायामाह । श्रोत्रमिति ॥ ९ ॥

इंद्रियांस प्रेरकत्वरूपानें असणारा परमात्मा श्रीहरी इंद्रियद्वारा विषयांचा उपभोग घेतो किंवा नाहीं, तें सांगतातः–हा परमात्मा, जीवांचे कान, डोळे, त्वचा, जीभ, नाक आणि मन यांचे अंतर्यामीं राहून, शब्दादिविषयांचा उपभोग घेतो. जीवास शरीर प्राप्त होतें तेव्हां परमात्माच इंद्रियें आकर्षण करून नेतो व स्थितिकाळीं तोच इंद्रियद्वारां विषयांचा उपभोग घेतो; यावरून, त्यासच स्वतंत्रपणानें इंद्रियें आकर्षण करण्याची शक्ति आहे. जीवांस ती शक्ति स्वातंत्र्यानें नाहीं. ॥ ९ ॥

**उत्क्रामन्तं स्थितं वापि भुंजानं वा गुणान्वितम् ॥**
**विमूढा नानुपश्यन्ति पश्यन्ति ज्ञानचक्षुषः ॥ १० ॥**

विषयभोगांगीकारे जीववत् भोगोऽपिस्यादित्याशंकां परिहरन् यदि जीवातिरिक्तोदेहनियामकः स्यात्तर्हि किमिति न दृश्यतइत्याशंकां च परिहरति । उत्क्रामंतमिति । गुणान्वितं सारमदुष्टं वस्तु भुंजानमित्यनेनाद्या शंका निरस्ता । उक्तंच । भुंक्ते हरिः शुभान् भोगानिंद्रियेषु व्यवस्थित । पूर्णानंदोऽपि भगवान् क्रीडयाभुंक्त एव तु इति । ज्ञानिभिर्दृश्यमानत्वाद्विमूढत्वमदर्शने कारणं न नियमवत् स्वभावइति द्वितीया शंका निरस्ता ॥ १० ॥

परमात्म्यास विषयभोग आहे तर तो भोग जीवाप्रमाणेंच असेल, आणि जर जीवाशिवाय, या शरीरांत नियमन करणारा परमात्मा असेल, तर तो कां दिसत नाहीं ? या शंकेचा परिहार करितातः–जीवोत्क्रमण ( मरण ) समयीं सूक्ष्मेंद्रियांसुद्धां जीवाला आकर्षण करणारा, जीवांतर्यामी शोभन विषयोपभोग

घेणारा, अशा परमात्म्यास, अज्ञानीलोक पहात नाहींत; परंतु, ज्ञानीजन ज्ञानदृष्टीनें, जीवापेक्षां निरतिशय भिन्न, सद्गुणभोगी अशा परमात्म्याला पहातात. ॥ १० ॥

**यतन्तो योगिनश्चैनं पश्यन्त्यात्मन्यवस्थितम् ॥**
**यतन्तोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यन्त्यचेतसः ॥ ११ ॥**

**यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ॥**
**यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥ १२ ॥**

ननु यत्ने कृतेप्यदर्शनात्कथं ज्ञानचक्षुषः पश्यंतीति तत्राह । यतंतइति । योगिनोवृत्तिनिरोधेन निर्मलचित्ताः अकृतात्मानः अशुद्धबुद्धयः अचेतसोऽविवेकिनः अधश्च मूलान्यनुसंततानीति यत्सर्वांतर्यामित्वस्वरूपविज्ञानमुक्तं तत्प्रपंचयति । यदादित्यगतमित्यादिना । जगद्भासकमादित्यगतं तेजोमामकं मदीयं मदधीनं च विद्धि ॥११॥१२॥

पुष्कळ प्रयत्न केले तरी, तो परमात्मा लोकांस दिसत नाहीं, तर ज्ञान्यांसच कसा दिसतो ? तें सांगतातः—ज्यांना ज्ञान प्राप्त झालें आहे, योगाभ्यासानें ज्यांचें अंतःकरण निर्मळ झालें आहे, असे जे योगिजन ते या जीवांचे अंतर्यामीं ( असणाऱ्या ) परमात्म्यास पहातात. ज्यांचें अंतःकरण शुद्ध ( स्वाधीन ) नाहीं, शास्त्रांचा अभ्यास ज्यांनीं केला नाहीं, अहंकारामुळें मंदबुद्धि असलेले, ते जीवाशिवाय स्वतंत्र सच्चिन्मूर्ति अशा श्री परमात्म्यातें पहात नाहींत; तात्पर्य, परमात्म्याचें ज्ञान न होण्यास अज्ञानादि दोषच कारण आहेत. ॥ ११ ॥ ' अधश्चमूलान्यनुसंततानि ' या वाक्यांत सांगितलेलें, सर्वांच्या अंतर्यामीं असणारें जें भगवंताचें स्वरूप त्याचें ज्ञान सांगतातः—सूर्यांत, चंद्रांत व अग्नींत जें जगत्प्रकाशक तेज आहे, तें माझें असून माझ्याच स्वाधीन आहे असें समज. ॥ १२ ॥

**गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।**
**पुष्णामि चौषधीः सर्वा सोमो भूत्वा रसात्मकः १३**

गां भूमिमाविश्य स्वशक्त्या भूतान्यहमेव धारयामि सोमोभूत्वा सोमरूपेस्थित्वाऽमृतरसात्मकोऽहमोषधीः संवर्धयामि ॥ १३ ॥

मी भूलोकांत प्राप्त होऊन, चराचर प्राणीसमूहाचें आपल्या शक्तीनें धारण करितों. रसमय अशा सोमरूपाच्या चंद्रमंडलांतर्गत सोमनामक मीच असून, सर्व औषधींचें निश्चयानें पोषण करितों. ॥ १३ ॥

अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः ॥
प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम ॥ १४ ॥

जठराग्नौ वैश्वानरमूर्तिः सन् स्थित्वाग्न्युद्दीपकप्राणापानसंयुक्तो भक्ष्यं भोज्यं च लेह्यं चोष्यंचेति चतुर्विधमन्नं पचामि ॥ १४ ॥

मी सर्व जनांचा ( प्राण्याचे देहाचा ) आश्रय करून, जीव न होण्यास योग्य असल्यामुळें वैश्वानरनामक जठरांत असणारा जो अग्नि, त्याच्या अंतर्यामि रूपानें देहांत राहून, जठराग्नीला उद्दीपन करणारे प्राणापानादिक जे वायु, त्यांशीं मिळून भक्ष्य, भोज्य, लेह्य व चोष्य अशा चार प्रकारच्या अन्नांचा पाक करितों. दांतांनीं चावून खाण्याचे अपूपादि ( पुऱ्या, अनरसे वगैरे ) पदार्थ ते भक्ष्य, भोजनांतले अन्नादि पदार्थ ( भात वगैरे ) भोज्य, केवळ चाटून खाण्याचे पदार्थ जसें श्रीखंड, मेथकूट वगैरे ते लेह्य, आणि, ज्यांतला रस पिऊन घेतल्यानंतर चोथा टाकून द्यावयाचा—जसें ऊंस वगैरे पदार्थ—ते चोष्य होत; ॥ १४ ॥

सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टो
मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ॥
वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो
वेदान्तकृद्वेदविदेव चाहम् ॥ १५ ॥

अहं सर्वस्य हृदि नियंतृत्वेन संनिविष्टः मत्तएव संस्कारसहकृतमनोजन्यं ज्ञानमनुभवरूपंच ज्ञाननिवृत्तिश्च सर्वस्य भवति वेदैश्चसर्वैः परममुख्यवृत्त्या अहमेव वेद्यः वेदांतकृत् व्यासरूपेण वेदनिर्णयात्मक ब्रह्ममीमांसाकर्ता वेदवित् तत्वतोवेदार्थज्ञानवानहमेव ॥ १५ ॥

मी सर्व प्राण्यांच्या हृदयांत असून, माझ्याच सत्तेनें जीवांस पूर्वजन्मीं अनुभविलेलें अनुभवरूप सुविज्ञान उत्पन्न होतें. व त्या ज्ञानाची निवृत्तीही होते. सगळ्या वेदांनीं प्रतिपादिलेली परात्पर वस्तु जी श्रीनारायण तो मीच होय. वेदांचा निर्णय करणाऱ्या ब्रह्मसूत्राचा कर्ता वेदव्यासरूपी परमात्मा मीच होय; आणि सर्व वेदांचा यथार्थ अर्थ जाणणाराही मीच होय. ॥ १५ ॥

**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ॥**
**क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १६ ॥**

यदुक्तमूर्ध्वशब्देन विष्णोः सर्वोत्तमत्वं तद्विशदयति । द्वाविमावित्यादिना । द्वावेवेति संबंधः इमौ प्रमितौ चेतनौ लोके पर्यालोचने सति अथवा द्वावेवेत्यस्योपपत्तये परमपुरुषं व्यावर्तयितुं लोकइत्युक्तम् । ईशितव्यवर्गइत्यर्थः सर्वाणि भूतानि ब्रह्मादयोजीवाः क्षराः शरीरक्षरणात् कूटस्थः पुरुषोमहालक्ष्मीः पुल्लिंगेनोच्यते स्त्रीच पुंवच्छक्तिमतीक्वचिदिति वचनात् पुलिंगत्वमक्षरः देहनाशाभावात् ॥ १६ ॥

ऊर्ध्व शब्दानें विष्णूस जें सर्वोत्तमत्व सांगितलें तें स्पष्ट करून दाखवितातः—या परतंत्र वर्गांतील पुरुष शब्दवाच्य चेतन दोन प्रकारचे आहेत; त्यांत ब्रह्मदेवादि सर्व जीवगण हे, नाशवंत शरीरानेंयुक्त असल्यामुळें त्यांस क्षर असें ह्मणतात. आणि पुरुषाप्रमाणें विशिष्टशक्ति अशी जी पुरुषशब्दवाच्य लक्ष्मी ती आकाशासारखी निर्विकार असून नाशरहित असल्यानें त्या चित्प्रकृति महालक्ष्मीला अक्षर असें ह्मणतात. ॥ १६ ॥

**उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ॥**
**यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥ १७ ॥**

यदर्थं पुरुषद्वयनिरूपणं कृतं तदाह । उत्तमइति । अन्यः क्षराक्षराभ्यां न पुनरेतयोर्मध्ये कश्चित्पुरुषोत्तमः कल्प्यः तत्र श्रुत्यादिसंमतिमाह । परमात्मेति । आत्मशब्दोऽपि चेतनपर्यायः उक्तंच । ब्रह्मादिजीवाः सर्वेपि शरीरक्षरणात् क्षराः । लक्ष्मीरक्षरदेहत्वादक्षरात्परतोहरिः । इत्यादियुक्तिमप्याह । य इति । लोकत्रयमिति सर्वोपलक्षणं योहि यस्य धारणपोषणकर्ता सतस्मादुत्तमोयुक्तः तत्प्रविष्टस्य

तन्नाशे नाशप्रसंगइत्यतउक्तम् । अव्ययइति । तत्कथं ऐश्वर्यादित्याह ईश्वरइति ॥ १७ ॥

ज्याकरितां क्षराक्षर पुरुषजीव व महालक्ष्मी यांच्या स्वरूपाचें वर्णन केलें, अशा त्या परमात्म्याचें स्वरूप सांगतातः–या दोहोंहून ( क्षराक्षरांहून ) उत्तम असलेला तो परमात्मा श्रीनारायण होय; कारण जीवजडात्मक ) सर्व त्रैलोक्यांत तो प्रवेश करून, त्याचें धारण, पोषणादिक तोच करितो. यावरूनच तो सर्वविलक्षण, विचित्रशक्ति, परमात्मा सर्वोत्तम होय. कारण जो ज्यांचें पालन पोषण करितो तो त्यांपेक्षां श्रेष्ठ नव्हे काय? तो ज्या जगांत आहे त्या जगाचा नाश झाला तरी, अघटित घडविण्याची शक्ति त्याचे ठिकाणीं असल्यानें तो परमात्मा नाश पावत नाहीं ( त्याचा नाश होत नाहीं. ) ॥ १७ ॥

**यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ॥**
**अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥ १८ ॥**

सच कइत्यपेक्षायामहमेवेति स प्रमाणकमाह । यस्मादिति । क्षरं चेत्यन्वयः लोके पौरुषेयागमे ॥ १८ ॥

ज्या अर्थीं मी क्षराक्षर पुरुषांहून उत्तम आहें त्या अर्थीं मला सर्व वेदांत आणि पुराणांत पुरुषोत्तम असें ह्मणतात. ॥ १८ ॥

**यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ॥**
**स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥ १९ ॥**

अत्रात्मनस्तात्पर्यद्योतनाय ज्ञातुःफलमाह । योमामेति । एवं नत्वश्वकर्णादिवत्संज्ञात्वेन एतच्च पुरुषोत्तमत्वमपरमार्थकमिति संमोहवर्जितः सर्ववित् अस्यैव सर्वशास्त्रार्थत्वात् सर्वभावेन सर्व प्रकारेण १९

ह्मणून श्रीहरी सर्वोत्तम आहे हें ज्ञान सर्व योग्य अधिकाऱ्यांनीं ( मुमुक्षूनीं ) अवश्य संपादावें, या अभिप्रायानें ज्ञानाचें फळ सांगतातः–हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, जो मनुष्य पूर्वीं सांगितल्याप्रमाणें मी पुरुषोत्तम आहें असें निःसंशय जाणतो, तो सर्व शास्त्रें जाणणारा व सर्व प्रकारें माझी सेवा करितो असें जाणावें. ॥ १९ ॥

इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ॥
एतद्बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥ २० ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां
पुरुषोत्तमयोगो नाम पञ्चदशोऽध्यायः ॥१५॥

एतच्च न यस्मै कस्मैचिद्वाच्यमित्याशयेनाह । इतीति । इदं सर्वविदित्याद्युक्तं ततः किमित्यतआह । एतदिति । बुद्धिमानपरोक्षज्ञानी कृतकृत्योमुक्तः ॥ २० ॥

इति श्रीमद्भगवद्गीताविवृतौ विद्याधिराजभट्टोपाध्याय
विरचितायाम् श्रीमध्वमतानुवर्तिनी व्याख्योपेतायाम्
पंचदशोऽध्यायः ॥ १३ ॥

हें ज्ञान अनधिकारी व नित्य संशयी अशा लोकांस सांगू नये अशा अभिप्रायानें सांगतात:—हे निष्पापा अर्जुना, याप्रकारचें फार गुह्य असें माझें सर्वोत्तमत्व प्रतिपादन करणारें शास्त्र मी तुला सांगितलें; हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, जो हें शास्त्र समजून घेतो, तो अपरोक्षज्ञानी होऊन भवबंधापासून मुक्त होतो, याकरितां स्वतंत्र परात्पर वस्तू मीं आहें असें जाणून, माझ्या सेवेकरितां युद्धरूप स्वधर्म, मन्नियत होऊन, करण्यास तयार हो. ॥ २० ॥

येथें श्रीमदिन्दिराकान्ततीर्थ श्रीपादविरचित प्राकृत टीकेचा
पंधरावा अध्याय समाप्त झाला.

# अथ षोडशोऽध्यायः

श्री भगवानुवाच ।

**अभयं सत्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ॥**
**दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥ १ ॥**

श्रीगुरुभ्यो नमः । साधनानुष्ठानार्थं यतंतोयोगिनइत्यादिना यतंतोऽप्यकृतात्मानइत्यादिना तद्विरोधि च परित्यागार्थमुक्तम् तदुभयात्मकं देवासुरलक्षणं प्रपंच्यतेऽस्मिन्नध्याये तत्रदेवलक्षणमाह । अभयमित्यादिना । अभयं स्वतोऽन्यस्माद्वा स्वस्य भयाभावः । यस्मान्नोद्विजते लोकोलोकान्नोद्विजते च इत्युक्तेः । सत्वसंशुद्धिः चित्तप्रसादः, ज्ञानयोगव्यवस्थितिः ज्ञानोपायनिष्ठत्वं, दानं स्वभोज्यान्नादेर्यथोचितसंविभागः, दमः इंद्रियविनिग्रहः, ब्रह्मचर्यादिकं तपइत्यभिधानात्, स्वाध्यायो वेदाध्ययनम् ॥ १ ॥

साधनानुष्ठानार्थ यत्न करणारे योगी परमात्म्याला पहातात, आणि साधनरहित—अयोगी—त्याला पहात नाहींत असें पूर्वी सांगितलें; तें उभयस्वरूपी देव आणि असुर यांचीं लक्षणें या अध्यायांत विस्तारानें सांगतातः— प्रथमतः देवलक्षण अर्जुनास सांगतात. आपल्यापासून लोकांस भय उत्पन्न होईल असें न करणें, परमात्म्याचे ज्ञानसाधनांत निरंतर निष्ठा ठेवणें, चित्त प्रसन्न ठेवणें, आपलें खाण्याचें अन्न आणि द्रव्य वगैरे यांचा भाग सत्पात्रांस देणें, इंद्रियांचें संयमन करणें, अमावास्या व पौर्णिमा या तिथींस यज्ञादिक ( इष्टि वगैरे ) कर्मं करणें, आपल्यास योग्य असें वेदाचें अध्ययन करणें, ब्रह्मचर्यादि तपाचरणांत निरत असणें, मनांत कोणाविषयींही द्वेषबुद्धि ( वांकडें ) नसणें, ही दैवी संपत्ति. ॥ १ ॥

**अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शान्तिरपैशुनम् ॥**
**दया भूतेष्वलोलुत्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥ २ ॥**

अक्रोधः परपीडाकरचित्तविकाराभावः त्यागः औदार्यमात्महिंसकतदविरोधिवर्जनं वा शांतिर्भगवन्निष्ठा पैशुनं परोपद्रवनिमित्त-

दोषाणां राजादेः कथनम् । परोपद्रवहेतूनां दोषाणां पैशुनं वचः । राजादेस्तु मदाद्भीतेरदृष्टिर्दर्पउच्यतइत्यभिधानात् । तदभावोऽपैशुनं भूतेषु दया सज्जनदुःखासहिष्णुत्वम् । लोलुप्त्वं रागः रागोलौल्यं तथा-रक्तिरित्यभिधानात् तदभावोलोलुप्त्वं मार्दवमक्रूरत्वं ह्रीरकार्यकरणे व्रीडा अचापल्यं स्थैर्यं चपलः चंचलोस्थिर इत्यभिधानात् ॥ २ ॥

निषिद्ध हिंसेचा त्याग करणें, यथार्थ भाषण करणें, दुसऱ्यानें पीडा दिली तरी राग न येणें, औदार्ययुक्त असणें अथवा आत्महिंसक व तदनुकूल राहित्य, परमात्म्याचेठायीं बुद्धि स्थिर ठेवणें, लोकांना दुःख व्हावें ह्मणून त्यांचे दोष राजादिकांस ( अधिकाऱ्यांस ) न सांगणें, सज्जनांना दुःख झालेलें पाहून तें सहन न होणें, क्रूरपणा नसणें, वाईट काम ( अकार्य ) करण्याची लाज बाळगणें, चित्ताची चंचलता होऊं न देणें, ही दैवी संपत्ति. ॥ २ ॥

**तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ॥**
**भवन्ति सम्पदं दैवीमभिजातस्य भारत ॥ ३ ॥**

तेजः परानभिभवत्वं क्रोधाभावेन सहापकर्तुरनपकृतिः अक्रोधः दोषकृच्छत्रोः क्षमावान् सनिगद्यतइत्यभिधानात् । अद्रोहः परवृत्त्यनन्नुरोधः नातिमानिता अहंकारराहित्यं शेषं व्याख्यातम् एते गुणादैवसंपदमभिजातस्य भवंति ॥ ३ ॥

दुसऱ्याचा तिरस्कार न करणें, क्रोध न करितां जो आपल्यास अपकार करील त्याला अपकार न करणें, धैर्ययुक्त असणें, बाह्याभ्यंतरीं शुद्ध असणें, सज्जनांचा द्रोह न करणें, अथवा परवृत्तिनिरोध न करणें, फार गर्व न धरणें, हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, हे सर्व गुण देवांस योग्य, सात्विक संपत्तीचा उपभोग घेण्यास जो उत्पन्न झाला असेल त्यालाच प्राप्त होतात. ३

**दम्भो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ॥**
**अज्ञानं चाभिजातस्य पार्थ सम्पदमासुरीम् ॥ ४ ॥**

असुरलक्षणमाह । दंभइति । दर्पः सत्यपिभयकारणेमदाद्भया-दर्शनं पारुष्यं निष्ठुरत्वं शिष्टं स्पष्टं एतेदोषा आसुरीं संपदमभिमुखीकृत्यजातस्य भवंति ॥ ४ ॥

असुरलक्षणें सांगतात:-हे अर्जुना, ढोंग, गर्व, आपणच श्रेष्ठ असा अभिमान असणें, क्रोध, भय प्राप्त झालें असतां तें नाहीं असें पौरुष बोलणें, निष्ठुर वाक्य बोलणें, जगन्मिथ्यात्व, जीव आणि ईश्वर यांत भेद न मानणें, पंचभेद न मानणें, आणि यामुळें अज्ञानी असणें, हे सर्व भयादि गुण असुरसंबंधीं तामस संपत्ति भोगण्याकरितां जे जीव जन्मलेले असतात, त्यांस प्राप्त होतात. ॥ ४ ॥

**दैवीसम्पद्विमोक्षाय निबन्धायासुरी मता ॥**
**मा शुचः सम्पदं दैवीमभिजातोऽसि पाण्डव ॥ ५ ॥**

संपद्द्वयस्य फलं दर्शयन्नर्जुनस्यासुरस्वभावशंकां निवारयति। दैवीति। देवसंबंधिनी संपद्विमोक्षायमता वीत्युपसर्गादेव मोक्षनानात्वं ज्ञायते असुरसंबंधिनी संपन्निबंधनाय नीचस्थानेऽधे तमसि बंधाय मता। तदुक्तम्। विकारेच्छादिभिर्मुक्तश्चिन्मात्रेच्छादिसंयुतः। मुक्त इत्युच्यतेजीवो मुक्तिश्चद्विविधा मता। चिन्मात्रदोषदुःखेच देहोमिथ्याहृगात्मकः। निषिद्धेच्छा च यत्र स्यान्नित्या सामुक्तिरासुरीति। चिन्मात्रावैष्णवी भक्तिर्देहः सम्यग्दृगात्मकः। सुखमिच्छानुकूलाच धृतिर्दैवीति सा मता। त्वं तु दैवी संपदमभिजातोसि अतोमा शुचः शोकं मा कार्षीः देवत्वादीनां स्वाभाविकत्वेन कदाचिदप्यनपायादितिः भावः ॥ ५ ॥

दोन्ही संपत्तींचें फळ सांगून, अर्जुनास आलेली असुरस्वभावाची शंका दूर करितात:—दैवी संपत्ती ही, भवबंधापासून मुक्त होण्यास कारण होते; आसुरसंपत्ती ही नीचस्थानरूप अंधतमाचेठायीं जीवाला घालून, बंधनास कारण होते. हे पंडुकुमारा अर्जुना, तूं दैवीसंपत्तीचा उपभोग घेण्यास उत्पन्न झाला आहेस, ह्मणून ' मी मोक्षाचा अधिकारी आहें किंवा नाहीं ' अशी शंका मनांत आणून शोक करूं नकोस; ' विमोक्षाय ' या पदांतील ' वि ' या उपसर्गानें, मोक्ष अनेकप्रकारचा आहे असें दाखविलें आहे; विकार करणाऱ्या ज्या इच्छा, त्या ज्यास नाहींत व जो चिन्मात्रेच्छेनेंयुक्त, त्याला मुक्त ह्मणतात. अशी मुक्ति दोनप्रकारची आहे; चिन्मात्र द्वेष, दुःख,

मिथ्याज्ञानात्मक देह व निषिद्ध इच्छा जेथें उत्पन्न होते ती आसुरी नित्यमुक्ति होय, आणि चिन्मात्र विष्णुभक्ति व ज्ञानात्मक देह व इच्छानुकूल सुख, वैष्णवधर्मांत धीरता ही दैवी नित्यमुक्ति होय. दैव किंवा आसुरस्वभाव हे नित्य असल्यामुळें, देवांस असुरत्व आणि असुरांस देवत्व हें कधींही प्राप्त होत नाहीं.॥५॥

**द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च ॥**
**दैवोविस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु ॥ ६ ॥**

सर्गाणां सबहुत्वेपि शुभाशुभफलाधिकौ देवासुराख्यौ द्वावेव गंधर्वाद्यास्तदंतराइत्यादिप्रमाणसिद्धम् । गंधर्वादिसर्गाणां देवासुरसर्गयोरंतर्भावं वदन्नुक्तवक्ष्यमाणसंकीर्तनपूर्वकमासुरस्वभावं प्रपंचयति । द्वौभूतसर्गावित्यादिना । भूतसर्गौ भूत स्वभावौ ॥ ६ ॥

सृष्टी ही अनेकप्रकारची असली तरीही, शुभफळें ज्यांचीं आहेत असे देव व अशुभ फळें ज्यांचीं आहेत ते असुर या दोघांत गंधर्वादिकांचाही अंतर्भाव होतो हें प्रमाणसिद्ध आहे; ह्मणून, तो सांगण्याकरिता पुढें सांगावयाच्या अर्थानुवादपूर्वक आसुरस्वभावाचे विस्तार सांगतातः-हे **अर्जुना**, या सृष्टींत ( असलेल्या ) प्राण्यांचा स्वभाव दोन प्रकारचा आहे. एक देव ( सत्वगुणविशिष्ट ) आणि दुसरा असुर; ( तमोगुणविशिष्ट ) ज्यांचीं मध्यम शुभफळें आहेत असे गंधर्वादिक पुष्कळ आहेत. अशुभ अधिक असलेले असे मनुष्यादिक हे अधमफळ भोगणारे असतात आणि या ( दोन ) देव आणि असुर स्वभावांतच ते ( सगळे-गंधर्व मनुष्य इत्यादि ) अंतर्भूत होतात. त्यांपैकीं दैवीस्वभाव तुला विस्तारानें सांगितला; आतां आसुरस्वभाव सांगतों; ऐक.॥६॥

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ॥**
**न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥ ७॥**

असुरा विहिते प्रवृत्तिं प्रवृत्तिधर्मं वा, निषिद्धे निवृत्तिं निवृत्तिधर्मं वा न विदुः तेषु शौचाचारसत्यानि न संति ॥ ७ ॥

असुरस्वभावाचे लोक सद्धर्मांचेठायीं प्रवृत्ति आणि असद्धर्मांचेठायीं निवृत्ति जाणत नाहींत; त्यांच्याठिकाणीं स्नानादि बाह्यशुचि ( शुद्धता ) व

अंतःकरण ( मन ) निर्मळ असणें इत्यादि अभ्यंतर शुचि ( शुद्धता ) हीं नसतात व सदाचार आणि सत्य वचन हें ते जाणत नाहींत. ॥ ७ ॥

**असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ॥**
**अपरस्परसम्भूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ ८ ॥**

किंच जगतः सत्यं विष्णुः तस्योपनिषत्सत्यस्यसत्यमिति एष ह्येव तत्सादयति यमयतिचेतीतिश्रुतिः प्रतिष्ठापकईश्वरश्च सएव तद्विवर्जितं च जगत्ते असुरा आहुः अन्नाद्भवंतिभूतानिइत्यादिनोक्तः परस्परसंभवोऽस्यनास्तीत्यपरस्परसंभूतं अन्यत्कारणं किमस्ति न किंचिदपीत्यर्थः किं तर्हि कारणमित्यत उक्तम् । काम हैतुकमिति । हेतुतः प्राप्तं हैतुकं कामेन हैतुकं कामहैतुकं स्त्रीपुंसंभोगैककारणं कर्मफलकामनैककारणकंवेत्यर्थः । अथवा असुराः जगदसत्यं मिथ्याभूतमाहुः अतएवाप्रतिष्ठं ज्ञानबाध्यं तत एवानीश्वरं नच यतोयतोजातमसावीश्वरइतिवाच्यम् । यतोपरस्परसंभूतं एकस्मादेकस्य नोत्पत्तिरितियावत् । यद्वा परमेश्वराधीनायाः प्रकृतेर्महान् महतोऽहंकारइत्यादिक्रमेण परस्परसंभूतं न भवतीत्यपरस्परसंभूतं नचेत्किंतर्हि कामहैतुकं काम इति कार्येण कारणं मिथ्याज्ञानमुपलक्ष्यते ॥ ८ ॥

ते असुर, हें जग परमसत्य अशा परमात्म्यानें आपल्या विचित्रशक्तीनें उत्पन्न केलें असून, तें प्रवाहतः अनादि व सत्यरूप आहे, असें समजत नसून कुत्सित दृश्यत्वादि हेतूनें तें ( जग ) मिथ्या आहे असें ह्मणतात. या सर्व जगाची उत्पत्ति करण्याला मुख्य आधार ईश्वर असून, तो निराकार आहे इत्यादि ह्मणण्याच्या हेतूनें, अविद्या नांवाची जी माया तिनें कल्पना केलेला असा कल्लोळ ( ओरड ) करून, वेद अप्रमाण ह्मणणाऱ्या वाद्यांप्रमाणें, शून्याकार ( ईश्वर हा निराकार आहे ) असें सांगतातः—“ अन्नाद्भवंति भूतानि ” ( अध्याय ३ श्लोक १४ ) इत्यादि श्लोकांत, देव आणि मनुष्यें परस्परांस कसें सहाय्य करितात तें सांगितलें आहे, तें नाकबूल करून, स्त्री आणि पुरुष द्वंद्वाचा ( जोड्यांचे ) संयोगरूप कामानें जगाची उत्पत्ति झाली असें ह्मणतात; किंवा, कर्मफलाची इच्छाच या ( जगदुत्पत्तीला ) कारण

आहे असें ह्मणतात; अशा प्रकारच्या अनेक स्वकपोलकल्पित कल्पनांनीं जगाचें मिथ्यात्व सांगून, परमेश्वरास कलंक लावण्याची इच्छा करितात; याला मुख्य कारण अविवेकच होय. कारण, अज्ञान हें जड असल्यामुळें त्याच्या आंगीं स्वतःची हालचाल करण्याची शक्ति नाहीं, त्यामुळें, जगाच्या उत्पत्तीस कारण अज्ञान आहे असें कसें संभवेल? यावरून, त्या ( जगाचा ) नियंता, स्वतंत्र सर्वशक्तिमान् असा ईश्वर आहे, असें घेतलेंच पाहिजे. तो ( परमात्मा ) स्वतंत्र सर्वशक्तिमान् असून, सत्य जगाची उत्पत्ति करण्यास समर्थ आहे; मग तो असत्य जग काय ह्मणून उत्पन्न करील? गारुडी वगैरे लोक हे आंब्याचें झाड वगैरे खरोखरीचे पदार्थ उत्पन्न करण्यास असमर्थ असल्यामुळें, कांहीं कांहीं पदार्थ कृतीचे करून ते उत्पन्न केल्यासारखे दाखवितात; जर खरोखरींचे पदार्थ उत्पन्न करण्याची शक्ति त्यांच्यांत असती, तर खोटे—कृतीचे—पदार्थ उत्पन्न करण्यांत त्यांस भूषण काय होतें? याप्रमाणें सूक्ष्म रीतीनें पाहिलें असतां, सत्य अशा परमात्म्यानें उत्पन्न केलेलें जगही सत्यच आहे, असें, असुरांशिवाय इतरांस दिसल्यावांचून राहणार नाहीं; हें तात्पर्य. ॥ ८ ॥

**एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः ॥**
**प्रभवन्त्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ॥ ९ ॥**

एतांदृष्टिमाश्रित्य दुष्टचित्ताः अल्पज्ञानाः घोरकर्मनिरताः जगतः शत्रवः क्षयायानिष्टप्राप्तये कलियुगादौ प्रभवंति ॥ ९ ॥

पूर्वीं सांगितलेल्या अज्ञानाचा अंगीकार करून, मलिन अंतःकरणाचे व अल्पज्ञ असे होऊन, दुष्ट असे जे ऐहिकविषय त्यांसच परमपुरुषार्थ असें समजून, प्राण्यांची हिंसा इत्यादि भयंकर कर्में करून, सर्व सज्जनांचे वैरी होऊन, जगाचें अनिष्ट करण्याकरितांच कलियुगांत उत्पन्न होतात. ॥ ९ ॥

**काममाश्रित्य दुष्पूरं दंभमानमदान्विताः ॥**
**मोहाद्गृहित्वाऽसद्ग्राहान्प्रवर्तन्तेऽशुचिव्रताः ॥ १० ॥**

किंच काममाश्रित्य दंभादियुक्ताः प्रवर्तंते कामस्यप्रवर्तकत्वे हेतुः दुःपूरमिति कामस्यपूर्तौ सत्यां तत्र काम्ये प्रवृत्त्यभावः पूरयितु-

मशक्यत्वादेव सर्वे प्रवर्तंते कथं मोहात् मिथ्याज्ञान स्वाभाव्या-त्कुशास्त्राभ्यासजनिताद्विपर्ययाच्च असद्ग्राहान् दुराग्रहान् गृहीत्वा अशुचिव्रताः वेदबाह्याः कश्मलव्रताः क्षुद्रोदरभोगार्थं प्रवर्तंते ॥ १० ॥

ज्याची तृप्ति कशानेंही व्हावयाची नाहीं, अशा कामाचा आश्रय करून ढोंग, अभिमान आणि मद यांनीं युक्त होऊन, वाईट (कु) शास्त्रांच्या अभ्यासानें उत्पन्न झालेल्या मिथ्याज्ञानानेंयुक्त असून वेदबाह्य व्रताचरण करणारे, अन्य देवतांचें आराधन करून, ऐश्वर्यादिकांची प्राप्ति व्हावी असा दुराग्रह धरून, मद्यमांसादिक उपहारानें क्षुद्रदेवतांची आराधना करूं लागतात. ॥ १० ॥

**चिन्तामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिताः ॥**
**कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ॥ ११ ॥**

अपिच मरणावधिकां परिमातुमशक्यां चिंतामाश्रिताः केवल-कामोपभोगनिरताः एतावदैहिकमेवकेवलं नान्यदामुष्मिकमिति निश्चयवंतः ॥ ११ ॥

सांगण्यास अशक्य ( अपार ) अशा प्रकारची व जिचा शेवट मरणा-बरोबरच होतो अशी चिंता करून, गंध, फुलें, बायको, घर, वस्त्रें, खाणें-पिणें इत्यादिकांचे ठिकाणीं आसक्तचित्त असे, ते, ऐहिकभोग हाच परम-पुरुषार्थ असें निश्चयानें समजतात. ॥ ११ ॥

**आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः ॥**
**ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ॥ १२ ॥**

आशाएवपाशास्तेषां शतैर्बद्धाः कामक्रोधावेव परमयनं येषांते तथोक्ताः कामभोगार्थं धर्मादेरभाव निश्चयान्मिथ्यात्व निश्चयाच्च स्तेय दुष्प्रतिग्रह परसेवादिनाऽन्यायेनार्थ संचयानीहंते वांछंति ॥१२॥

शेंकडों आशापाशानीं बद्ध होऊन, काम आणि क्रोध यांचे स्वाधीन होऊन, अपेक्षित सुखोपभोग संपादावे या हेतूनें, धर्मादिकांच्या ज्ञानाचा अभाव असल्यामुळें मिथ्याज्ञानाच्या निश्चयानें, चोरी, दुष्प्रतिग्रह, ( वाईट

दान घेणें ) नीचाची चाकरी करणें इत्यादि अन्यायसाधनांनीं धन ( द्रव्य ) मिळविण्याची इच्छा करितात. ॥ १२ ॥

**इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् ॥**
**इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥ १३ ॥**

चिंताप्रकारंदर्शयंस्तेषांफलमाह । इदमद्येत्यादिना ॥ १३ ॥

चिंतेचा प्रकार सांगतात:—आज मी ही वस्तु मिळविली; माझ्या मनांतला ( अमुक ) हा मनोरथ पूर्ण होणार; माझ्याजवळ हें इतकें द्रव्य आहे; तें आणखी वाढेल; आणि मला आणखी पुष्कळ मिळण्याचा संभव आहे. ॥ १३ ॥

**असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ॥**
**ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥१४॥**

ईश्वरः समर्थः परमेश्वरोवा । भोगी ऐहिकामुष्मिकभोगसंपन्नः सिद्धः कृतकृत्यः ॥ १४ ॥

तसेंच आज मी या शत्रूचा नाश केला; बाकी राहिले त्यांचाही मी नाश करीन; समर्थ मीच; ईश्वर मीच; ऐहिकसुखांचा उपभोग घेणारा मी; आज मी कृतकृत्य झालों; बलाढ्य मी; सुखी मी; असें असुरस्वभावाचे लोक समजतात. ॥ १४ ॥

**आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ॥**
**यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ॥१५॥**

आढ्योधनादिसंपन्नः आभिजनवान् । कुलीनः यागादिधर्मानुष्ठास्यामि । मयासदृशः कोऽन्योस्तीत्येवमज्ञानेन विमोहिताः ॥१५॥

मी द्रव्यादि संपत्तीनेंयुक्त आहें; माझा जन्म उत्तम कुलांत झाला आहे; माझ्यासारखा या पृथ्वीवर दुसरा कोण आहे? माझी जगांत ख्याति व्हावी ह्मणून मी यज्ञयागादिक करीन; माझी स्तुति करणारांस मी यथेच्छ द्रव्य देईन; इत्यादि विचार मनांत आणून हे असुरस्वभावाचे लोक मोहित होतात. ॥ १५ ॥

**अनेकचित्तविभ्रान्ता मोहजालसमावृताः ॥**
**प्रसक्ताः कामभोगेषु पतन्ति नरकेऽशुचौ ॥ १६ ॥**

अनेकविषयचित्तेन विभ्रांताः पुत्रमित्रादिमोहजालेन समावृताः। विषयभोगेष्वतितरां सक्ताः अशुचौ नरके पतंति ॥ १६ ॥

ते अनेक प्रकारच्या मनोरथांनीं भ्रांतचित्त होऊन, मिथ्याज्ञानरूप मोहजाळानें आच्छादित होऊन, विषासारखे जे विषय त्यांचा उपभोगलंपट होऊन, अशुद्ध-अपवित्र-अशा दुःखकारक घोर नरकांत पडतात. ॥ १६ ॥

**आत्मसम्भाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः ॥**
**यजंते नाम यज्ञैस्ते दम्भेनाविधिपूर्वकम् ॥ १७ ॥**

आत्मनैवसंभाविताः आराधिताः । वयमाराध्याइति मन्यमानाः स्वयमेवस्वात्मानमाराधयंति नतुतेषामन्यः कश्चित् विद्वान् पूजकः । अतएव स्तब्धाः अनम्राः धननिबंधनगर्वदर्पोपेताः विधान दक्षिणादिवर्जं दीक्षितशब्दव्यवहार्यत्वराजसन्मानादिसिद्ध्यर्थमेवयज्ञैर्यजंते १७

सत्पुरुषांकडून त्यांची स्तुती होत नाहीं, परंतु ते आपणच आपल्याला स्तुत्यसंभावित—ह्मणवून घेतात. ते सत्पुरुषांस नम्र न होणारे, धनादि मदानें गर्विष्ठ असलेले, विधिहीन व दक्षिणारहित यज्ञ करून, आपणांस लोकांनीं दीक्षित ह्मणावें व लोकांत आपल्यास सन्मान मिळावा, या हेतूनें यज्ञादिक करितात. ॥ १७ ॥

**अहङ्कारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ॥**
**मामात्मपरदेहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः ॥ १८ ॥**

अहंकारादिकमाश्रिताः आत्मपरदेहेषु च नियामकत्वेन स्थितं मां यदीश्वरः कारयिता इदानीमकुर्वाणं मामपि कारयितु कुर्वाणंच निवारयतु इति प्रद्विषंतः । अभ्यसूयकाः निर्दोषगुणपूर्णेमयिदोषानाविष्कुर्वंतः ॥ १८ ॥

व मीपणा, बळ, ताठा, मनांतील कामक्रोधादि दुर्गुणानींयुक्त होत्साते आपल्या आणि दुसऱ्याच्या देहांत, जीवांतर्यामी असणारा सर्वप्रेरक परमात्मा

आहे आणि तो सर्व कार्यें करणारा आहे असें असेल तर मी आज अमुक काम करणार नाहीं, तें तो परमात्मा माझ्याकडून कसें करवितो पाहूं; किंवा आज मी अमुक काम करणार; तें तो परमात्मा माझ्याकडून कसें होऊं देत नाहीं पाहूं; या प्रकारें माझी छलना करून माझा द्वेष करणारे, व सन्मार्गानें वागणाऱ्या परमात्म्याच्या भक्तावर उगीच दोषारोप करणारे, असुरस्वभावाचे होत. ॥ १८ ॥

**तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् ॥**
**क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥ १९ ॥**

यजंतेतान् मद्वेषिणः संसारेषुतत्राप्यासुरीष्वेव योनिषु क्षिपामि १९

अशा त्या द्वेष करणाऱ्या पुण्यहीन नराधमांला मी, जन्ममरणरूप संसारांत असुरकुलांत जन्मास घालतों. ॥ १९ ॥

**आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ॥**
**मामप्राप्यैव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम् ॥२०॥**

ततोमूढास्तामसस्वभावाज्जन्मनि जन्मनि आसुरीं योनिमेवापन्नां मामप्राप्यैव मत्प्राप्तिशंकाशून्याः अधमां नित्यनिरयलक्षणां गतिं यांति उक्तंच । येऽतिमानेन मन्यंते परमेशोऽहमित्यपि । मिथ्या जगदिदं सर्वं भ्रमजत्वान्न तिष्ठति । मिथ्यात्वान्नेश्वरोऽप्यस्ति परेभ्यो नच जायते । स्वस्मिन्नपि तथान्यस्मिन्नियंतान्य इतीरिते । प्रद्विषंत्यसुरास्तेऽपि सर्वेयांत्यधरंतम इति । प्रवृत्तिंचेत्यादिना योऽयमासुरस्वभावउक्तः । स तेषु तेषु वादिषु यथास्वभावं योजनीयः तदनुसारेणाऽनर्थ तारतम्यंचावगंतव्यं अतएव मध्येपि नरके पतंतीत्युक्तम् ॥ २० ॥

हे अर्जुना, आसुरयोनींत वारंवार जन्म घेणाऱ्या त्या अज्ञ प्राण्यांना, माझी प्राप्ति न होतां, असुरजन्म भोगल्यावर ते अंधतम नामक नरकांत जातात. ॥ २० ॥

**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ॥**
**कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥२१॥**

उक्तेषु पुमर्थविरोधिषु प्रधानं दोषत्रयमवश्यं त्याज्यमित्याह । त्रिविधमिति । कामक्रोधलोभा इतीदं त्रिविधं नरकद्वारम् । अतएव आत्मनो नाशनमनर्थप्रापकं तस्मादेतत्त्रयमवश्यं त्यजेत् । ततश्च कारणाभावान्न नरकप्राप्तिरितिभावः ॥ २१ ॥

पूर्वी सांगितलेले मोक्षास विरोधी जे दोष त्यांत तीन दोषांचा मुख्यत्वेंकरून अवश्य त्याग करावा ह्मणून सांगतातः—काम, क्रोध आणि लोभ हे तीन दोष, आत्म्याला नीच योनींत घालणारे आहेत. याकरितां या दोषत्रयांचा अवश्य त्याग करावा; हे तीन दोष नसतील तर, नरकप्राप्ति होत नाहीं. ॥ २१ ॥

**एतैर्विमुक्तः कौन्तेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ॥**
**आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परांगतिम् ॥ २२ ॥**

न केवलं कामादित्यागेन नरकावाप्त्यभावः किंतर्हि इत्यत आह । एतैरिति । तमसोनरकस्य द्वारैरूपायैरेतै स्त्रिभिः कामादिभिर्विमुक्तोनरः आत्मनः श्रेयः साधनमाचरति ततः परांगतिं मोक्षं याति ॥ २२ ॥

तरी पण केवळ कामादिकांचा त्याग केल्यानेंच नरकप्राप्ति होत नाहीं असें नाहीं; आणखींही कांहीं धर्म आचरिले पाहिजेत ह्मणून सांगतातः—हे अर्जुना, नरकप्राप्तीस कारण होणाऱ्या या काम, क्रोध आणि लोभ यांपासून मुक्त झालेला मनुष्य, आपल्यास कल्याणकारक अशा तप व योग इत्यादि आचरून, त्या योगानें ज्ञानप्राप्ति झाल्यावर, त्या ज्ञानाच्या योगानें मुक्त होतो. ॥ २२ ॥

**यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ॥**
**न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न पराङ्गतिम् ॥२३॥**

श्रेयः साधनानुष्ठानेंगांतरं विधातुं तदकरणेबाधकं तावदाह । यइति । यःशास्त्रविधानमुत्सृज्य स्वेच्छामात्रेण यत्र कुत्रापि प्रवर्तते सः तत्कर्मनिष्पत्त्यादिकं नाप्नोति ॥ २३ ॥

परंतु श्रेयः साधन अनुष्ठानाविषयीं आणखींही कांहीं अंगें करावीं लागतात, तीं न केलीं तर, कल्याण होणार नाहीं, तें साधनाचें अंग कोणतें

तें सांगतात:–जो मनुष्य शास्त्रविधीचा त्याग करून इच्छेस येईल तसा वागतो, त्यास तत्वज्ञान व्हावयाचें नाहीं, सुखही मिळावयाचें नाहीं व ज्ञानानें प्राप्त होणारी मुक्तीही मिळावयाची नाहीं. ॥ २३ ॥

**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ॥**
**ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥ २४ ॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां दैवासुरसंपद्विभागयोगो नाम षोडशोध्यायः ॥ १६ ॥**

कुतः शास्त्रविधानातिक्रमे कर्मसिद्ध्याद्यभावइत्याशंकापरिहरन्मं गांतरं विधत्ते । तस्मादिति । यस्मादिदं कार्यमिदमकार्यमिति व्यवस्थायां ते विवेकिनः शास्त्रं प्रमाणं तदतिक्रमे च दोषः तस्मादिह लोके शास्त्रविधानोक्तं कर्मकर्तुमर्हसीत्यर्थः ॥ २४ ॥

इति श्रीमद्भगवद्गीताविवृतौ विद्याधिराजभट्टोपाध्यायविरचितायाम् श्रीमध्वमतानुवर्तिनी व्याख्योपेतायाम् षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥

शास्त्रविधीचा त्याग केला तरी, परमसिद्धि–मुक्ती–कां मिळूं नये? अशी शंका येईल तिचें निरसन करण्याकरितां, साधनांतरें सांगतात:–हे अर्जुना, याकरितां, करावयास योग्य कोणतें व न करावें कोणतें, याचा निर्णय करण्याचें असल्यास, तुला श्रुतिस्मृतिपुराणादिक प्रमाणें आहेत; त्याकरितां ह्मणून शास्त्रविधीप्रमाणें सत्कर्मे सद्गुरूच्या मुखानें ऐकून, त्याप्रमाणें ( सद्गुरुवचनाप्रमाणें ) कर्म करावयास तूं योग्य आहेस; याकरितां माझ्या प्रीतीस कारण कर्मयोगाचा म्यां तुला या कर्मभूमींत उपदेश केला आहे. तो सर्व लक्षांत आणून, तुझ्या क्षात्रधर्माला योग्य असें युद्धरूप जें कर्म, तें करण्यास तूं योग्य आहेस. ॥ २४ ॥

येथें श्रीमदिंदिराकांततीर्थ श्रीपादविरचित प्राकृत टीकेचा सोळावा अध्याय समाप्त झाला.

# अथ सप्तदशोऽध्यायः

अर्जुन उवाच ।

**ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजन्ते श्रद्धयान्विताः ॥**
**तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहो रजस्तमः ॥ १ ॥**

श्रीगुरुभ्यो नमः ॥ हानोपादानार्थं गुणनिमित्तश्रद्धाभेदोऽत्र प्रपंच्यते । कार्याकार्यव्यवस्थितौ शास्त्रं प्रमाणमित्युक्तम् । तत्र । तपोविशेषैर्विविधैरर्चनैः श्रुतिचोदितैः वेदः । कृत्स्नोऽधिगंतव्यः सरहस्यो द्विजन्मनेति शास्त्रोक्तविधिमज्ञात्वा श्रद्धामात्रेण यजतां सात्विकादिषु कीदृशी स्थितिरिति जिज्ञासुरर्जुन उवाच येशास्त्रविधिमिति ॥ १ ॥

कोणतें टाकावें आणि कोणतें ध्यावें हें समजण्याकरितां गुणनिमित्त श्रद्धाभेदांचें, या अध्यायांत विस्तारानें वर्णन करितातः—कार्य योग्य कोणतें व अयोग्य कोणतें याचा निर्णय करण्यास शास्त्रच योग्य आहे. ( शास्त्रांत पाहून योग्यायोग्याचा निर्णय करावा ) ह्मणून पूर्वीं सांगितलें; ( अ. १६ वा. ) पण कित्येक ठिकाणीं तपोविशेष नानाविध अर्चनादि प्रकार जाणून वेदाधिकाऱ्यानें सर्व वेदांचें अध्ययन करावें असें सांगितलें आहे; हा शास्त्रविधि न जाणतां केवळ श्रद्धेनें यजनादिक केलें तर त्यांस सात्विक, राजस, तामस, यांत कोणती स्थिति प्राप्त होते, हें जाणण्याची इच्छा करणारा अर्जुन, प्रश्न करितोः—हे भगवान् श्रीकृष्णा, जे मनुष्यप्राणी आळसानें शास्त्रोक्त विधि समजून न घेतां आपल्या कुलसंप्रदायाप्रमाणें, आस्तिक्यबुद्धीनें देवतांचें आराधन इत्यादि करितात, तेव्हां त्यांची ती निष्ठा ( स्थिति ) बुद्धि, सात्विक, राजस किंवा तामस ह्मणावी ? तें मला सांगा. ॥ १ ॥

श्रीभगवानुवाच ।

**त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा ॥**
**सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु ॥२॥**

तत्र अज्ञानस्य साधारण्यात्प्रभेदाभावाच्च यजनांगत्वेनोक्तां श्रद्धां सात्विकादिना विभज्य तदाश्रयेण तेषां स्वरूपं भगवानुवाच । त्रिविधेति ॥ २ ॥

त्यांना ( कुलपरंपरागत यजनादिक करणारांला ) अज्ञान ह्मणजे ज्ञानाभाव, तेथें प्रभेद नाहींत; ह्मणून यजनाला अंगभूत जी श्रद्धा, त्या श्रद्धेला सात्विकादिगुणभेदानें विभागून त्यांचा आश्रय करणाऱ्या लोकांचें स्वरूप **श्रीकृष्ण**, सांगतातः—हे **अर्जुना**, जीवांची आस्तिक्यबुद्धि—श्रद्धा—ही सात्विक, राजस, आणि तामस या भेदांनीं तीन प्रकारची आहे. ती श्रद्धा जीवांच्या सात्विकादि स्वभावाप्रमाणें, निरनिराळी आहे, ह्मणून तिचें स्वरूप सांगतों, तें ऐक. ॥ २ ॥

**सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत ॥**
**श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ ३ ॥**

**श्रद्धात्रैविध्ये जीवानां किमागतमित्यतआह । सत्वानुरूपेति । जीवानुरूपश्रद्धोऽयं जीवः श्रद्धामयः श्रद्धास्वरूपः अतो यः सात्विकश्रद्धः स सात्विकः, राजसश्रद्धो राजसः, तामसश्रद्धस्तामसइत्यर्थः यद्यपि मनोवृत्तिरूपत्रिविधा श्रद्धा कचित्कदाचित्त्रिविधेष्वपि जीवेष्वस्ति तथापि स्वरूपश्रद्धायाएवाधिक्येनाभिव्यक्तेर्ज्ञातुं शक्यत्वात्तयैव जीवस्वरूपं विवेक्तव्यं । उक्तंच । सात्विकस्य तमोरूपा श्रद्धांतःकरणात्मिका । सात्विकी तामसस्यापि भूयस्त्वात्तद्विविच्यते । श्रद्धास्वरूपं जीवस्य तस्माच्छ्रद्धाविभेदतः । उत्तमाधममध्यास्तु जीवाज्ञेयाः पृथक् पृथगिति ॥ ३ ॥**

श्रद्धा तीन प्रकारची झाली तर जीवांस काय आलें तें सांगतातः—हे भरतकुलोत्पन्ना **अर्जुना**, जो मनुष्य ज्या श्रद्धेनें युक्त असतो, तो त्या नांवानें प्रसिद्ध होतो. ह्मणजे सात्विकश्रद्धायुक्त तो सात्विक; राजसश्रद्धायुक्त तो राजस, आणि तामसश्रद्धायुक्त तो तामस जाणावा. या जीवाला ( तिहींपैकीं ) कोणती तरी श्रद्धा असतेच; श्रद्धा दोन प्रकारची आहे, मनोवृत्तिभूत आणि जीवरूपभूत; यांत, सात्विक जीवांस एकाद्या वेळीं राजस आणि तामस श्रद्धा उत्पन्न होतात; राजस जीवांस सात्विकतामस व तामस जीवांस सात्विकराजस श्रद्धा उत्पन्न होतात; सात्विक जीवांच्या अंतःकरणांत सात्विकच श्रद्धा असते. राजस जीवांचे अंतःकरणांत राजस श्रद्धाच असते, आणि तामस जीवांचे

अंत:करणांत तामस श्रद्धाच असते; ह्मणून, ज्यांच्या त्यांच्या श्रद्धेमुळें भिन्न असलेले हे जीव उत्तम, मध्यम व कनिष्ठ या भेदानें नित्य भिन्नच असतात. ॥३॥

यजन्ते सात्त्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः ॥
प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः ॥ ४ ॥

यो यच्छ्रद्धइत्यस्य विवरणाय तां शृण्विति प्रतिज्ञातमाह । यजंतइति । सात्विकश्रद्धाः शास्त्रविधिमजानंतोपि देवान् ब्रह्मादिविष्णुरूपाणि यजंते । उक्तंच । त्यक्तापि शास्त्रविहितं मिथ्याज्ञानविवर्जिताः । भक्त्या विष्णुं यजंतो ये निषिद्धाचरणोज्झिताः । तेपि यान्ति हरिं शास्त्रविधानस्थातु किंपुनरिति । राजसतामसश्रद्धास्त्वजानंतएव यजंते इत्यादि व्याख्येयं । राजसतामसा अपि यद्यपि देवयाजिनः तथापि यक्षादीनांयजनोक्तत्वात्तेषामेव यष्टारोभवंतीति यक्षादीन् यजंत इत्युक्तम् । तदुक्तम् । दीनत्वादेवनामान स्त्वन्ये ब्रह्मादिनामकाः । अवैष्णवकृतोयज्ञोदीनैर्देवैश्च भुंजतइति ॥ ४ ॥

" योयच्छ्रद्धः " याचें स्पष्टीकरण करण्याच्या हेतूनें, मागील प्रतिज्ञात अर्थाचें स्पष्टीकरण करितात:—सात्विक लोक हे, परमात्मा श्रीहरी सर्वोत्तम आहे असें समजून, त्याची भक्ति करितात; रमा आणि ब्रह्मरुद्रादिदेव हे परमात्म्याचे भक्त आहेत असें समजून तारतम्यानें त्यांचेठायीं ते ( सात्विक ) भक्ति करितात. राजस असतात ते, देव या नांवाचे यक्ष किंवा राक्षस, यांस इंद्रादि नामांनीं यजन ( होम हवन ) करितात. आणि जे, राजस असतात ते विष्णु हा सर्वोत्तम आहे याविषयीं संशययुक्त असतात. राजस भक्तांनीं देवतांच्या उद्देशानें यज्ञ केले तरी, त्या यज्ञाचें पुण्य यक्ष राक्षस हरण करितात. अशांस ( राजसांस ) सांकल्पिक स्वर्गफळ प्राप्त होतें. तामस लोक असतात ते भूतगणांच्या उद्देशानें यजन करितात; हे ( तामस ) ब्रह्मरुद्रादि देवश्रेष्ठांस, परात्पर सर्वोत्तम असा जो श्रीहरी त्याच्यासारखे समजतात. अथवा परमात्मा हा, त्यांपेक्षां नीच आहे असेंही समजतात. त्याचप्रमाणें ते जीव व परमेश्वर हे अभिन्न ( एकच ) आहेत असेंही ह्मणतात. या तामस भक्तांनीं शिवस्कंदादिकांच्या उद्देशानें यागादिक कर्म केलें तरी त्या यज्ञाच्या पुण्याचा

भाग, भूतप्रेतादिक हरण करतात. त्यांस ( तामसांस ) भूतादिकांची योनि प्राप्त होते. ॥ ४ ॥

**अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जनाः ॥**
**दम्भाहङ्कारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥ ५ ॥**

सात्विकादीनां याजकानां मोक्षः सांकल्पिक स्वर्गोभूतादित्वं फलं क्रमादित्युक्तानि फलानि । तत्र तामसादीनां भूतादित्वमवांतर-फलमेव मुख्यंतु तमेवेत्याशयेनाह । अशास्त्रविहितमित्यादिना यत्तपः कुर्वंतीत्युपलक्षणार्थं यज्ञादिकमपि कुर्वंति । कामरागबलान्विताः । इच्छाशक्त्याग्रहयुक्ताः ॥ ५ ॥

जे लोक सात्विक शास्त्रांत न सांगितलेलें, ( अशास्त्रविहित ) सर्व प्राणिमात्रांस भयंकर ( वाटणारें )—घोर—असें तपाचरण; ढोंग आणि मीपणा यांनीं युक्त असें कर्म आग्रहानें करितात. ॥ ५ ॥

**कर्शयन्तः शरीरस्थं भूतग्राममचेतसः ॥**
**मां चैवान्तःशरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान् ॥ ६ ॥**

शरीरस्थं भूतग्रामं लक्ष्म्यादिदेवतासमुदायं । अंतर्नियामकत्वेन स्थितं मां च कर्शयंतः । अल्पत्वेन पश्यंतः । अचेतसोऽविवेकिनः तान् आसुरोनिश्चयोयेषां ते आसुरनिश्चयाः तान्नित्यनरकयोग्यान् विद्धि । तदुक्तम् । अकृशानपि लक्ष्म्यादीन्देवान्विष्णुपरायणान् । विष्णुं च सर्वदेहस्थं कृशत्वेन विजानते । तेषामल्पगुणत्वेन कल्पनात्ते तमोध्रुवं । यांति ज्ञेयाश्च ते दैत्याः पिशाचावाथ राक्षसाइति ॥ ५ ॥

व या शरीरांत असणारे लक्ष्मी आदिकरून देवसमुदाय अल्पगुणयुक्त आहेत असें समजतात व सर्व प्रेरकत्वानें असणारा मी, त्या मलाही ( ते घोर तपाचरण करणारे ) अल्प आहे असेंही समजतात. ते अविवेकी—आसुर-निश्चयी—नित्य नरकांतच रहाण्यास योग्य असें समज. ॥ ६ ॥

**आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः ॥**
**यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ॥ ७ ॥**

श्रद्धाभेदात्सात्विकादिजीवस्वरूपं ज्ञातव्यमित्युक्तं । आहारादिभेदादपि ज्ञातव्यमित्याशयेनाह । आहारस्त्वपीत्यादिना । आहारः-अन्नादिः सात्विकादिभेदेन त्रिविधः । त्रिविधानां प्रियः यथा यज्ञादीनि त्रिविधानि तेषामाहारादीनां वक्ष्यमाणभेदं शृणु ॥ ७ ॥

सात्विकादिभेदानें जीवांचें स्वरूप कसें समजावें तें सांगितलें. आतां आहारादिभेदानें त्यांचें स्वरूप कसें ओळखावें तें सांगतातः–सर्व जीवांस सात्विकादिभेदाप्रमाणें तीन प्रकारचा आहार आवडतो, त्याचप्रमाणें यज्ञ, तप आणि दान हीहीं सात्विकादिभेदानें तीनप्रकारचीं आहेत, त्यांपैकीं आहारांचा प्रकार पुढें सांगतों, ऐक; ॥ ७ ॥

**आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ॥**
**रस्याःस्निग्धाः स्थिराहृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः ।८।**

तत्राहारभेदं तावदाह । आयुरित्यादिना । आयुर्जीवनं सत्वं साधुत्वं । सात्विकान्नभोजनाच्चित्तशुद्धिः । बलं शक्तिः, आरोग्यं रोगराहित्यं, सुखं सकृदुपभोगेऽपि दीर्घकालीनमुपभोगकालीनं सुखं प्रीतिः, एतेषां विवर्धनाः रस्याः रससंयुताः स्निग्धाः स्नेहवंतः स्थिराः बहुकालं गुणप्रदाः घृतादयः हृद्याः सेवनानंतरमपि पुनर्भूयादिति मनोहरंतः । हृद्यं पश्चान्मनोहारि प्रियं तत्कालसौख्यदम् । सुखदं दीर्घसुखदं रस्यमभ्याससौख्यदमित्यभिधानात् एते आहाराः सात्त्विकानां प्रियाः आयुरादिविवर्धना इतिवचनात् तद्विपरीतत्वे रस्यादीनामपि राजसत्वमेव ॥ ८ ॥

आयुष्य, अंतःकरणशुद्धि, शक्ति, आरोग्य, सुख ह्मणजे एकदा उपभोग घेतला तरी दीर्घकालपर्यंत असणारें, सुखोपभोगकाळीं मात्र असणारी प्रीति या सर्वांस वाढविणारे, रसयुक्त, घृतादिस्नेहयुक्त ( स्निग्ध ) पदार्थ, पुष्कळ कालपर्यंत सुख देणारे, ज्यांचे सेवनानंतरही पुनः सेवनाची इच्छा उत्पन्न करणारे, हे सर्व आहार सात्विकांस प्रिय आहेत. ॥ ८ ॥

**कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः ॥**
**आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥ ९ ॥**

कटुर्मरीचादिः । अम्लोजंबीरनीरादिः । लवणोष्णौ प्रसिद्धौ । अतिशब्दः सर्वत्र संबध्यते तीक्ष्णः सर्षपादिः रूक्षः स्वतएव निरसः विदाही संतापकरः एते आहाराराजसस्येष्टाः प्रियाः दुःखं संतापः शोकोदौर्मनस्यं आमयोरोगस्तत्प्रदाः कट्वादीनामपि आरोग्यरसाद्यर्थत्वेन सात्विकत्वमेव दुःखशोकामयप्रदाइत्युक्तेः ॥ ९ ॥

फार तिखट मिरची इत्यादि, आंबट, खारट, जळजळीत ( अतिउष्ण ) फार तीक्ष्णरसयुक्त, कोरडे ( रसरहित ), फार दाह करणारे, हे सर्व आहार राजसांस आवडतात; हे आहार दुःखादिकांस कारण होतील, तरच ते राजस होतात; परंतु आरोग्यास व आयुष्याभिवृद्धीस कारण होतील तर ते सात्विक समजावे. ॥ ९ ॥

**यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत् ॥**
**उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ॥१०॥**

योवा कोवा यस्यरसस्तदपगमे यातयामं । यामांतरितपाकंतु यातयाममितीर्यते । क्वचिच्चगतसारंस्यान्नियम्यं यातमस्य यदितिवचनात् । पूर्वं स्वादुपश्चादन्यथाजातं गतरसं । पूति दुर्गंधि पर्युषितं दिनांतरपक्वं । उच्छिष्टमन्यभुक्तावशिष्टं । अमेध्यं स्वभावतः अभक्ष्यं भुज्यत इति भोजनं अन्नादि तामसानां प्रियं स्वादुत्वादेः पुरुषभेदेनाव्यवस्थावस्थायामपि शुद्धभागवतानां तु स्वभावापेक्षयैवतु । स्वादुत्वादिविजानीयात्पदार्थानां नचान्यथेतिवचनाद्विवेकः ॥ १० ॥

ज्यापदार्थांतील रस गेला आहे किंवा जे शिजविल्यावर एक प्रहर होऊन गेला आहे, त्यांस यातयाम ह्मणतात; प्रथम रसयुक्त असून ज्यांतला रस ( स्वाद ) गेला आहे, व दुर्गंधयुक्त, पूर्व दिवशीं केलेले शिळे; आणि दुसऱ्यानें खाऊन शिल्लक राहिलेले उष्टे व स्वभावतःच अपवित्र असे अन्नादिक पदार्थ तामसांस प्रिय असतात. ॥ १० ॥

**अफलाकांक्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते ॥**
**यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः ॥११॥**

यज्ञभेदमाह । अफलाकांक्षिभिरित्यादिना विधिदृष्टः शास्त्रज्ञानपूर्वकं ॥ ११ ॥

यज्ञाचे भेद सांगतात:-फळाची इच्छा न धरितां एकाग्रमनानें शास्त्रोक्त विधानपूर्वक जो यज्ञ करितात, तो सात्विक यज्ञ होय. ॥ ११ ॥

**अभिसन्धाय तु फलं दम्भार्थमपि चैव यत् ॥**
**इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥ १२ ॥**

दंभार्थं महत्वख्यापनाय ॥ १२ ॥

हे भरतश्रेष्ठा अर्जुना, फळाची इच्छा धरून, आपलें माहात्म्य—मोठेपणा—वाढावा ह्मणून, केलेला जो यज्ञ तो राजस यज्ञ जाणावा, ॥१२॥

**विधिहीनमसृष्टान्नं मंत्रहीनमदक्षिणम् ॥**
**श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥ १३ ॥**

असृष्टान्नं अन्नत्यागशून्यं मंत्रोच्चारण तदर्थज्ञानरहितं परिचक्षते कथयंति ॥ १३ ॥

शास्त्रोक्तविधीचें ज्ञान नसून केलेला, ( अशास्त्र ) अन्नदानरहित, मंत्राच्या अर्थाचें ज्ञान नसतां, यथोक्त दक्षिणादि न देतां, श्रद्धेवांचून केलेला जो यज्ञ, त्यास तामस यज्ञ असें ह्मणतात. ॥ १३ ॥

**देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ॥**
**ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥ १४ ॥**

तपसः सात्विकादि भेदं दर्शयितु शरीरादिभेदेन त्रैविध्यं तावदाह । देवद्विजेत्यादिना शारीरं शरीरसंपाद्यं ॥ १४ ॥

या नंतर सात्विकादिभेदानें तपश्चर्येचे भेद दाखविण्याकरितां शरीरादिक तपाचे भेद सांगतात:—देव, ब्राह्मण, गुरु आणि बुद्धिमान् ( तत्ववेत्ते ) यांची पूजा शुद्धांतःकरणानें—वांकडेपणा सोडून—करणें, ब्रह्मचर्य ह्मणजे जितेंद्रिय असणें, हिंसा न करणें, यांस शारीरतप असें ह्मणतात. ॥ १४ ॥

**अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ॥**
**स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ १५ ॥**

अनुद्वेगकरं अभयंकरं श्रवणसमयेप्रियं हितं परिणामे सुखकरं १५

दुसऱ्यास भय न वाटेल असें बोलणें, खरें बोलणें, श्रवणसमयीं व परिणामीं हितावह असें बोलणें, वेदाभ्यास करणें, यांस वाचिक तप ह्मणतात. १६

मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ॥
भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ १६ ॥

मनःप्रसादोबुद्धिवैशद्यं सौम्यत्वमक्रौर्यं। अक्रूरः सौम्यउच्यत इत्यभिधानात्। मौनं मननशीलत्वं नत्वभाषणं। तस्य मानसत्वाभावात्। आत्मविनिग्रहः परमात्मनि मनोवृत्तेरवस्थानं। भावसंशुद्धिरितरविषयचिंताराहित्यं ॥ १६ ॥

रागादिक सोडून मनास प्रसन्न ठेवणें, अथवा बुद्धीची विशदता, क्रूरपणा नसणें, ( शांत असणें ) परमात्म्याच्या गुणांचें चिंतन करणें, विषयांपासून मन फिरविणें, कपट नसणें, यांस मानस तप असें ह्मणतात. ॥१६॥

श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः ॥
अफलाकांक्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते ॥ १७ ॥

इदानीं सात्विकादिभेदेन त्रैविध्यं प्रतिज्ञापूर्वकमाह। श्रद्धयेत्यादिना। युक्तैः भगवदर्पणादियोगयुक्तैः। तप्तं तपः। पाकः पक्व इतिवत् युक्तैरेतत्सात्विकयज्ञादिष्वप्यनुषंजनीयं ॥ १७ ॥

आतां सात्विकादि भेदानें तपश्चर्येचे भेद सांगतातः—कर्मफलाची इच्छा न करितां योगयुक्त मनुष्यांनीं मोठ्या भक्तीनें केलेलें, कायिकादि भेदानें तीन प्रकारचें जें तप, तें सात्विक तप जाणावें. कृष्णार्पण बुद्धीनें युक्त, अशीं योग्यांनीं केलेलीं यज्ञदानादिक हीं सात्विक होत. ॥ १७ ॥

सत्कारमानपूजार्थं तपो दम्भेन चैव यत् ॥
क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥ १८ ॥

मनसादरः सत्कारः वाचाप्रशंसा मानः शारीरोनमस्कारादिः पूजा। चलं पातभयेन चलनहेतुः। अध्रुवं क्षयिष्णु ॥ १८ ॥

जगांत आपली स्तुती व्हावी, आपल्यास मोठा मान मिळावा अशा

उद्देशानें, केवळ दांभिकपणानेंच, चंचल, अस्थिर असें जें तप करणें तें राजस समजावें. ॥ १८ ॥

**मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः ॥**
**परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥ १९ ॥**

मूढग्राहेण अविवेकदुराग्रहेण । आत्मनः पीडया शक्त्यादिकमनपेक्ष्य उत्सादनार्थम् ॥ १९ ॥

मूर्खपणानें दुराग्रह धरून, शरीरास दुःख देणारें अथवा दुसऱ्यांचा नाश करावा अशा इच्छेनें केलेलें जें तप ( जारणमारणादि ) तें तामस जाणावें. ॥ १९ ॥

**दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ॥**
**देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ।२०।**

दानभेदमाह । दातव्यमित्यादिना । पुण्यदेशे काले पात्रे च प्रत्यासन्नेसति तस्मैअनुपकारिणे पात्राय दीयते यद्दानं तत् सात्विकं २०

आतां दानाचे भेद सांगतातः—कुरुक्षेत्रादि पुण्यक्षेत्रीं, सूर्यग्रहणादि पर्वकाळीं, वेदाध्ययन केलेल्या, दान दिल्यानंतर त्याकडून त्याचा मोबदला मिळणार नाहीं अशा सत्पात्र ब्राह्मणास, अवश्य कर्तव्य असें समजून जें दान देण्यांत येतें तें, आणि स्वर्गैश्वर्यादि अनित्य संपत्तीची इच्छा न करितां जें दान देण्यांत येतें तें, सात्विक असें समजावें. ॥ २० ॥

**यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः ॥**
**दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम् ॥ २१ ॥**

परिक्लिष्टं चित्तक्लेशयुक्तं अशुभद्रव्यं वा ॥ २१ ॥

प्रत्युपकाराकरितां—आपल्यावर केलेल्या उपकाराची फेड व्हावी म्हणून दिलेलें, अथवा फलाच्या इच्छेनें दिलेलें, किंवा द्रव्य खर्च होतो असे मनांत क्लेश धरून दिलेलें, अथवा अन्यायानें मिळविलेल्या द्रव्याचें, जें दान दिलें जातें, तें राजस समजावें. ॥ २१ ॥

**अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ॥**
**असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥**

अदेशकाले अशुचौ देशे कालेच । असत्कृतं नमस्कारादिसत्काररहितम् । अवज्ञातं तिरस्कारयुक्तम् ॥ २२ ॥

अयोग्य ठिकाणीं व अयोग्यवेळीं, अयोग्य–अपात्रांस, उन्मत्तपणानें अवज्ञापूर्वक, नमस्कर वगैरे न करितां, तिरस्कारानें, कंटाळून–त्रासून–जें दान दिलें जातें, तें तामस असें समजावें. ॥ २२ ॥

**ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ॥**
**ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥ २३ ॥**

सात्विकानां यज्ञादीनामसाधारणेत्थं भावविधानार्थमाह । ॐतत्सदित्यादिना । ब्रह्मणः परमात्मनः निर्दिश्यतेऽनेनेतिनिर्देशोनाम ॐतत्सदितित्रिविधः ॐ तं प्रविष्टं जगद्यत्र जगतिच स्वयमोतमित्योमित्युच्यते तदिति नित्यपरोक्षमुच्यते ब्रह्मच प्रत्यक्षानुमानागम्यम्। वेदैकवेद्यमिति तदित्युच्यते निर्दोषसर्वशुभत्वात् सदित्युच्यते। तथाच श्रुतिः । ॐतंजगद्यत्र स्वयंचपूर्णोवेदोक्तरूपोऽनुपचारतश्च । सर्वैः शुभैश्चाभियुतोनचान्यैरोंतत्सदित्येनमतोवदंतीति । एतैर्नामभिरात्मपूजयाप्राणिनां शुभार्थं तेन ब्रह्मणा ब्राह्मणादयोविहिताः। वेदानांविधानं नाम व्यंजनमेव । तेषामपौरुषेयत्वात्तस्यच प्रमितत्वात् । परमेश्वरस्य वेदव्यंजनं नाध्यापकवत् किंतु वेदेनियोगादीनां सद्भावाच्छब्दादीनां च नियोक्तृत्वासंभवादनादिसिद्धेनैव शब्दार्थसंबंधेनेश्वरस्यैव नियोक्तृत्वात्स्वातंत्र्यमप्यस्तीति ज्ञापयितुं विहितात्युक्तं ब्रह्मणः स्वप्रतिमात्वेन यज्ञादीनां विहितत्वात्तेषामप्योंतत्सदितिनामत्रयमस्ति ॥ २३ ॥

सात्विकादि यज्ञांस असाधारणत्व दाखविण्याकरितां सांगतात:—परमात्म्यास, ॐ, तत् आणि सत् अशीं तीन नांवें ज्ञान्यांनीं सांगितलीं आहेत; हें जगत् प्रलयकाळीं परमात्म्यांत प्रविष्ट होऊन, भिन्न असतें. त्याचप्रमाणें परमात्माही, जगाचें धारण व पोषण करण्याच्या निमित्तानें, या जगांत जीवा-

र्यंतर्यामी होऊन प्रविष्ट असतो; आणि तो अनंतसद्गुणपरिपूर्ण असा असल्यामुळें त्याला " ॐ " असें नांव आहे. ज्याचें स्वरूप वेदैकगम्य असून, तें नित्य परोक्षज्ञानविषयक असल्यामुळें त्या परमात्म्यास " तत् " असें नांव आहे. सर्व मंगळमूर्ति तो परमात्मा असल्यानें त्यास " सत् " असेंही नांव आहे. हीं ॐकारादि नांवें यज्ञादिकांचीं वाचक आहेत असें समजावें. ॐकारादि नांवानें मुख्य वृत्त्याप्रतिपाद्य परमात्म्याची, या नांवानीं त्याची पूजा केली असतां, प्राण्यांस शुभप्राप्ति व्हावी अशा हेतूनें सृष्टीच्या उत्पत्तिकाळीं, ब्राह्मण, यज्ञ, दान, तपाचरण व वेदादिक हीं परस्पर संबंध ठेवून उत्पन्न केलीं जातात. वेद हे परमात्म्यापासून अनादिसिद्ध प्रगट झालेले आहेत, असें समजावें. परमात्म्यापासून यज्ञादिक उत्पन्न झाले आहेत ह्मणून त्यास " ॐ " असें नांव आहे. त्याप्रमाणेंच तत्प्रतिमास्थानभूत यज्ञादिकांसही " ॐ " असें नांव आहे, असें समजावें. ॥ २३ ॥

**तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः ॥**
**प्रवर्तन्ते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ॥ २४ ॥**

**तस्मादोमित्युदाहृत्य ॐकारमुच्चार्य ब्रह्मवादिनां यज्ञादिक्रियाः वेदोक्तप्रकारेण प्रवर्तंते ॥ २४ ॥**

ॐकारशब्द परमात्म्याचा वाचक आहे ह्मणून, ॐ असें ह्मणून ( उच्चारून ) ब्रह्मनिष्ठांच्या, वेदविधानोक्त यज्ञ, दान, तपादि क्रिया निरंतर चालू असतात; ॐतत्सत् अशा या अर्धर्चेनें परमात्म्यास आणि यज्ञादिकांस एकच नांव आहे असें सांगितलें; आणि या नामसाम्यानें यज्ञादिक हे परमात्म्याचे प्रतिमास्थानीं होत असें सुचविलें; ॐकारादि यज्ञादिकांचेठायीं आणि परमात्म्याचेठायीं प्रतिपादन करून, ॐकाराचा उच्चार करणें हा आचार सांगितला. ह्यावरून ॐकारार्थरूप परमात्म्याचें स्मरणपूर्वक ॐकाराचा उच्चार करून, ब्राह्मणादिकांनीं यज्ञादि कर्म करावें. ॥ २ ॥

**तदित्यनभिसन्धाय फलं यज्ञतपः क्रियाः ॥**
**दानक्रियाश्च विविधाः क्रियन्ते मोक्षकांक्षिभिः ॥२५॥**

**किंच तत्फलं मेस्त्यादित्यनभिसंधाय यज्ञादयः क्रियंते ॥ २५ ॥**

तत् असें ह्मणून केलेल्या यज्ञादिकांच्या फलांची इच्छा न करितां, तो परमात्मा अपरोक्षज्ञान देणारा होवो, अशी इच्छा धरून, मुमुक्षुजन नानाप्रकारचीं यज्ञ, दान आणि तप हीं करितात. यावरून केवळ ब्रह्माचें अपरोक्ष-ज्ञान प्राप्त व्हावें ह्मणून, यज्ञादिक करावें, असा अभिप्राय दर्शविला आहे. २५

**सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते ॥**
**प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥ २६ ॥**

**किंच सद्भावेऽस्तित्वे साधुभावे साधुत्वे शुभे कर्मणि च सच्छब्दः प्रयुज्यते ततश्च सच्छब्दार्थ ब्रह्मज्ञानपूर्वकत्वं लभ्यते ॥२६॥**

हे पृथापुत्रा अर्जुना, जगदुत्पत्तींत श्रेष्ठार्थवाचक असें "सत्" हें पद होय. तसेंच प्रशस्त कर्मांचेठायीं–शुभकर्मांचेठायीं, "सत्" असा शब्द उच्चारितात. "सत्" हा शब्द सर्व जगद्विलक्षण, परात्परतर परमात्मा श्रीनारायण याचा वाचक आहे. यावरून ब्रह्मज्ञानपूर्वक यज्ञादि कर्म करावें, हें याचें तात्पर्य. ॥ २६ ॥

**यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ॥**
**कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥ २७ ॥**

**यज्ञादौस्थितिर्निष्ठा सच्छब्देनोच्यते ततश्च सापि यज्ञादेरंगं सच्छब्दस्यार्थो विष्णुस्तद्विषयं तदर्थीयमिति ब्रह्मविषयत्वमुच्यते ॥२७॥**

यज्ञ, तप व दान यांविषयीं जी निष्ठा ती सत् या शब्दानें सांगतात–ज्या परमात्म्यास उक्त शब्दत्रय ( ॐ तत् सत् ) वाचक आहेत, त्या परमात्म्याचे संतोषाकरितां, केलेलें जें यज्ञादिक कर्म त्यास सत्कर्म असें ह्मणतात. या श्लोकानें ब्रह्मविषय निष्ठापूर्वक यज्ञादि कर्म ज्ञान्यांनीं करावें असें सांगितलेलें आहे, हें तात्पर्य. ॥ २७ ॥

**अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ॥**
**असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥२८॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां**
**श्रद्धात्रयविभागयोगो नाम**
**सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥**

अश्रद्धयेत्यनेन भक्तिरपि अंगमित्युच्यते। यतोऽश्रद्धयाकृतं प्रेत्य लोकांतरे न फलवत्। इहापि नो फलवत्। ततश्चोंकारार्थज्ञानपूर्वकं फलमनभिसंधाय च ब्रह्मज्ञानभक्तिपूर्वकं ब्रह्मविषयत्वेन निष्ठया वेदोक्तप्रकारेण ब्राह्मणैः सहयज्ञादिकरणे प्रतिमाप्रतिष्ठापनात् ब्रह्मैव प्रतिष्ठापितं भवति तथाच श्रुतिः ॐयज्ञाद्यानिष्फलं कर्म तत्स्यात् सद्वै तदर्थं कर्म वदंति वेदाः। तच्छब्दानां सन्निधेर्ब्रह्मप्रीतेस्तद्रूपत्वात् जनितं ब्रह्म तस्येति। अत एवं क्रियमाणं यज्ञादिकं सात्विकं अन्यद्राजसं तामसंचेत्युक्तप्रकारेण यज्ञादिकं कर्तव्यं विष्णुश्रद्धारहितत्वेन राजसस्याप्यसदंतर्भावात्पृथगनुक्तिः। फलं तारतम्येन। उक्तंच। सात्विकं मुक्तिदं कर्म राजसंस्मृतिदुःखदम्। तामसं पातदं ज्ञेयं तत्कुर्यात्कर्मवैष्णवमिति ॥ २८ ॥

इति श्रीमद्भगवद्गीताविवृतौ विद्याधिराजभट्टोपाध्याय विरचितायाम् श्रीमध्वमतानुवर्तिनी व्याख्योपेतायाम् सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥

हे अर्जुना, भक्तिवांचून केलेलें हवन, दिलेलें दान, आणि केलेलें तप व आणखीही कांहीं कर्म केलें तें त्यास असत् ( योग्य प्रकारें न केलेलें ) असें ह्मणतात. तें कर्म मरणानंतर परलोकीं उपयोगीं पडत नाहीं व या लोकींही त्याचें फल मिळत नाहीं. अश्रद्धेनें केलेलें कर्म राजस आणि तामस होय. याकरितां परमात्म्याविषयीं भक्ति असून यज्ञादि सत्कर्म सज्जनानीं करावें. अतएव तूंही मला अर्पण करण्याच्या हेतूनें युद्धरूप यज्ञकर्म करण्यास अवकाश लावूं नकोस. ॥ २८ ॥

येथें श्रीमदिन्दिराकान्ततीर्थ श्रीपादविरचित प्राकृत टीकेचा सतरावा अध्याय समाप्त झाला.

# अथ अष्टादशोऽध्यायः

अर्जुन उवाच

**संन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम् ॥**
**त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन ॥ १ ॥**

श्रीगुरुभ्यो नमः । सर्वेष्वध्यायेषु विप्रकीर्णतयोक्तं पुरुषार्थसाधनं मंदानां बुद्ध्यारोहार्थं संक्षेपेणास्मिन्नध्यायेऽउच्यते । चतुर्दशाद्यनुक्तत्रैगुण्यंचोच्यते तत्र तावन्मोक्षसाधनत्वेन निर्दिष्टयोस्त्यागसंन्यासयोः पृथक् स्वरूपनिर्णयायार्जुन उवाच । संन्यासस्येति ॥ १ ॥

मागील सर्व अध्यायांत सांगितलेलें परमपुरुषार्थ—मोक्षास—साधन—होणारें, असें परमात्म्याचें ज्ञान, मंदमती परंतु मोक्षाची इच्छा करणारे अशांस समजावें ह्मणून, या शेवटल्या अध्यायांत तें संक्षेपानें सांगतात:—प्रथमतः चवदाव्या अध्यायांत न सांगितलेले त्रैगुण्य सांगतात. मोक्ष—साधनास योग्य त्याग व संन्यास त्याचें स्वरूप काय, हें निरनिराळें ऐकण्याविषयींची इच्छा करणारा अर्जुन प्रश्न करितो.—हे सर्वेंद्रियांचें नियमन करणाऱ्या, बाहुशालि भगवंता, केशिसंहारका श्रीकृष्णा, त्याग व संन्यास या प्रत्येकाचें स्वरूप जाणण्याची मी इच्छा करितों ॥ १ ॥

श्रीभगवानुवाच ।

**काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ॥**
**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥ २ ॥**

अत्र परिहारं भगवानुवाच । काम्यानामिति । अनियतकाम्यानां स्वर्गादिफलानिच्छया विशेषणत्यागेन त्यागोनियतकाम्यानां स्वरूपाकरणेन त्यागः संन्यासः । सर्वेषां काम्यकर्मणां करणाकरणविवक्षया फलत्यागएव त्यागइत्यर्थः । तथाहि श्रुतिः आनिच्छया कर्मणावापि काम्यन्यासोन्यासः फलत्यागस्तुत्यागइति जनकाश्वपत्यादिभिर्मुमुक्षुभिरश्वमेधादीनामनुद्दिष्टफलानामनुष्ठानान्न काम्यानां

स्वरूपपरित्यागएव नित्यनैमित्तिकफलस्यांतःकरणशुद्धेः सर्वापेक्षितत्वेन तत्त्यागो न युक्तः नच सर्वेषामित्यादीनामर्थवादिकंफलमस्ति नच विश्वजिदादिवत्कल्पनाप्रमाणाभावादिति ॥ २ ॥

याप्रमाणें अर्जुनाचा प्रश्न ऐकून भगवान् श्रीकृष्ण सांगतातः—काम्यकर्मांचा त्यागच कर्म संन्यास असें समजावें. काम्यकर्में दोन प्रकारचीं आहेत; एक नित्यकाम्य व दुसरें अनित्यकाम्य; त्यांत नित्यकाम्याचा त्याग ह्मणजे कर्मांचा स्वरूपतः त्याग करणें ( मुळींच कर्म न करणें ) यालाच संन्यास असें ह्मणतात. अनित्यकाम्याचा त्याग ह्मणजे स्वर्गादि फळांच्या इच्छेचा त्याग करणें याला त्याग असें ह्मणतात; सर्व काम्यकर्म करणें अथवा न करणें याविवक्षेनें कर्मफलाच्या इच्छेचा त्याग करणें, यालाच ज्ञानीजन कर्मत्याग असें ह्मणतात. सर्व कर्मांचा स्वरूपतः त्याग व अनित्यकर्मांच्या फलाच्या इच्छेचा त्याग यालाच संन्यास असें ह्मणतात. याप्रमाणें त्याग व संन्यास शब्दाचा अर्थ केल्यामुळें कर्मसंन्यास आणि कर्मत्याग यांत विरोध नाहीं, असें समजावें. ॥ २ ॥

**त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः ॥**
**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे ॥ ३ ॥**

सर्वकर्मफलत्यागमिति स्वोक्तत्यागस्वरूपावधारणाय प्रातीतिकीं विद्वन्मतविप्रतिपत्तिमुद्भावयति । त्याज्यमिति । काम्यानां बंधकत्वेन दुष्टत्वात्फलसंगत्यागएव प्रथमपक्षेऽपि त्यागोविवक्षितः । अन्यथा मनीषिणइति विशेषणवैय्यर्थ्यात् । अतोमतयोरविरोधएव विप्रतिपत्तिस्त्वापाततः प्रतीतिमपेक्ष्योद्भावितेत्यदोषः ॥ ३ ॥

आपण सांगितलेला फलत्यागरूप कर्मत्याग दृढ करण्याकरितां, इतर विद्वज्जनांनीं काय काय ह्मटलें आहे तें सांगतातः—कित्येक ज्ञाते लोक, यागादिक हे स्वर्गादि अनित्यफल देणारे असल्यामुळें ते, सुखदुःख देणारे—बंधनकारक—दोषयुक्त आहेत; असें समजून, कर्म करूंच नये असें ह्मणतात. दुसरे कांहीं ( विद्वज्जन ) यज्ञ, दान, तपश्चर्या इत्यादि कर्मांचा त्याग करूं नये, असें ह्मणतात. पहिल्या पक्षाच्या ज्ञात्यांनींही स्वरूपतः कर्मत्याग करावा

असें सांगितलें नसून, कर्मफळाचा त्याग करावा, असें सांगितलें आहे; दुसऱ्या पक्षांतल्या ज्ञात्यांच्या ह्मणण्याप्रमाणें पाहिलें तरी फळाच्या इच्छेचा त्याग करून, कर्माचरण करावें असाच अर्थ दिसतो. यावरून दोन्ही पक्षांतील ज्ञात्यांच्या ह्मणण्याचा अर्थ एकच आहे; परंतु, तीं वाक्यें निरनिराळे अभिप्राय प्रतिपादक आहेत, असा आभास मात्र होतो, असें समजावें. ॥३॥

**निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम ॥**
**त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ॥४॥**

**अविरोध प्रकारं प्रतिज्ञापूर्वकं व्युत्पादयति । निश्चयमित्यादिना॥ तत्र विप्रतिपन्ने त्यागे विषये मे मत्तः नियमं शृणु । त्यागोहि फलत्यागो मदीयमिति कर्मणि ममतात्यागः । भगवति कर्तृत्वाद्यनुसंधानेनात्मनः कर्तव्याभिमानत्याग इति त्रिविधः संप्रकीर्तितः ॥ ४ ॥**

पुनः पूर्वोक्त अविरोधच प्रतिज्ञापूर्वक सांगतातः—हे पुरुषश्रेष्ठा, माझ्याकडून त्यागाविषयीं नियम ऐक; त्याग तीन प्रकारचा आहे; यज्ञादिक कर्में करून, त्यांच्या फळाचा त्याग करणें हा एक; केलेल्या कर्माविषयीं मी केलें असा अभिमानत्याग करणें हा दुसरा; आणि सर्वनियंता जो भगवान् तो सर्व करवितो असें समजून, यज्ञादिक करावयाचीं कर्में करून, त्यांविषयीं कर्तृत्वाभिमान सोडणें हा तिसरा त्याग होय. अथवा सात्विक, राजस आणि तामस, या भेदानें हा त्याग तीन प्रकारचा आहे, असें ज्ञानीजन सांगतात. ॥ ४ ॥

**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ॥**
**यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥५॥**

**अतस्तदन्यत्यागोनास्त्येव तवकोनिश्चयोजातइत्यपेक्षायामाह । यज्ञेति । तत्तस्माद्यज्ञादिकर्म न त्याज्यं किंतु कार्यमेव स्वरूपत्यागस्य त्यागशब्दार्थत्वाभावात् किंच मनीषिणां विदुषां यज्ञादीनि पावनानि नत्वविदुषामिव बंधकानि अतोवर्णाश्रमिभिः सर्वैरपि स्वोचितं यज्ञादिकं कार्यमेवेत्यर्थः । उक्तंच । वाचिकोमानसो यज्ञो न्यासिनांतु विशेषतः । वनस्थस्याक्रतुर्यज्ञः क्रत्वादिर्गृहिणोऽखिलः । शुश्रूषाद्यात्मकोयज्ञो विहितोब्रह्मचारिणः । विद्याभयादिदानंच सर्वेषामपि**

संमतम् । गृहिणोवित्तदानंतु वनस्थस्यान्नपूर्वकम् । सर्वैः कार्यं तपोघोरमिति सर्वेऽत्रकर्मिणइति । शूद्राणामपि विष्णुनामस्वाध्यायः । सत्योपवासादि च सर्वेषां तपश्चास्ति ॥ ५ ॥

पूर्वी सांगितलेला त्याग तीन प्रकारचा असल्यामुळें, आपल्या मनांत त्यांतला कोणता त्याग निश्चित आहे, हें अर्जुनास समजणार नाहीं ह्मणून सांगतात:—यज्ञदानतपश्चर्यादिकांच्या फळाची इच्छा सोडून; तीं अवश्य करणें, हेंच योग्य आहे; स्वरूपतः कर्मांचा त्याग करूं नये. यज्ञादिकांचा त्याग न करण्याचें कारण असें कीं, तीं यज्ञ, दान व तपें ज्ञानी जनांचें अंतःकरण शुद्ध होण्यास कारण आहेत; द्रव्ययज्ञ, विद्यादान, सत्यवचन इत्यादिक तपश्चरणें हीं गृहस्थ, ब्रह्मचारी, वानप्रस्थ व संन्यासी, या चारही आश्रमांतील लोकांना योग्यच आहेत. वर्णबाह्यांस विष्णुनामस्मरण हा यज्ञ, सुवर्ण दान देणें, खरें बोलणें, आणि उपवासादि ( व्रतें ) करणें ही तपश्चर्या योग्य आहे. वाचिक आणि मानसिक यज्ञ हे संन्याशांस उक्त होत; वानप्रस्थांस अक्रतुयज्ञ उक्त होय; गृहस्थांस क्रत्वादि सर्व यज्ञ उक्त होत; आणि ब्रह्मचाऱ्यांस गुरूची सेवा करणें हा यज्ञ उक्त होय. विद्यादान, अभयदान, सत्यवचन, उपवासादिक हीं, सर्व वर्णांनीं आणि सर्व आश्रमस्थांनीं आचरावयाचींच आहेत; गृहस्थांनीं द्रव्यदानपूर्वक यज्ञ करावे; वानप्रस्थांनीं अन्नदानपूर्वक यज्ञ करावे; असें आहे. यावरून, आपापल्यास योग्य अशा विधीनें सर्वांनीं हीं ( कर्में ) आचरण केलींच पाहिजेत. ॥ ५ ॥

**एतान्यपि तु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा फलानि च ॥**
**कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥ ६ ॥**

ननु केवलकाम्यानां फलानपेक्षयाकरणे फलांतराभावात्प्रयासएवस्यादित्यत आह । एतान्यपीति । तमेवंवेदानुवचनेन ब्राह्मणाविविदिषंति । यज्ञेन दानेन तपसा नाशकेनेति श्रुतेः कर्तृत्वं संगं परित्यज्य निष्कामतयानुष्ठितानां कर्मणां ज्ञानार्थत्वाज्ज्ञानिभिरनुष्ठितानामानंदातिशयार्थत्वान्न प्रयासइतिभावः ॥ ६ ॥

पण फळाची इच्छा सोडून, केवळ काम्यकर्मेंच केलीं तर, त्या कर्मांना

दुसरें कांहीं फळ नसल्यामुळें, हा केवळ महत्प्रयास होय याविषयीं सांगतातः— हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, यज्ञादिक कर्मे हीं अंतःकरणशुद्धीस कारण असल्यामुळें, तीं करावीं असें मी सांगितलें; तीं कर्मे, मी कारितों हा कर्तृत्वाभिमान सोडून, फळाची इच्छा न करितां करावीं, असा माझा सिद्धांत आहे. सकाम कर्मे असंग होऊन केलीं तर, तीं अंतःकरणशुद्धीस कारण होतात. ज्ञान्यांनीं निष्काम कर्मे केल्यानें, मुक्तींत त्यांस आनंदाभिवृद्धि होत असल्याकारणानें, तीं करण्यास कांहींच प्रयास नाहीं, हें तात्पर्य. ॥ ६ ॥

**नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ॥**
**मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥ ७ ॥**

कर्मस्वरूपत्यागो न युक्तइति प्रतिपादयंस्तामसादिभेदेन त्यागत्रैविध्यं दर्शयति । नियतस्येत्यादिना । नियतस्य वर्णाश्रमविहितस्य कर्मणः संन्यासस्त्यागो न युज्यते । स्व यज्ञादीन्परित्यज्य निरयं यात्यसंशयमिति प्रत्यवायस्मरणात् । तदनादरेण क्रियमाणस्तस्य कर्मणः परित्यागः संगफलत्यागं विना स्वरूपत्यागः कार्यइति मिथ्याज्ञानाख्यान्मोहाच्चेत्तदातामसः परिकीर्तितः ॥ ७ ॥

स्वरूपतः कर्मांचा त्याग करूं नये असें प्रतिपादन करणारे भगवान् **श्रीकृष्ण**, तामसादि भेदानें त्याग तीन प्रकारचा आहे असें सांगतातः— श्रुतिस्मृतींनीं नेमून दिलेलीं अशीं वर्णाश्रमोचित यज्ञयागादिक कर्मे सोडूं नयेत; कारण, आपापल्या वर्णाश्रमास उचित अशा यज्ञयागादिक कर्मांचा त्याग करणारास नरकप्राप्तिरूप प्रत्यवाय सांगितला आहे. त्यावर लक्ष न देतां, अज्ञानानें सर्व कर्मांचा त्याग केला तर, त्या त्यागास तामस त्याग असें ह्मणतात. ॥ ७ ॥

**दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् ॥**
**स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ॥ ८ ॥**

मोहं विना दृष्टदुःखमित्येव देहप्रयासभयाच्च कर्मत्यजेदिति यत्सत्यागोराजसः तं राजसं त्यागं कृत्वा कर्ता नैव त्यागफलं मोक्षं

लभेत् । दुःखं तु मानसं ज्ञेयमायासोबाह्य उच्यते । विशेषस्य विव-क्षायामन्यथा सर्वमेवत्विातिवचनाद्दुःखात्पृथक्कायक्लेशोऽवगंतव्यः ॥ ८ ॥

कर्माचें ज्ञान असूनही, कर्म करणें हें मनास दुःख देणारें अथवा शरीरास आयास देणारें असें समजून, यज्ञादि कर्मांचा त्याग केला तर, त्यास राजस त्याग असें ह्मणतात व तीं टाकणारास त्यागाचें फळ मिळत नाहीं. ८

**कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ॥**
**सङ्गंत्यक्त्वा फलंचैव स त्यागः सात्विको मतः ॥९॥**

कार्यमित्येव नियतंकर्मसंगफलं त्यक्त्वा क्रियतइति यत्स त्यागः फलसंगत्यागरूपः सात्विकोमतः ॥ ९ ॥

हे अर्जुना, आपल्यास अवश्य करण्यास योग्य असें समजून, श्रुति-स्मृतींनी नेमून दिलेलीं यज्ञादिक कर्में, कर्तृत्वाचा अभिमान सोडून आणि फलाची इच्छा न धरितां करणें, हा सात्विक त्याग असून तो मला मान्य आहे. ॥ ९ ॥

**न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ॥**
**त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥ १० ॥**

पुनः सात्विकत्यागिनं विशिनष्टि । न द्वेष्टीति । अकुशलं दृष्ट-दुःखदं कर्म न द्वेष्टि कुशले चले कर्मफले नानुषज्जते मेधावी सम्य-ग्विष्णुतत्वविच्छिन्नसंशयः । भगवन्माहात्म्ये कर्मकरणे वा संशयरहितः सत्वसमाविष्टः सत्वगुणे च सम्यग्व्याप्तः त्यागी ब्रह्मणि सर्वकर्माणि त्यक्तवान् ज्ञानपूर्वकं कर्मकर्तव्यमेवेति बुद्ध्या फलानभिलाषेण क्लेशा-त्मकमपि विहितं कर्मकुर्वन् सात्विक त्यागीत्युक्तं भवति ॥ १० ॥

यास्तव सात्विक त्याग करण्याची प्रशंसा करितातः—सत्वगुणी मनुष्य, थंडीचे दिवसांत प्रातःस्नान करणें इत्यादिक देहास त्रासदायक व दुःखकारक असें ह्मणून कर्माचा द्वेष करीत नाहीं, पुण्याचें फल जें स्वर्गसुख त्याविषयीं आसक्त नसणारा, असें होण्यास कारण परमात्म्याचें स्वरूप योग्य रीतीनें जाणलेला, त्याच्या विचित्र माहात्म्याविषयीं संशय रहित झालेला, या दोन कारणांमुळें त्यास द्वेषराहित्य घडतें, हें तात्पर्य. ॥ १० ॥

**नहि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ॥**
**यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥ ११ ॥**

ननु सर्वकर्मत्यागोविहितकर्मत्यागोवाऽत्र त्यागशब्दार्थः कइत्यत्राह । नहीति । देहधारिणा सर्वकर्मणां त्यक्तुमशक्यत्वात् कोऽपि कर्मत्यागी न स्यात् शक्यत्यागेच विहितत्यागात् प्रत्यवायीस्यात् न त्यागी अतोयस्तु कर्मफलत्यागी सएवत्यागीत्युच्यते नान्यइत्यर्थः ११

पूर्वी सांगितल्याप्रमाणें त्याग शब्दाचा अर्थ सर्व कर्मफलत्याग असा होतो किंवा योग्य कर्मांचा त्याग असा होतो, याविषयीं सांगतातः–देहधारी प्राण्यांकडून, सर्व कर्मांचा परित्याग होणें ही गोष्ट असंभवनीय आहे; श्रुतिस्मृति इत्यादिकांत सांगितलेल्या विहित कर्मांचा त्याग केल्यानें दोष लागतो; यावरून जो मनुष्य योग्य कर्में करूनही त्यांच्या फलांची इच्छा आणि कर्तृत्वाभिमान सोडतो, त्यासच त्यागी–सात्विकयोगी–असें ह्मणतात. ह्मणून त्याग शब्दाचा अर्थ, सर्वकर्मपरित्याग अथवा विहितकर्मपरित्याग असा होत नसल्यामुळें त्याग ह्मणजे फलाची इच्छा न करणें, अथवा आपण अस्वतंत्र असल्यामुळें, स्वतंत्र असा परमात्मा आपल्याकडून, आपल्या योग्यतेप्रमाणें यज्ञादिक सत्कर्में करवितो असें समजून कर्तृत्वाभिमान सोडणें, हाच त्याग शब्दाचा अर्थ होय. ॥ ११ ॥

**अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् ॥**
**भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥१२॥**

फलसंगत्यागरूपं कर्मत्यागं स्तौति । अनिष्टमिति । अनिष्टं नरकादि अन्येषामिष्टं स्वर्गादि नतु त्यागिनामिष्टं त्यागित्वादेव । ज्ञानादेर्मोक्षभोग्याच्च नान्यत्स्यात्कर्मणः फलम् । त्यागिनस्तत्वसंवेत्तुरन्येषां तद्वतेफलमितिवचनात् । मिश्रं मानुषादि । इति त्रिविधं कर्मणां पुण्यापुण्यात्मकस्य फलं प्रेत्य देहान्निर्गत्य स्थितानामत्यागिनां भवति नतु क्वचिदपि संन्यासिनां त्रिविधं फलं भवति यद्यप्यत्रात्यागिप्रतियोगित्वेन त्यागिनामिति वक्तव्यम् । नच त्यागिन एव संन्यासिनः । परेच्छ-

थापि ये काम्यं कर्म कुर्युर्नतु क्वचित् । न्यासिनोनाम तेऽन्येभ्यः फलत्यागिभ्यउत्तमाइति वचनाद्भेदावगतेः । तथापि कर्मफलेच्छाभाव साम्यात्त्यागिनएव संन्यासिशब्देन गृह्यंते ॥ १२ ॥

ह्मणून फलत्यागरूप कर्मत्यागाची स्तुति करितातः—अनिष्ट असे नरकादिक, इष्ट असे स्वर्गादिक आणि मिश्र ( अनिष्ट व इष्ट ) मनुष्यदेहप्राप्ति अशीं तीन प्रकारची फळें, पाप, पुण्य व पुण्यमिश्र पाप या तीन प्रकारच्या कर्मांनीं फलत्याग न करणाऱ्यांस देहत्यागानंतर प्राप्त होतात; कर्मफलाचा त्याग करणाऱ्या संन्याशांस तीं ( फळें ) कधींही प्राप्त होत नाहींत. स्वार्थाकरितां काम्यकर्म न केलें तरी, परार्थाकरितां ह्मणून केवळ काम्यकर्मत्यागी तीं करितात. परंतु संन्यासी असताल ते परार्थाकरितांही काम्यकर्म करीत नाहींत. ह्मणून येथें अत्यागी विरुद्ध जो त्यागी त्यास होत नाहीं, असें ह्मणणें योग्य असून, संन्याशास होत नाहीं, असें ह्मणण्याचें कारण त्यागीही फलाची इच्छा न करणारे व संन्यासीही फलाची इच्छा न करणारे असल्यामुळें, त्यांचें इच्छाराहित्य हें साम्य जाणून संन्यास शब्द घेतला आहे. ॥ १२ ॥

**पञ्चैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ॥**
**सांख्ये कृतान्ते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ॥१३॥**

कर्मण्यभिमानत्यागोऽपि संन्यासइतिभावेन कर्मकारणान्याह । पंचेत्यादिना । सांख्ये कृतांते सम्यक् ज्ञानप्रतिपादके सिद्धांते शास्त्रे सर्वकर्मनिष्पत्तये पंचकारणान्युक्तानि जानीहि ॥ १३ ॥

कर्मांचा अभिमान सोडणें हाही संन्यास होय अशा अभिप्रायानें सांगतातः—हे आजानुबाहु अर्जुना, सर्व कर्मांच्या उत्पत्तीस हीं पांच कारणें मी सांगतों तीं ऐक; तीं कारणें यथार्थज्ञान उत्पन्न होण्यास कारण जे परमात्म्याचा अवतार कपिलमहामुनि त्यांनीं सांगितलेलें सांख्यशास्त्र त्यांत सांगितलीं आहेत. ॥ १३ ॥

**अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ॥**
**विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पञ्चमम् ॥१४॥**

अधिष्ठानं देहादि । कर्ता विष्णुः स्वतंत्रत्वात् । नानाप्रकारं करणामिंद्रियादि विविधा च परस्परं पृथग्भूता चेष्टा । करणानां तत्र व्यापारः हस्तादिक्रियादिभिः होमादि कर्माणि जायंते ध्यानादेरपि मानसीचेष्टा कारणं पूर्वतनचेष्टापि संस्कारकारणत्वेन भवति । दैवमदृष्टम् । देहोब्रह्मार्थेन्द्रियाद्याः क्रियाश्च तथादृष्टं पंचमंकर्महेतुरितिश्रुतेः। अथवा कर्तेति जीवउच्यते तस्यापि पराधीनकर्तृत्वभावात् दैवमिति प्रेरकः परमात्मा ॥ १४ ॥

देहभूम्यादिक पहिलें कारण; स्वतंत्रकर्ता परमात्मा हें दुसरें; नानाप्रकारच्या इंद्रियांच्या चेष्टा हें तिसरें; परस्पर भिन्न असे हात वगैरेनीं करावयाचे होमादिक व्यापार हें चवथें; आणि अदृष्ट ( दैव ) हें पांचवें कारण होय. अथवा कर्ता ह्मणजे परमेश्वरानें दिलेल्या स्वातंत्र्यानेंयुक्त जीव, कर्ता आणि दैव शब्दानें अदृष्टप्रेरक परमात्मा असा अर्थ होय. ॥ १४ ॥

**शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ॥**
**न्याय्यं वा विपरीतं वा पञ्चैते तस्य हेतवः ॥१५॥**

शरीरादिभिर्यत् न्यायोपेतमन्यायोपेतं वा कर्म नरः प्रारभते । तस्यैतेऽधिष्ठानादयः पंच हेतवः । ततश्च जीवस्यस्वातंत्र्याभावात् दैवमिति प्रेरकः परमात्मा ॥ १५ ॥

हे अर्जुना, मनुष्य शरीरानें, वाणीनें आणि मनानें योग्य किंवा अयोग्य असें कायिक, वाचिक आणि मानसिक असें तीन प्रकारचें कर्म आरंभितो, त्या कर्मास, हीं पूर्वीं सांगितलेलीं पांच कारणें ( हेतु ) असतात. १५

**तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ॥**
**पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥ १६ ॥**

अभिमानात्यागिनं निंदति । तत्रेति । तत्रकर्मणि एवंसति पंचानांकारणत्वेसति केवलं निष्क्रियमात्मानम्। एनं केवलमात्मानं निष्क्रियत्वाद्वदंतिहि इत्युक्तेः । कर्तारं स्वतंत्रं यः पश्यति असंस्कृतबुद्धित्वाद्दुर्मतिः स न पश्यति अज्ञानीत्यर्थः ॥ १६ ॥

कर्तृत्वाभिमान न सोडणाराची निंदा करितातः—अशा प्रकारें पूर्वी सांगितलेलीं हीं पांच कारणें कर्मास असतां, अस्वतंत्र असूनही जो मनुष्य आपणच कर्ता आहे असें समजतो, त्याच्या बुद्धीस शास्त्रोपदेशाचा संस्कार नसल्यानें, तो मूर्ख समजावा. हीं पांच कारणें कर्मास आहेत असें जो जाणतो, तो परमात्मा श्रीहरी स्वतंत्र कर्ता आहे असें समजतो. ॥ १६ ॥

**यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ॥**
**हत्वापि स इमांल्लोकान्न हन्ति न निबध्यते ॥ १७ ॥**

स्वात्मानमकर्तारं मन्यमानं स्तौति । यस्येति । यस्याहमिति एवं भूतोभावोऽभिप्रायोनास्ति । यस्य बुद्धिर्न लिप्यते । स इमान् लोकान् हत्वापि न हंति हन्मीति भावाभावान्नहंतीत्यतोरागाभावाच्च न निबध्यते । तथोक्तं । स्वातंत्रमीश्वरे वेत्ति नैवात्मनि कदाचन । ईश्वराधीनमेवात्मन् स्वातंत्र्यं तु जडान्प्रति । तारतम्येन लक्ष्म्यादे- र्जीवान्प्रति च सर्वशः । यस्तदर्थं समुत्पन्नो यथा रुद्रोयथा यमः । हत्वापि सइमांल्लोकान्न हंति न निबध्यते । अज्ञस्तदर्थं जातोऽपि बध्यते दैत्यवध्द्रुवं । अपरोक्षदृङ् न जातो य स्तदर्थं मुक्तिगं सुखं । न्हसेत्तस्य परोक्षज्ञः किंचिद्दोषेण लिप्यतइति यस्तुहन्मीति भावं करोति रागाच्च प्रवर्तते । सोऽहंतापि हंति इत्युच्यते लिप्यते च । उक्तंच । स्वातंत्र्यं मन्यमानस्य रागाद्धर्मं च कुर्वतः । तन्निमित्तस्तु दोषः स्याद्गुणश्च स्यात्स्वकर्मज इति ॥ १७ ॥

आपण अस्वतंत्र असें जाणून कर्तृत्वाभिमान सोडणाराची स्तुति करि- तातः—ज्या मनुष्याला, मी हें कर्म करितों असा अभिमान नाहीं व ज्याची बुद्धि फलेच्छेनें दूषित होत नाहीं, तो कर्मफलाची इच्छा सोडल्यामुळें, त्या पापानें बद्ध होत नाहीं. कर्मफलानें बंधप्राप्ति न होणें हें लोकसंहाराकरितां उत्पन्न झालेले व ज्यानां परमात्मा स्वतंत्र आहे असें ज्ञान असलेले जे रुद्र यमादिदेव त्यांसच आहे असें जाणावें. ईश्वर स्वतंत्र आहे असें जाणून, आपण अस्वतंत्र आहों असें जाणणें, आणि आपणास कर्म करण्यापुरतें थोडेसें जें स्वातंत्र्य आहे तें परमात्म्यानें दिलेलें असून, जडापेक्षां आपण थोडेसे जास्त स्वतंत्र आहों; आणि परमात्मा पूर्ण स्वतंत्र असून, चित्प्रकृति

लक्ष्मी त्याच्या स्वाधीन आहे, आणि ती ब्रह्मदेव, रुद्र इत्यादि जीवांपेक्षां अनंत अंशानें जास्त स्वतंत्र आहे. त्याचप्रमाणें ब्रह्मरुद्रादि सर्व जीवगण लक्ष्मीपेक्षां अनंत अंशानें कमी व स्वतंत्र आहेत तें स्वातंत्र्य त्यांना परमात्म्यानें दिलेलें आहे म्हणून, मुक्तींत आणि संसारांत, उच्चनीच तारतम्य हें ज्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें सदोदित आहे, असें समजावें. परमात्म्यानें यम आणि रुद्र हे देव, संहार करण्याकरितां उत्पन्न केले असून, त्यांच्याकडून तो कालरूपी संकर्षणमूर्ति श्रीहरी, संहार करवितो, याप्रमाणें ते यम व रुद्रदेव हे सदोदित निश्चयानें जाणत असून, आपल्या स्वातंत्र्याविषयींचा भ्रम त्यांनीं सोडल्यामुळें ते बद्ध होत नाहींत; अज्ञ मनुष्य हाही, परमात्म्यानें प्रेरणा केल्यामुळेंच लोक नाश वगैरे करितो, असें असलें तरी, मी स्वतंत्र आहे अशा भ्रमांत असल्यामुळें तो बद्ध होतो. अपरोक्षज्ञानी यास परमात्म्यानें संहार करण्यास उत्पन्न केलें नसून, तो तें कर्म करील तर, तो मुक्तींत गेल्यावर त्याच्या सुखाचा किंचित् ऱ्हास होईल. परोक्षज्ञान्यास परमात्म्यानें संहार करण्यास उत्पन्न केलें नसून, तो जर तें कर्तव्य करील तर, तो किंचित् दोषानें लिप्त होईल. मी स्वतंत्र आहें असें समजून स्नेहानें जो कर्म करितो, तो बद्ध होतो हें या म्हणण्याचें तात्पर्य होय. ॥ १७ ॥

## ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ॥
## करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८ ॥

यदि जीवो न कर्ता तर्हि तदुद्देशेन प्रवृत्तश्रौतस्मार्तविधिवैय्यर्थ्यप्रसंग इत्यत आह । ज्ञानमिति । ज्ञानंविधिविषयं । ज्ञेयंचेच्छाप्रयत्नलक्षणं । अधिष्ठानादिलक्षणं पुरुषार्थलक्षणं च परिज्ञातासर्वज्ञ ईश्वरः सर्वप्रेरक इतित्रिविधः कर्मविधिरितिनिमित्तनिमित्तिनोरभेदोपचारात् त्रिविधेत्युच्यते अयमाशयः । ना पराधिनकर्तृत्वं विधिविषयत्वे प्रयोजकं येन जीवं प्रति कर्मविधिवैय्यर्थ्यं स्यात् तथासति ईश्वरस्यापि विधिविषयत्वापातात् किंतु यस्य स्वसंबंधितया विधिज्ञानं कर्म तत्फलं चोद्दिश्येच्छा तदनुगुणश्च प्रयत्नोऽधिष्ठानादिसन्निधानं कर्मसंबंधः फलभाक्त्वंचास्ति तंप्रति कर्मविधयः प्रवर्तंते । अस्ति चेदं समस्तं

परमेश्वरप्रसादायत्तं जीवइति कथं तं प्रति न कर्मविधयः तत्प्रेरणादेवे-श्वरस्य स्वातंत्र्येऽपि विधिद्वारेणैव ज्ञानेच्छाप्रवृत्तिजनकत्वमवसीयते नचाज्ञानपूर्वानुष्ठाने फलमिति । अथवा दैवंचेति ईश्वरस्य कर्मसु प्रेरकत्वमुक्तं । तत्प्रेरणास्वरूपं निरूपयति । ज्ञानमिति । कर्मचोदना कर्मसुप्रेरणा ज्ञानंज्ञेयंपरिज्ञातेति त्रिविधा ज्ञान ज्ञेय ज्ञातृ स्वरूप भगवत्स्वरूपभूतेत्यर्थः । उक्तंच । संप्रेरयितुरीशस्य कर्मस्वखिलचेतनात् । ज्ञातृज्ञेयज्ञानरूपा प्रेरणा सा सएवतु । स्वरूपेणैव नित्या सा विशेषा-त्मतया भवेत् । विशेषोऽपि स्वरूपेण नित्यश्च स्याद्विशेषतः । स्वनिर्वा-हकता यस्मान्नानवस्था विशिष्टवदित्यादि । पूर्वोक्त कर्मकारणानि संक्षिप्याह । करणमिति । कर्मचेष्टा द्वितीयकर्मशब्देन तत्कारणानि लक्ष्यंते । संग्रहः पंचकारणानां संक्षेपः । अधिष्ठानस्य करणेऽतर्भावा-द्दैवशब्दोदितेश्वरस्यैव मुख्यकर्तृत्वात्स्वतंत्रास्वतंत्रकर्त्रोः कर्तृशब्देनोक्तेः कर्मकारणानां त्रैविद्ध्यमित्यर्थः ॥ १८ ॥

जीवास स्वतंत्रतेनें कर्तृत्व नाहींच, असें होईल तर, केवळ जीवा-करितांच प्रवृत्त झालेले विधिनिषेधात्मक श्रौतस्मार्तविधि व्यर्थ होण्याचा प्रसंग येईल, ह्मणून, त्याविषयीं सांगतातः—ज्ञान ह्मणजे कर्मविधिविषयक, ज्ञेय ह्मणजे कर्मफळ पुरुषार्थरूप अथवा इच्छा—प्रयत्न—लक्षण, आणि ज्ञाता ह्मणजे सर्वज्ञ सर्वप्रेरक ईश्वर होय; याप्रमाणें ज्ञान, ज्ञेय, आणि ज्ञाता, या भेदानें कर्मविधि तीन प्रकारचा आहे. निमित्त आणि निमित्ति यांस अभेदोपचारानें त्रिविधा असें सांगितलें आहे. कर्ता जीव हा अस्वतंत्र असल्यामुळें, विधि-निषेधरूप शास्त्रास विषय होत नाहीं, असें नाहीं. तसें असतें तर, जीव हा अस्वतंत्र असल्यामुळें, कर्मविधीस वैय्यर्थ्य प्राप्त होत होतें, ह्मणजे स्वातंत्र्य हें विधिनिषेधात्मक शास्त्रास प्रयोजक नाहीं, असा याचा अभिप्राय होय. जर त्याला स्वातंत्र्याचेंच प्रयोजन असतें तर ईश्वर हा स्वतंत्र असल्यामुळें त्यासही विधिनिषेध आहे असें ह्मणणें भाग पडेल. पण तसें संभवत नाहीं. " अदुःखमितरत्सर्वंजीवाएव तु दुःखिनः । तेषां दुःखप्रहाणाय श्रुतिरेषा प्रवर्तते । " यावरून जीवांला दुःखापासून मुक्त करण्याकरितांच श्रुतिगण प्रवर्तलेले असतात. ज्याला हें कर्म आपणास करणें योग्य आहे, असें विधि-

ज्ञान आहे व कर्म आहे आणि त्या कर्मफलाची इच्छाही आहे व त्याला अनुसरून प्रयत्न आहे; पण अधिष्ठान व सन्निधान कर्मसंबंध व कर्मफल उपभोग करण्याचा अधिकार हे इतके धर्म कुठें असतात. त्याच्या उद्देशानें कर्मविधि प्रवृत्त होतात. हे सर्व धर्म जीवांस ईश्वरांनीं दिले आहेत मग विधिनिषेध शास्त्रास जीव कसा विषय होणार नाहीं? परमात्मा सर्व जीवांला कर्म करण्याविषयीं प्रवृत्ति करविण्यास स्वतंत्र जरी आहे, तथापि आपल्या सत्यसंकल्पानुसार विधिनिषेधात्मक शास्त्रद्वारांच कर्मज्ञान, इच्छा व प्रवृत्ति उत्पन्न करितो. यावरून अज्ञानानें कर्मानुष्ठान केलें असतां, त्या कर्माचें फल मिळत नाहीं हें निश्चित आहे; अथवा ईश्वर कर्माचा प्रवर्तक आहे असें ह्मणून त्याच्या प्रेरणेचीं स्वरूपें सांगतात:—परमात्म्याकडून कर्मादिकांत जीवांस जी प्रेरणा होते, ती ज्ञान, ज्ञेय आणि ज्ञातृस्वभावानें तीन प्रकारची आहे. याप्रमाणें परमात्मा हा, ज्ञानादि तीन स्वरूपांनीं असतो; यावरून त्या परमात्म्याहून अभिन्न अशीं जीवांना प्रेरणा करणारीं ज्ञानादि तीन स्वरूपें अवश्य जाणलीं पाहिजेत. पूर्वोक्त कर्म करणें संक्षेपानें सांगतात:—कर्मविषयक व्यापार, कर्म व कर्ता, याप्रमाणें जीवप्रेरक कर्मविधि तीन प्रकारचा जाणावा; हा पूर्वीं सांगितलेल्या पांच कारणांचा संक्षेप होय. अधिष्ठान, भूमि आणि देहादिक हे करण शब्दांत अंतर्भूत आहेत. त्याचप्रमाणें स्वतंत्र कर्ता ईश्वर आणि अस्वतंत्र कर्ता जीव असें याठिकाणीं कर्तृ शब्दानें सांगितले आहेत. पूर्वीं कर्मकारणें पांच सांगून याठिकाणीं तीन सांगितलीं आहेत, परंतु त्यांत विरोध नाहीं असें जाणावें. ॥ १८ ॥

## ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः ॥
## प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥ १९ ॥

**सात्विकज्ञानादिसाधनानुष्ठानाय प्रतिज्ञापूर्वकं पुनर्गुणभेदानाह । ज्ञानमित्यादिना । गुणाः संख्यायंतेऽस्मिन्निति गुणसंख्यानं तस्मिन्सांख्यशास्त्रे ॥ १९ ॥**

सात्विकज्ञानादि साधनानुष्ठान प्रतिज्ञापूर्वक पुनः गुणभेद सांगतात:—गुणांची गणना ज्यांत सांगितली आहे, अशा सांख्यशास्त्रांत, ज्ञान, कर्म

आणि कर्ता हे, सत्वादिगुणभेदानें तीन प्रकारचे सांगितले आहेत; ते तीनही प्रकार ज्ञान, कर्म, व कर्ता; हे मी तुला सविस्तर सांगतों ऐक. ॥ १९ ॥

**सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ॥**
**अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ॥२०॥**

आदौ प्रतिज्ञातं ज्ञानत्रैविध्यमाह। सर्वभूतेष्वित्यादिना। भवंति सर्वदाविद्यंतइति भूतानि जीवाः भवंत्युत्पद्यंतइतिव्युत्पत्त्या जडानिच विभक्तेषु जडेश्वराभ्यां जीवेश्वराभ्यां परस्परं च यथायोग्यं भिन्नेषु यथा तारतम्यविभागवत्सुखदुःखविकारादिनाशवत्सु च सर्वभूतेषु जीवेषु जडेषु अविभक्तं परस्परं भेदशून्यं तारतम्यलक्षविभागरहितं च भूतेषु इत्यधिकरणनिर्देशादेव जीवजडाभ्यां भेदः सिद्धः। अव्ययं दुःखविकारादिनाशरहितं एकं सर्वोत्तमं भावं विष्णुं येन ज्ञानेन ईक्षते तज्ज्ञानं सात्विकं विद्धि ॥ २० ॥

प्रथमतः ज्ञानाचे तीन प्रकार सांगतातः-प्रकृत्यादि जड व ईश्वर यांपासून व परस्पर भिन्न भिन्न, परस्पर तारतम्ययुक्त, नित्य व दुःखसंबंध असलेले असे जे मुक्त व अमुक्त जीवगण त्याप्रमाणें जीव व ईश्वर यांपासून भिन्न व नाश पावणारे असे जड अशा जडजीवांचेठायीं प्रेरणा करण्याकरितां असलेलीं परमात्म्याचीं प्रेरकरूपें, अंतर्यामिरूपें तीं परस्पर भेद व तारतम्य यांनीं रहित आहेत. दुःख व विकारादि दोषरहित आहेत असें ज्या ज्ञानानें जाणतो तें ज्ञान सात्विक होय. "भूतेषु" या सप्तमीचा अर्थ अधिकरण घेतल्यामुळें "कुंडे बदराणि" या वाक्याप्रमाणें, ह्मणजे कुंडपात्रांत घातलेलीं बोरें, जशीं पात्रापासून भिन्नच असतात, तद्वत् सर्व जीवजडांचेठायीं अंतर्यामीं असलेला परमात्मा श्रीनारायण हा, जीवादि जगापासून निरतिशय भेदयुक्तच आहे. ॥ २० ॥

**पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान् ॥**
**वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् ॥ २१ ॥**

यत्तु ज्ञानं सर्वेषु भूतेषु पृथक्त्वेन तु शब्दोऽवधारणे सर्वभूतगमीश्वरं पृथक्त्वेन सर्वोत्तमत्त्वेन नच विषयीकुर्वन् सर्वभूतपृथक्त्वमात्र-

विषयमित्यर्थः । एतदेवव्याचष्टे । नानाभावानिति । तत्सर्वभूत पृथक्त्वमात्रविषयं ज्ञानं राजसं ॥ २१ ॥

जें ज्ञान सर्व जीवांचे ठायीं, भेदानें परमात्मा सर्वोत्तमत्वादि गुणविशिष्ट आहे असें जाणवीत नाहीं व इतर पदार्थांस भेद दाखवितें आणि भिन्न असे नानाप्रकारचे पदार्थ विषयी करितें तें ज्ञान राजस असें समज. ॥ २१ ॥

**यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकम् ॥**
**अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥**

यत्तु ज्ञानमेकस्मिन् कृत्स्नवत् सक्तं एकमेव वस्तु सर्ववस्त्वात्मना विषयी करोति । मुक्तत्वादिरूपेण करणीयत्वात्कार्याख्योजीवस्तस्मिन्कृत्स्नं परिपूर्णं ब्रह्म तस्मिन्निव सक्तं जीवएव ब्रह्मेति गोचरयति । तथा जीवे कृत्स्नजगद्भूतसक्तं जीवोऽखिलंजगदिति तथैकस्मिन्कार्ये कृत्स्नवत्सक्तं एकजीवज्ञानात्कृत्स्नमपिज्ञातमिति । अहैतुकं वेदानुकूलयुक्तिराहितम् । अतत्वार्थवत् यथास्थिताकाराद्विपरीताकारगोचरम् । अल्पमीषत्समीचीनम् । भ्रांतेरधिष्ठानादि विषय ज्ञानत्वस्यापि सत्वात् तत्तादृशं ज्ञानं पृथक् पृथक् जातं तामसमुदाहृतम् । तत्तद्विषययोगे च तामसराजसत्वं तामसतामसत्वं च द्रष्टव्यम् । तदुक्तम् । अस्तित्वाद्भूतनामभ्यः सर्वजीवेभ्य एव यत् । मुक्तेभ्योऽपि पृथक्त्वेन विष्णोः सर्वत्रगस्य च । ऐक्येन च स्वरूपाणां प्रादुर्भावादिकात्मनाम् । तारतम्येन जीवानां भेदेनैव परस्परम् । जडेभ्यश्चैव जीवानां जडानांच परस्परम् । तेभ्योविष्णोश्च सम्यक्त्वलक्षणज्ञानपूर्वकम् । ज्ञानं सात्विकमुद्दिष्टं यत्साक्षान्मुक्तिकारणम् । विष्णोरन्यस्ययाथार्थ्यज्ञानं राजसमुच्यते । यदि विष्णुं न जानाति यदिवा मिश्रतत्त्ववित् । अन्यथाकरणीयत्वात्कार्याख्यं जीवमेव यः । अकार्यं ब्रह्म जानाति सएवाखिलमित्यपि । एकजीवपरिज्ञानात्कृत्स्नज्ञोऽस्मीति मन्यते । युक्तिविज्ञानराहित्यात्स्वपक्षस्याप्ययुक्तितः । अयुक्तितामेव गुणं मन्यमानोऽल्पदर्शनः । अतत्त्वार्थे जगद्ब्रूते तत्त्वार्थज्ञानवर्जनात् । समुख्यस्तामसज्ञानी ह्येकैकेनापि किं पुनः । सर्वैरेतैर्विशेषैश्च युक्तः पापतमोऽधिकइति ॥ २२ ॥

जें ज्ञान कोणत्याही एका वस्तूंत सर्वात्मकत्व दाखवितें ह्मणजे एकच वस्तु सर्व वस्तुभूत आहे असें दाखवितें, जननमरणरूप संसारांत असलेले जीव मुक्त करतां येतात ह्मणून कार्यनामक अशा जीवांचेठायीं, संसारबंधरहित, नित्यमुक्त, सद्गुणपूरित, परब्रह्मच आहे अशाविषयीं आसक्ति उत्पन्न करितें, ह्मणजे जीव हेंच ब्रह्म आहे असें दाखवितें; त्याचप्रमाणें सर्व जग हें जीवच आहे असें दाखवितें, एका जीवज्ञानानें हें सर्व जगज्ज्ञान होतें असें दाखवितें; अशा "सोहं ब्रह्मास्मि०" इत्यादिक वेदानुकूल—युक्तिरहित, अविद्यमान, सदसद्वैलक्षण्य, अनिर्वचनीयत्वादि विषय दाखविणारें, अधिष्ठानरूप, अल्प यथार्थ ज्ञानयुक्त, असें जें ज्ञान, तें तामस होय असें ज्ञानी लोक सांगतात. या एकेकानेंही युक्त असलेलें जें ज्ञान, तेंही तामस होतें, मग तें सर्व विशेषणांनींयुक्त असें असेल तर तें महातामस असें समजून, त्याचा आश्रय करणारे लोकही महातामसी होत, हें तात्पर्य. ॥ २२ ॥

## नियतं सङ्गरहितमरागद्वेषतः कृतम् ॥
## अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्विकमुच्यते ॥ २३ ॥

गुणभेदेन कर्मत्रैविध्यमाह । नियतमित्यादिना । विष्णोः सर्वोत्तमत्वज्ञानपूर्वकं तद्भक्त्या तदर्पणबुद्ध्या क्रियमाणं स्ववर्णाश्रमोचितं कर्म नियतं कर्तृत्वसंगरहितं कीर्त्यादौ रागादकीर्त्यादौ द्वेषाच्च न कृतं दंभेनाकृतमित्यर्थः फलाकांक्षाराहित्येन कर्तव्यमित्येवकृतं यत्कर्म तत्सात्विकमुच्यते ॥ २३ ॥

गुणभेदानें तीन प्रकारचें कर्म सांगतातः—विष्णु हा सर्वोत्तम आहे असें ज्ञान असून, हरिभक्तीनें—कृष्णार्पण करण्याच्या हेतूनें—आपल्या वर्णाश्रमास योग्य असें, आसक्ति न ठेवितां, रागद्वेषादिकांचा त्याग करून, स्वभावतःच करावयाचें जें निष्काम कर्म, त्यास सात्विक असें ह्मणतात. ॥ २३ ॥

## यत्तु कामेप्सुना कर्म साहङ्कारेण वा पुनः ॥
## क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥ २४ ॥

यत्तु फलप्रेप्सुना कर्तृत्वाभिमानयुक्तेन बहुलायासयुक्तं यत्कर्म क्रियते तद्राजसं फलाल्पत्वादायासबाहुल्यम् ॥ २४ ॥

जें कर्म फलप्राप्तीच्या इच्छेनें, माझ्यासारखा कोणीही दुसरा श्रोत्रिय नाहीं असा अभिमान धरून, ज्याचें फल अल्प व जें करण्यास आयास फार पडतात, तें राजस समजावें. ॥ २४ ॥

**अनुबन्धं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषम् ॥**
**मोहादारभ्यते कर्म तत्तामसमुदाहृतम् ॥ २५ ॥**

अनुबंधं कर्मानंतरं अनुबध्यमानं शुभाशुभं क्षयमर्थनाशं हिंसां परपीडां पौरुषं आत्मनः कर्मसामर्थ्यमनपेक्ष्याविमृश्यमोहादहंकर्तेति मिथ्याज्ञानाद्यत्कर्मारभ्यते तत्तामसमुच्यते ॥ २५ ॥

पुढें मिळणारें शुभाशुभ फल, द्रव्याचा नाश, परपीडा, आणि आपलें सामर्थ्य, यांकडे न पहातां, अज्ञानामुळें ‘ मी कर्ता ’ असा दुराग्रह धरून, जें कर्म करितात, तें तामस असें जाणावें. ॥ २५ ॥

**मुक्तसङ्गोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः ॥**
**सिध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्विक उच्यते ॥२६॥**

गुणभेदतः कर्तुस्त्रैविध्यमाह । मुक्तसंगइत्यादिना । मुक्तसंगः फलसंगरहितः अनहंवादी सर्वस्य भगवदधीनत्वनिश्चयादेव कर्तृत्वाभिमानरहितः धृतिरारब्धे कर्मण्यवर्जनीयदुःखधारणा। उत्साहउद्युक्तचेतस्त्वं ताभ्यां समन्वितः फलस्य सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः हर्षविषादशून्यः सकर्ता सात्विकउच्यते ॥ २६ ॥

गुणभेदानें तीन प्रकारचे कर्ते सांगतातः—फलाच्या आसक्तीनें रहित, परमात्माच कर्ता आहे असें समजून मी अस्वतंत्र आहें असें समजणारा, धैर्ययुक्त आणि ज्याचें मन आनंदित आहे असा, आरंभ केलेलें कर्म पुरें होवो अथवा अपुरें राहो, त्याविषयीं हर्ष किंवा शोक न मानणारा, असा जो त्यास सात्विक असें ह्मणतात. ॥ २६ ॥

**रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः ॥**
**हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥ २७ ॥**

रागी कीर्त्यादिकामः कर्मफलप्रेप्सुः उद्दिष्टकार्यफलार्थी । लुब्धः कर्मापेक्षितद्रव्यव्ययस्वभावरहितः हिंसात्मकः परार्हितः अशुचिः कार्यसिद्ध्यसिद्ध्योर्हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥२७॥

ज्याला कीर्तीची वगैरे इच्छा आहे असा, कर्मफलाची इच्छा करणारा, याग इत्यादि उचित कर्मांत द्रव्य न खर्चणारा, परहिंसा करण्यांत ज्याचें मन रत झालेलें आहे असा, चांगले आचार न पाळणारा, लाभालाभानें हर्ष शोक मानणारा, असा जो कर्ता त्यास राजस कर्ता असें ह्मणतात. ॥ २७ ॥

**अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः ॥**
**विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ॥ २८ ॥**

अयुक्तो भगवदर्पणादियोगरहितः । प्रकृष्टो न कृतः प्राकृतः । भगवद्भक्तिसामर्थ्यात्प्रकृष्टो न कृतोहि यः । स प्राकृतोदीर्घसूत्री पश्चात्कुर्यामिति स्मरन् इतिवचनात् । स्तब्धः आत्मसंभावनया क्वापि अनम्रः शठोगूढद्वेषेण कर्मकारी । नैष्कृतिको नीचकर्मकारी । अलसः प्राप्तकालेकर्मण्युदासीनः विषादी अवसादनशीलः । प्राप्तेपि कर्मकाले पश्चात्कुर्यामितिचिंतयन् दीर्घसूत्री । परेण यः कृतोदोषोदीर्घकालगतोऽपिवा । यस्तस्य सूचकोदोषादीर्घसूत्री स उच्यते इत्यभिधानादेतादृशोवा । एतादृशः कर्ता तामसउच्यते । अत्रदोषतारतम्यात्तामसकर्तुस्त्रैविद्ध्यं बोद्धव्यम् । उक्तंच । अलसोदीर्घसूत्री च सत्वयुक् तामसोमतः । अयुक्तोराजसः स्तब्धः प्राकृतोनैष्कृतः शठः । एकैकेनैव दोषेण प्रोक्तस्तामसतामसः । दुर्नरत्वं च तिर्यक्त्वं तमश्चैतत्फलंक्रमादिति ॥ २८ ॥

भगवदर्पणादि योगरहित, अविचारी, गुरूच्याठायीं नम्र नसणारा, ( दांडगा ) गूढद्वेषी, नीचकर्म करणारा, सत्कर्मांत आसक्ति नसलेला, सर्वदा शोक करणारा ( रड्या ), सत्कर्म करण्यास उशीर लावणारा, या प्रकारचा जो कर्ता, त्यास तामस असें ह्मणतात. यांत, आळशी व दीर्घसूत्री असलेलें सात्विकतामस; अयोग्यकर्तें राजसतामस समजावे; उदासीन, प्राकृत कपटी आणि द्वेषी, हे अति तामसी व स्तब्धत्वादि सर्व गुणांनीयुक्त असलेले ते

महातामसी, असें समजावें. सात्विकतामस कर्म करणारांस दुष्ट कुळांत जन्म प्राप्त होतो; राजसतामस कर्म करणारांस, पश्वादिकांचा जन्म प्राप्त होतो; अतितामस कर्म करणारांस भूतादि योनी प्राप्त होते; आणि ज्यांत हे सर्व गुण मिश्र असतात. त्यांस दुसरें साधारण अवांतर फळ मिळतें. तामसांत जे अतिश्रेष्ठ त्यास मोठें फळ ह्मणजे अंधतमाची प्राप्ति होते. ॥ २८ ॥

**बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणत स्त्रिविधं शृणु ॥**
**प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनञ्जय ॥ २९ ॥**

**इदानीं बुद्धेर्धृतेश्च गुणतस्त्रैविध्यं प्रतिजानीते। बुद्धेरिति ॥२९॥**

प्रस्तुत गुणभेदानें तीन प्रकारच्या बुद्धी, आणि तीन प्रकारच्या धृति सांगतातः—हे **अर्जुना**, संपूर्णपणें सांगावयाचे ते निरनिराळ्या प्रकारानें, सात्विकादि गुणभेदानें तीन प्रकारचे बुद्धीचे आणि धैर्याचे भेद सांगतों; ऐक. ॥ २९ ॥

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये ॥**
**बन्धं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी ३०**

**तत्र बुद्धेर्भेदमाह । प्रवृत्तिमित्यादिना । प्रवृत्तिनिवृत्तिलक्षणं धर्मं च कर्तव्यमकर्तव्यं च । तन्निमित्ते भयाभये । बंधमोक्षप्रकारौ च यथावद्याबुद्धिर्वेत्ति । स्वातंत्र्य विवक्षयावेत्ति इत्युक्तं । सा बुद्धिः सात्विकी ॥ ३० ॥**

आतां बुद्धीचे भेद सांगतातः—हे **अर्जुना**, धर्माची उत्सुकता, अधर्मापासून निवृत्त होणें, कार्याकार्य विचार, तन्निमित्तक भयाभय, त्या प्रमाणेंच बंध व मोक्ष, हीं ज्या बुद्धीनें समजतात, ती सात्विकी बुद्धी होय. ॥ ३० ॥

**यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च ॥**
**अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥३१॥**

**यया धर्मादिकमयथावत्प्रजानाति यथावन्नवेत्ति सा यथार्थनियमरहिता बुद्धिः राजसी । अन्यथा राजस्यास्तामस्याभेदाभाव**

प्रसंगात् । उक्तंच । किंचिद्यथावद्धर्मादीनयथावच्च पश्यति । यया बुद्ध्या राजसी सा मिथ्यादृक्चैव तामसीति ॥ ३१ ॥

हे अर्जुना, जिच्या योगानें, धर्म व अधर्म, कार्य व अकार्य हें बरोबर जाणलें जात नाहीं व जी यथार्थ नाहीं, ती बुद्धि राजसी समजावी. ॥३१॥

**अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसा वृता ॥**
**सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥ ३२ ॥**

चतुर्थपादेनाधर्मंधर्ममितिश्लोकोव्याख्यातः । तमसावृता अज्ञानेनाभिभूता । एवमंतःकरणवृत्तिविशेषस्य बुद्धेस्त्रैविद्ध्यं उक्तं तेन मनआदीनामपि त्रैविद्ध्यमुक्तप्रायमेव ॥ ३२ ॥

हे अर्जुना, अज्ञानानें आवृत्त झालेली बुद्धि, अधर्मास धर्म असें मानिते व सर्व कर्मांचें विपरीत रीतीनें ग्रहण करिते, ती तामसी बुद्धि जाणावी; सत्वादि गुणभेदानें बुद्धीचे भेद सांगितल्यानें मनाचेही भेद सांगितल्यासारखें झालें. ॥ ३२ ॥

**धृत्या यया धारयते मनःप्राणेन्द्रियक्रियाः ॥**
**योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ३३**

इदानीं धृतेस्त्रैविद्ध्यमाह । धृत्येत्यादिना । योगेन विष्णुभक्तियोगेन युक्तया वैष्णवोभक्तियोगोयस्तद्युक्तासात्विकीधृतिरित्युक्तेः । अव्यभिचारिण्या विहितविषयया यया धृत्या मनसः प्राणेंद्रियाणां च क्रियाः धारयते सा धृतिः सात्विकी ॥ ३३ ॥

आतां धृतीचे भेद सांगतातः—हे अर्जुना, विष्णूभक्तीनेंयुक्त आणि नियमानें विहितविषयक अशा ज्या धृतीनें, मन, प्राण व इंद्रियें यांच्या वृत्ति धारण केल्या जातात त्या धृतीस सात्विकधृति ह्मणतात. ॥ ३३ ॥

**यया तु धर्मकामार्थान्धृत्या धारयतेऽर्जुन ॥**
**प्रसङ्गेन फलाकांक्षी धृतिः सा पार्थ राजसी ॥ ३४ ॥**

धर्मादिफलाकांक्षी प्रकृष्टसंगेन धर्मार्थकामसाधनभूतमनआदीनां क्रियाः धारयते सा धृतिः राजसी ॥ ३४ ॥

हे अर्जुना, जी धृति प्रसंगानुसार धर्म, अर्थ, काम यांचेठिकाणीं अत्यंत आसक्त होऊन, त्यांच्या फळांच्या इच्छेमुळें, तेंच मुख्य असा आग्रह उत्पन्न करिते, ती धृति राजसी समजावी. ॥ ३४ ॥

**यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च ॥**
**न विमुञ्चति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ॥ ३५ ॥**

दुर्मेधा दुष्टबुद्धिः पुरुषः स्वप्नाद्युपलक्षितं सर्वं निषिद्धं यया धृत्या न विमुंचति धारयते सा धृतिस्तामसी । तदुक्तम् । तत्तत्सात्त्विकमेवस्याद्यद्यद्वृद्धाः प्रचक्षते । निंदंति तामसंयत्तद्राजसं तदुपेक्षितमिति३५

हे अर्जुना, दुष्टबुद्धि पुरुष ज्या धृतीच्या योगानें स्वप्न, भय, शोक, खेद, अभिमान हीं सोडित नाहीं, ती धृति तामसी होय. ज्ञानवृद्धांनीं सेविलेली हरिभक्त्यादिक सात्विक तद्विषयक धृति ही सात्विकधृति, त्यांनीं उपेक्षा केलेली राजस तद्विषयक धृति राजसधृति, आणि त्यांनीं निंदा केलेली हरिद्वेषादिक तामस तद्विषयक धृति ही तामसधृति, असें समजावें. ॥ ३५ ॥

**सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ ॥**
**अभ्यासाद्रमते यत्र दुःखान्तं च निगच्छति ॥ ३६ ॥**

प्रतिज्ञापूर्वकं गुणतः सुखस्य त्रैविध्यमाह सुखंत्वित्यादिना । यत्र यस्मिन् सुखे चिरकालमभ्यासात्क्रमेण रमते निरतिशयां रतिं प्राप्नोति । यतोदुःखस्यांतं नाशं नितरां गच्छति ॥ ३६ ॥

आतां प्रतिज्ञापूर्वक सत्वादि गुणभेदानें तीन प्रकारचें सुख सांगतातः— हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, आतां सात्विकादि भेदानें तीन प्रकारचें सुख मजकडून ऐकून घे; ज्याचेठायीं निरंतर अभ्यासानें चित्त रममाण होतें, व ज्याचे योगानें दुःखाचा नाश होतो. ॥ ३६ ॥

**यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ॥**
**तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥ ३७ ॥**

तदेवविशिष्यते । यत्तदिति । यत्तत्सुखं अग्रे पूर्वं विषमिव बन्हायाससाध्यत्वात् परिणामे विपाके अमृतसदृशं आत्मनोविष्णोः प्रसा-

द्वादनुग्रहाद्बुद्धेर्मनसः प्रसादात् स्वतोपिभाग्यो विषयागतिलक्षणाच्च जातं विष्णोःप्रसादात्स्वमनःप्रसादात्सात्विकं सुखमित्युक्तेः ॥ ३७ ॥

त्याचें स्पष्टीकरण करितात:–तें सुख कोणत्या प्रकारचें ह्मणशील तर, मनोनिग्रह इत्यादि फार कष्टानें साध्य होत असल्यामुळें, तें प्रथमतः विषाप्रमाणें दुःखप्रद आहे असें वाटतें, परंतु तेंच परिणामीं, निरंतर अभ्यास केल्यानें परमात्मविषयक होऊन, अमृतासारखें सुखप्रद होतें. परमात्म्याच्या प्रसादानें मन प्रसन्न होऊन उत्पन्न होणारें तें सुख, सात्विक समजावें. ॥ ३७ ॥

**विषयेन्द्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ॥**
**परिणामे विषमिव तत्सुखं राजसंस्मृतम् ॥ ३८ ॥**

यत्तत्सुखं विषयेंद्रियसंयोगाज्जातम् । अग्रेऽमृततुल्यं परिपाके विषमिव दुःखावहं तद्राजसम् ॥ ३८ ॥

जें विषय व इंद्रियें यांच्या संयोगानें उत्पन्न होणारें सुख, आरंभीं अमृताप्रमाणें असलें, परंतु परिणामीं दुःखास कारण झाल्यानें विषाप्रमाणें होतें; ह्मणून तें राजस असें समजावें. ॥ ३८ ॥

**यदग्रे चानुबन्धे च सुखं मोहनमात्मनः ॥**
**निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥ ३९ ॥**

यत्सुखमग्रेऽनुबंधे पश्चाद्विपाककालेपि। आत्मनोमोहनं मोहहेतुः। यतो निद्रादिजनितं तत्तामसमुदाहृतम् ॥ ३९ ॥

जें सुख, आरंभीं व शेवटीं आपल्यास ( सेवनकर्त्यास ) अज्ञान उत्पन्न करणारें असून, झोंप, आळस, प्रमाद इत्यादिकांस उत्पन्न करणारें तें तामस असें मानिलें आहे. ॥ ३९ ॥

**न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ॥**
**सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ॥ ४० ॥**

सर्वजीवानां गुणतस्त्रैविध्यमाह । नतदिति। यत्सत्त्वं जीवजातम् । प्रकृतिजैरेभिस्त्रिभिर्गुणैर्मुक्तं स्यात् । तत्पृथिव्यादिषु नास्ति । मुक्तानां

गुणातीतत्वात् तद्व्यावृत्त्यर्थं पृथिव्यां दिवि देवेषुचेत्युक्तम् । तदुक्तम् । यथेष्टं संचरंतोऽपि मुक्ताभूम्यादिगा न तु । ग्रामस्था अपि न ग्राम्या वैलक्षण्याद्धिसज्जनाइति ॥ ४० ॥

सर्वजीवांस गुणभेदानें त्रैविध्य सांगतात:—प्रकृतीपासून उत्पन्न होणाऱ्या सत्व, रज व तम या तीन गुणांचा संबंध नसलेले असे जीवगण, पृथ्वीवर आणि देवांचें रहावयाचें स्थान जो स्वर्ग, तेथेंही नाहींत, असें समजावें. जो सत्वादिगुणरहित, तो मुक्त असल्यामुळें, सत्वादिगुणरहित जीव नाहींतच हें ह्मणणें कसें जुळतें ? या शंकेचा परिहार करितात:—मुक्त झालेले जीव स्वर्गभूमीचेठायीं असले तरी त्यांस भूम्यादिकांत असलेल्या दोषांचा संबंध नसल्यामुळें ते मुक्त जीव भू व स्वर्ग येथें रहाणारे असें ह्मणून घेत नाहींत. अमुक्तांस भूम्यादि दोषसंबंध असल्यामुळें, ते भूम्यादिकांत आहेत असें सांगतात, ह्मणूनच अमुक्त जीवांस सत्वादिगुणसंबंध असल्यामुळें, त्यांस सात्विक, राजस, तामस असें ( त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें ) ह्मणतात. त्यांपैकीं कांहीं सात्विक, कांहीं राजस, आणि कांहीं तामस आहेत. यांत तामस तीन प्रकारचे होत. तामससात्विक, तामसराजस आणि शुद्ध तामस; मनुष्याधम व अप्रसिद्ध दैत्य हे तामससात्विक होत; दैत्यांचे सेवक तामसराजस, आणि मुख्य दैत्य हे शुद्ध तामस ( तामस तामस ) होत. मनुष्योत्तमांस राजसच ह्मणतात. तारतम्यपूर्वक विष्णूचें सर्वोत्तमत्व न जाणणारे त्यांस त्रैविद्य ह्मणतात. विष्णूचें सर्वोत्तमत्व जाणत नाहींत, परंतु त्याचा द्वेष न करणारे जे त्यांस अज्ञ असें ह्मणतात. राजस तीन प्रकारचे आहेत. भगवद्भक्त अशा ब्राह्मणापासून चांडाळापर्यंत जे मनुष्योत्तम आहेत ते राजससात्विक समजावे; नित्यत्रैविद्य राजसराजस होत; अज्ञानी राजसतामस होत; राजससात्विकांमध्यें भागवत मनुष्योत्तम, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या चार भेदांनीं निरनिराळे आहेत; त्यांपैकीं ब्राह्मण राजससात्विक असून, यति, वानप्रस्थ, ब्रह्मचारी व गृहस्थ असे ते चार प्रकारचे आहेत. यतींमध्यें, परमहंस, हंस, बहुदक, कुटीचक असे चार भेद आहेत; शिखायज्ञोपवीतरहित, एकदंडी, असे परमहंस शुद्ध सात्विक होत. यांस शमदमावांचून दुसरें कर्म नाहीं. ह्मणून हे शुद्ध सात्विक होत. परमहंसांपेक्षां ज्यांचें कर्म चित्ताचा विक्षेप करणारें असें असून, एकदंडी

शिखाविहीन व यज्ञोपवीत असणारा हंस कमी आहे. जे हंसापेक्षां ज्यास शिखा यज्ञोपवीत आहे असे, ग्रामैक रात्रविधि करणारे त्रिदंडी त्यांस बहूदक असें ह्मणतात; ते बहूदकांपेक्षां कमी. ज्यांना शिखायज्ञोपवीत आहे असे व जे आमरण, पुत्रांनीं दिलेल्या अन्नानें उपजीविका करणारे असे त्रिदंडी, त्यांस कुटीचक असें ह्मणतात, ते कमी होत. ज्यांचें कर्म कुटीचकांपेक्षां अधिक चित्तविक्षेपक आहे, ते वानप्रस्थ; त्या वानप्रस्थांपेक्षां अधिक चित्त-विक्षेपकारक कर्म ज्यांस आहे त्या ब्रह्मचाऱ्यांस चार प्रकारच्या यतींपेक्षां अधिक कर्मं करण्याचा अधिकार असतो, ह्मणजे समिधा काढणें अग्निपूजा व श्राद्ध हीं कर्मं करण्याचा त्यांस अधिकार आहे. ब्रह्मचाऱ्यांपेक्षां ज्यांचें कर्म अधिक चित्तविक्षेपकारक स्त्रीपरिग्रहरूप कर्म आहे असे गृहस्थ होत. ब्रह्मचाऱ्यांपेक्षां ज्यांच्यांत रजोगुण अधिक आहे, अशा वानप्रस्थांस पुत्रोत्पत्ति करणें, ग्राम्यवस्तूंचा भोग, यज्ञोक्त पशुहिंसा हीं कर्मं नाहींत. यावरून, गृहस्थाचें कर्म जितकें चित्तविक्षेपकारक आहे त्यांपेक्षां, वानप्रस्थांचें कमी आहे असें जाणावें. देवतादिकांस मनुष्यांपेक्षां अधिक कर्म असलें तरी, त्यांच्यांत मनुष्यांपेक्षां रजोगुण अधिक आहे, असें समजूं नये. पितृगंधर्वादि अप्रसिद्ध जे देव ते सात्विकतामस होत; मुनिगण व अतात्विक देव सात्विक-राजस; व तत्त्वाभिमानी देव तात्विकसात्विक होत. अहंकारिक प्राण बृह-स्पत्यादिक नीच देवतागण सात्विकसात्विक तामस; इंद्र हा सात्विकसात्विक राजस; शेष, गरुड, रुद्र इत्यादिकांच्या स्त्रिया वगैरेपासून ब्रह्मदेवापर्यंत जे देवगण ते सात्विक सात्विक सात्विक; यांपैकीं गरुड, शेष, रुद्र यांच्या स्त्रिया सात्विक सात्विक सात्विक तामस; सरस्वती, सात्विक सात्विक सात्विक राजस; ब्रह्मदेव, सात्विक सात्विक सात्विक सात्विक; याप्रमाणें संसारस्थितीचेठायीं सात्विक, राजस व तामस या भेदानें जीवतारतम्य जाणावें. मुक्तींत सत्वादि-गुण—बद्ध—तारतम्य नसलें तरी ज्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें, सुखाच्या क्रमानें, तारतम्य आहे. राजससात्विकापासून ब्रह्मदेवापर्यंत जीव मुक्तीस योग्य होत. राजस तमोगुणापेक्षां अधिक असा जो सत्वगुण तो रज आणि तम या गुणांचा पराभव करून सम्यक्ज्ञान उत्पन्न करितो, तें ज्ञान मुक्ती प्राप्त होण्यास कारण आहे. ज्याच्यांत तमोगुण अधिक आहे, असे मनुष्याधम,

अंधतमांतच जाणार; सत्व, रज, आणि तम यांनीं बद्ध असलेले अज्ञजन, नित्य संसारांत राहणारे असें समजावें. या रीतीनें सच्छास्त्रोक्त तारतम्यज्ञान-पूर्वक आपापल्या योग्यतेप्रमाणें चांगलें ज्ञान संपादावें. तसें न केलें तर, अंधतमाची प्राप्ति होणार; ह्मणून, सर्वाभेद ( सर्व एकच आहेत, त्यांत भेद मुळींच नाहीं ) अशा ज्ञानाचे ठिकाणीं मन अगदीं लावूं नये हें या ह्मण-ण्याचें तात्पर्य होय. ॥ ४० ॥

**ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परन्तप ॥**
**कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ ४१ ॥**

इदानीं परमेश्वराराधनात्मकस्य कर्मणः फलं प्रतिपादयितुं ब्राह्मणाद्यधिकारिणां स्वभावानुबंधि सत्वादिगुणभेदभिन्नवृत्त्या सह कर्तव्यकर्मस्वरूपमाह । ब्राह्मणेत्यादिना । द्विजत्वाभावद्योतनार्थं शूद्राणां समासात्पृथक्करणम् ॥ ४१ ॥

आतां परमेश्वराची आराधना केल्यानें काय फळ मिळतें, त्याचें प्रति-पादन करण्याकरितां सत्वादिगुणभेदानें भिन्न असे जे ब्राह्मणादिक अधिकारी, त्यांनीं कोणकोणतीं कर्में आचरण करावीं, त्या कर्मांचें स्वरूप सांगतातः— हे **अर्जुना**, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांस सात्विकादि स्वभावानें उत्पन्न झालेल्या गुणभेदानें, त्यांचीं निरनिराळीं कर्में आहेत; येथें शूद्रांस वेदाध्ययनाचा अधिकार नसल्यामुळें, त्यांस द्विजत्व नाहीं असें स्पष्ट दाखविण्याकरितां ‘ ब्राह्मण, क्षत्रिय, विशां ’ या समासांत शूद्रांचा समावेश केला नसून, ते निराळ्या पदानेंच या श्लोकांत दाखविले आहेत. ॥४१॥

**शमो दमस्तपः शौचं क्षान्तिरार्जवमेव च ॥**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥ ४३ ॥**

शमो भगवन्निष्ठा । दम इंद्रियनिग्रहः । तपोब्रह्मचर्यादि शौचंशुद्धिः क्षांतिः क्रोधासमुत्थितिः । आर्जवं मनोवाक्कायकर्म-णामवैपरीत्यं ज्ञानंसामान्यतो विज्ञानं विशेषतः। आस्तिक्यं धर्मादावस्त्ये-वानेन प्रयोजनमितिभावः । एतत्स्वाभाविकं ब्राह्मणकर्म ॥ ४२ ॥

भगवंताचेठायीं निष्ठा ठेवणें, इंद्रियांचें नियमन ( निग्रह ) करणें, ब्रह्मचर्य पाळणें, अंतर्बाह्य शुद्धता राखणें, क्रोधराहित्य, मन, वाणी, आणि देह, यांची कर्मांत सरळता असणें, सामान्य ज्ञान व विशेष ज्ञान संपादन करणें, धर्माविषयीं आस्तिक्यबुद्धि असणें, हीं ब्राह्मणांचीं स्वाभाविक कर्में आहेत व हीं क्षत्रियांसही सामान्यतः असतात. ॥ ४२ ॥

**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ॥**
**दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥ ४३ ॥**

शौर्यमभीरुत्वम् । तेजःशरीरगतम् । धृतिःधैर्यम् । दाक्ष्यंपाटवम् । युद्धेचाप्यपलायनम् । भयादनिवर्तनम् । दानं वदान्यत्वम् । ईश्वरभावो- दंडादिकर्तृत्वम् । प्रसह्य वित्ताहरणं शारीरोदंड एवच । अशिष्याणां शासनं च तथैवार्थविनाशनम् । एषईश्वरभावः स्यान्न कार्यः क्षत्रियेतरैरिति वचनात् । एतत्स्वभावजं क्षात्रं कर्म ॥ ४३ ॥

भय नसणें, ( शौर्य, ) शारीरतेज, धैर्य, कर्मपटुत्व, ( कुशलता, ) युद्धांत पळून न जाणें, उदारता व अन्याय करणारांस योग्य शासन करणें, हीं क्षत्रियांचीं स्वाभाविक कर्में आहेत. याठिकाणीं ईश्वरभाव या शब्दानें क्षात्रधर्म सांगण्याचा प्रसंग आहे, ह्मणून दंडादि शासन कर्तृत्वरूप प्रभुत्व- शक्तीच घ्यावी; शिवाय ब्रह्मैक्यवाद्यांच्या मताप्रमाणें, येथें जीवेश्वरैक्य घेण्यास अवकाशच नाहीं. ॥ ४३ ॥

**कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् ॥**
**परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभाजम् ॥ ४४ ॥**

कर्षण पशुपालन क्रियादि वैश्यस्य स्वाभाविकं कर्म । त्रिवर्ण- सेवात्मकं स्वाभाविकं शूद्रकर्म । एतैरेवगुणैर्ब्राह्मणादिजातिरवधारणी- या । तदुक्तम् । स्वाभाविको ब्राह्मणादिः शमादैरेव भिद्यते । योनिभेद- कृतोभेदो ज्ञेय औपाधिकः स्वयमिति । यद्यपि भगवदाराधनं सर्वांग- त्वात्क्षत्रियादीनां भाव्यं तथापि प्राचुर्याद्व्यपदेशः एवं केनचिन्निमित्तेन पदानां यद्विषयत्वं तेन वा सर्वेषां सर्वधर्मत्वेपि प्राधान्येन असाधार- ण्योक्तिरित्यवधेयं ॥ ४४ ॥

शेती करणें, पशुंचें ( गुरांचें ) संरक्षण करणें, क्रयविक्रय ( व्यापार ) करणें, हीं वैश्यांचीं स्वाभाविक कर्में होत; ब्राह्मण, क्षत्रीय व वैश्य यांची नोकरी करणें, हें शूद्रांचें स्वाभाविक कर्म होय; याप्रमाणे कर्मभेदानें ब्राह्मणादि वर्णभेद जाणावा. आईबापांच्या जातीचा भेद हा औपाधिक आहे; जरी भगवंताचें आराधन करणें हें क्षत्रियादिकांस योग्य आहे, तथापि ब्राह्मण हे भगवंताच्या आराधनेंत जास्त निरत असल्यामुळें, तें ब्राह्मणास सांगितलें आहे. यावरून, ज्या वर्णाचा मुख्य जो धर्म आहे, तोच सामान्यत्वेंकरून येथें सांगितला आहे. ॥ ४४ ॥

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ॥**
**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु ॥ ४५ ॥**

एवं ब्राह्मणादीनां कर्माभिधाय स्वविहिते कर्मण्यभिरतोभगवदाराधनं कुर्वन्मुच्यते नान्यथेत्याह । स्वेस्वे इति । एतदेव प्रतिज्ञापूर्वकमुपपादयति । स्वकर्मनिरतइत्यादिना ॥ ४५ ॥

याप्रमाणें ब्राह्मणादिकांचीं कर्में सांगून, आपआपल्या धर्मांत निरत असून भगवंताचें आराधन करणारे असे जे होतात, ते भवबंधापासून मुक्त होतात, ह्मणून सांगतातः—आपापल्या कर्मांत निरत असणारे पुरुष, उत्तम सिद्धि मिळवितात ती त्यांस कशी प्राप्त होते तें पुढें सांगतात. ॥ ४५ ॥

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ॥**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥४६ ॥**

स्वकर्मणा परमेश्वरस्य श्रद्धादिपूर्वकमर्चनेन सिद्धिर्भवति ॥ ४६ ॥

ज्या परमेश्वरापासून या सर्व जीवगणांचा व्यापार ( व्यवहार ) चालतो व ज्यानें हें सर्व जग व्यापिलें आहे, अशा त्या परमेश्वराची जो भक्तिपूर्वक आपल्यास योग्य अशा कर्मानें पूजा करितो, त्यास ज्ञानाची सिद्धि होते. ॥ ४६ ॥

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ॥**
**स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ ४७ ॥**

परधर्मानुष्ठानात्स्वधर्मानुष्ठानस्य श्रेष्ठत्वात्स्वकर्मानुतिष्ठन् किल्बिषं नाप्नोति ॥ ४७ ॥

स्वभावसिद्ध स्वधर्मांत किंचित् उणीव असली तरी व परधर्म आचरण्यास सुलभ दिसला तरी, त्यापेक्षां स्वधर्मच श्रेष्ठ होय. स्वभावसिद्ध स्वधर्माचरणानें पातक लागत नाहीं. अर्थात् परधर्माचरणानें पातक लागतें, असें तात्पर्य. ॥ ४७ ॥

**सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत् ॥**
**सर्वारम्भा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥ ४८ ॥**

नच वैगुण्यशंकया स्वधर्मत्यागः । तस्य दोषस्य सर्वारंभेष्वपि तुल्यत्वादित्यर्थः ॥ ४८ ॥

स्वधर्मांत दोष आहेत अशी शंका घेऊन, त्याचा ( स्वधर्माचा ) त्याग करूं नये, ह्मणून सांगतातः—हे कुंतिपुत्रा अर्जुना, स्वाभाविक कर्म सदोष असलें तरी, तें सोडूं नये; कारण कोणत्याही कर्मांत दोष नाहींत असें नाहीं. ज्याप्रमाणें अग्नि धुरानें व्याप्त असतो त्याप्रमाणें सर्व कर्में दोषानें व्याप्त असतातच; परंतु, थंडीचे निवारणाकरितां धुराचा ( धूमरूप दोषाचा ) त्याग करून, अग्नीच्या ज्वाळांचा स्वीकार करितात, त्याप्रमाणें कर्मांतील दोष ह्मणजे कर्मफलाची इच्छा, तिचा त्याग करून, कृष्णार्पणबुद्धीनें आपलें कर्मच आचरण करावें, हें तात्पर्य. ॥ ४८ ॥

**असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ॥**
**नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥ ४९ ॥**

स्वकर्माभिरत्या सक्तिं संसिद्धिप्राप्तावित्थंभावांतरमाह । असक्तबुद्धिरिति । नैष्कर्म्यसिद्धिं मोक्षार्थयोगसिद्धिं प्रारब्धातिरिक्तसर्वानिष्टकर्म नाशाख्य सिद्धिंवा ॥ ४९ ॥

सर्व कर्मांत आसक्ति ठेविल्यानें सिद्धि प्राप्त होण्याविषयीं अभिप्रायांतर आहे, ह्मणून सांगतातः—स्त्रीपुत्रादिकांचेठायीं बुद्धि आसक्त न होऊं देतां मनोनिग्रह करून, फलाची इच्छा सोडिल्यानेंच मोक्षरूप सिद्धि अथवा प्रारब्धकर्माशिवाय सर्व अनिष्ट कर्मांचा नाशरूपसिद्धि यांप्रत संन्यासयोगानें पावतो. ॥ ४९ ॥

**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे ॥**
**समासेनैव कौन्तेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥ ५० ॥**

प्रतिज्ञापूर्वकं नैष्कर्म्यसिद्धिसाधनं विवृण्वंस्तदनंतरफलमाह । सिद्धिमित्यादिना । या सिद्धिर्ज्ञानस्य परानिष्ठा । तां नैष्कर्म्यसिद्धिं येन प्रकारेण प्रवर्तमानः प्राप्तोभूत्वा परंब्रह्म लक्ष्मीं चाप्नोति तं प्रकारं संक्षेपतोनिबोध ॥ ५० ॥

भक्तिज्ञानपूर्वक नैष्कर्म्यसिद्धि सांगण्याकरितां सिद्धीच्या नंतर काय फळ मिळतें तें सांगतातः—हे अर्जुना, सिद्धि ही ज्ञानाची उत्तम निष्ठारूप आहे, ही सिद्धि ज्याला प्राप्त झाली तो मनुष्य, परब्रह्माप्रत कसा पोंचतो तो प्रकार थोडक्यांत सांगतों ऐक. ॥ ५० ॥

**बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च ॥**
**शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥५१॥**
**विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः ॥**
**ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥ ५२ ॥**
**अहङ्कारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ॥**
**विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते ॥५३॥**

बुद्ध्येत्याद्युक्तसाधनसंपत्त्या नैष्कर्म्यसिद्धिं प्राप्तोभूत्वा ब्रह्मभूयाय ब्रह्मनिष्ठायै ॥ ५१ ॥ ५२ ॥ ५३ ॥

अत्यंत शुद्धबुद्धियुक्त, सात्विक, धैर्यानें मनाचा निग्रह करून, शब्दादि विषयांचा त्याग करून, त्याच्या विषयांची प्रीति आणि द्वेष सोडून, ॥ ५१ ॥ निर्जन प्रदेशीं एकांत स्थळीं—राहणारा, मिताहारी, देह, वाणी आणि मन यांस स्वाधीन ठेवणारा, ध्यानयोग करणारा, वैराग्य धारण करणारा, ॥ ५२ ॥ अहंकार, बल व दर्प, विषयांचेंठायीं काम, क्रोध, स्त्रीपुत्र भृत्यादि संग्रह न करतां अभिमान सोडून, भगवन्निष्ठेनेंयुक्त होत्साता, शुद्धबुद्ध्यादिसाधनानें ज्याला नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त झाली आहे असा, सर्वदा ब्रह्माचेठायीं मन लावण्याकरितां, लक्ष्मीची प्राप्ति होण्यास योग्य होतो. ॥ ५३ ॥

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ॥**
**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥५४॥**

ब्रह्मणिस्थितः सर्वदा तन्मनस्कः लक्ष्मीं प्राप्तोवा प्रसन्नात्मा निर्मलचित्तः परमात्मानुग्रहवान् । सर्वदा प्रायेण न शोचति न कांक्षति । ततः सर्वेषु भूतेषु समः परामुत्कृष्टां मद्भक्तिं लभते ॥ ५४ ॥

ज्याला महालक्ष्मीची प्राप्ति झाली आहे असा, अथवा ज्याचें चित्त सदोदित ब्रह्माचेठिकाणीं आहे असा, व निर्मलचित्तयुक्त झाल्यानें परमात्म्याच्या कृपेनें कधींही शोक करीत नाहीं, व आपल्यास अलभ्य अशा वस्तूची इच्छा करीत नाहीं, तो तारतम्यानें सर्व प्राण्यांचेठिकाणीं समदृष्टि ठेवून माझी परमउत्कृष्ट भक्ति प्राप्त करून घेतो. ॥ ५४ ॥

**भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः ॥**
**ततो मां तत्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम् ॥५५॥**

अहं यावान् यश्चास्मि तत्वतः तावंतं मां योग्यतानुसारेण तया भक्त्या सम्यक् जानाति तदनंतरं समृद्धेन तेन ज्ञानेन मां प्रपद्यते । उक्तंच । सर्वपापक्षयाद्देहं त्यक्त्वा देवान्क्रमाद्व्रजेत् । प्राप्य लक्ष्मीं तत्प्रसादात्पुनस्त्वृद्धा हरौ यदा । भक्तिस्तया पुनर्ज्ञाने वृद्धे विष्णुं प्रपद्यतइत्यादिना ॥ ५५ ॥

भक्ति प्राप्त झाल्यावर, मी कोण, कोणत्याप्रकारानें सर्वव्यापि आहें व कसा सच्चिदानंद लक्षणानेंयुक्त आहें, हें त्या भक्तीच्यायोगानें, आपल्या योग्यतेप्रमाणें चांगल्या प्रकारें तो मला जाणतो. नंतर माझ्याठायीं प्रवेशरूप सायुज्यमुक्ती ( सर्वज्ञत्व, जगत्कर्तृत्व व लक्ष्मिपतित्व यांशिवाय ) पावतो; सर्व पापांचा क्षय झाल्यानंतर देहत्याग करून, क्रमाक्रमानें देवतांप्रत जाऊन नंतर लक्ष्मीप्रत पावतो. त्या लक्ष्मीच्या प्रसादानें, पुनरपि ज्ञानाच्या अभिवृद्धीनेंयुक्त होऊन, विष्णुप्रत जाऊन, भिन्न असूनच सायुज्यमुक्तीचा अनुभव घेतो; हें तात्पर्य. ॥ ५५ ॥

**सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः ॥**
**मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥ ५६ ॥**

यतः प्रवृत्तिरित्युक्तमेव विशिनष्टि । सर्वेति विहितानि सर्वकर्माण्यपि मद्व्यपाश्रयोमय्येव समर्पयन्सदा कुर्वाणोमत्प्रसादाच्छाश्वतं शश्वदेकप्रकारमव्ययं नित्यं पदं परब्रह्म स्वरूपं अवाप्नोति । एकमपि कर्म तदाश्रयेण विना न कार्यमित्येवमर्थमपि शब्दः ॥ ५६ ॥

" यतः प्रवृत्तिर्भूतानां " याचा अर्थ स्पष्ट करितातः—सर्वदा माझाच आश्रय करून, सर्व कर्म मलाच अर्पण करणारा प्राणी माझ्या अनुग्रहानें, शश्वदेकप्रकार नाशरहित व नित्य अशा ब्रह्मस्थानाप्रत पोंचतो. कोणतेंही कर्म मला अर्पण केल्यावांचून करूंनये, या अभिप्रायानें ' अपि ' हा शब्द घातला आहे. ॥ ५६ ॥

**चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ॥**
**बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥५७॥**

यदि भगवदाश्रयेण विहितकर्मकुर्वतोमुक्तिः तर्हि त्रैविद्यस्यापि स्यात्तस्यापि विहितं कर्म कृत्वा भगवदर्पणसद्भावेन भगवदाश्रितत्वाविशेषादित्यतआह । चेतसेति । स एव सर्वप्रकारेण सर्वस्मात्परइति सदाभावोयस्येति मत्परः । मय्येव चेतसा सर्वकर्माणि संन्यस्य योगं प्रत्याहाराद्युपायमाश्रित्य मयि निरुद्धं चित्तं यस्यासौ मच्चित्तः । भगवदाश्रितोविहिताशेषकर्माणि चेतसा भगवति संन्यस्य करोति न तथा त्रैविद्यइति तयोश्चेतसैवविशेष इतिभावः ॥ ५७ ॥

जर भगवंताला अर्पण करण्याच्या बुद्धीनें, आपल्यास योग्य असें कर्म करणारास मुक्ति मिळते, तर त्रैविद्यही आपल्यास योग्य असें कर्म करून, भगवंताला अर्पण करीत असतात, ह्मणून त्या उभयतांस भगवदाश्रितत्वांत कांहीं विशेष नाहीं असें झाल्यानें, त्यांसही ( त्रैविद्यांसही ) मुक्ति कां मिळूं नये अशी शंका येईल, तिचा परिहार करितातः—सर्व प्रकारें मीच सर्वोत्तम आहें असें समजून, सर्व कर्में मनापासून मला अर्पण करून, बुद्धिज्ञानाचा प्रतिहार इत्यादि उपायांचा आश्रय करून, निरंतर तुझें चित्त माझ्याठिकाणीं आसक्त असूंदे. त्रैविद्यांस विष्णू हा अनंतगुणपरिपूर्ण व सर्वोत्तम आहे, इत्यादि ज्ञान नाहीं, मुक्तियोग्यांस तें ज्ञान आहे, कारण, मुक्तियोग्यांस मोक्षप्राप्ति आहे. ती प्राप्ति त्रैविद्यांस नाहीं. ॥ ५७ ॥

**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ॥**
**अथ चेत्त्वमहङ्कारान्न श्रोष्यसि विनंक्ष्यसि ॥ ५८ ॥**

भगवच्चित्तस्यफलमाह । मच्चित्तइति । मद्गतचित्तः सन् सर्वाण्यपि दुर्गाणि दुस्तराणि दुःखानि मत्प्रसादात्तरिष्यसि । एवं स्वविहितवृत्त्या भक्त्या भगवदाराधनस्य परमधर्मत्वाद्युद्धाख्य स्वविहितंकर्म भगवत्प्रीत्यर्थं कार्यमित्येतावता प्रबंधेन प्रतिपादितं तदकरणेऽ

निष्टमाह । अथचेदिति । अहं न योत्स्यामीत्यहंकाराद्युद्धस्वेति मदीयं वचनं न श्रोष्यसिचेद्विनंक्ष्यसि पुरुषार्थाद्भ्रष्टोभविष्यसि ॥ ५८ ॥

ज्यांचें चित्त भगवन्निष्ठ झालें आहे अशा अधिकाऱ्यांस काय फळ मिळतें तें सांगतात:—तो माझ्याठिकाणीं चित्त ठेविल्यानें उल्लंघन करण्यास कठीण अशा संसारदुःखापासून मुक्त होतो. याप्रमाणें आपल्यास योग्य असें भगवंताचें आराधनच मुख्य असल्यामुळें, स्वविहित कर्म भगवंताची प्राप्ति होण्याकरितां करावें. याचा गर्भित अर्थ असा कीं, तूं युद्ध कर. जर, मी सांगितलेलें हें अहंकारामुळें तूं न ऐकशील तर, मोक्षलाभरूप जो पुरुषार्थ त्यापासून भ्रष्ट होशील. ॥ ५८ ॥

**यदहङ्कारमाश्रित्य न योत्स्य इतिमन्यसे ॥**
**मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥५९॥**

एतच्चाभ्युपगम्योक्तं वस्तुतस्त्ववशक्यं च तवोक्ताकरणमित्याह । यदिति । अहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे । एषते व्यवसायो-मिथ्या यतस्त्वां प्रकृतिर्युद्धेनियोक्ष्यति वर्तयिष्यति । प्रकृतिरीश्वरेच्छा। प्रकृतिर्वासनेत्येवं तवेच्छा नंत कथ्यत इतिवचनात् ॥ ५९ ॥

मी सांगितलेलें ऐकून तूं खरोखर युद्धच करशील; त्याचा त्याग तूं करणार नाहींस, म्हणून सांगतात:—अहंकाराचा आश्रय करून माझें म्हणणें न ऐकून ' मी युद्ध करणार नाहीं ' असा तुझा निश्चय असेल तर तो व्यर्थ आहे; कारण तूं अस्वतंत्र आहेस. ज्या ईश्वराची इच्छा तुला युद्ध करण्याविषयीं प्रेरणा करिते, ती इच्छा स्वतंत्र असल्यामुळें, तूं युद्ध न करण्याविषयीं असमर्थ आहेस. येथें ' प्रकृति ' शब्दाचा अर्थ ' भगवंताची इच्छा ' असा घेतला आहे. ॥ ५९ ॥

**स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा ॥**
**कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ॥६०॥**

ईश्वरेच्छया जीवनियोगे निमित्तं स्वभावादिकं दर्शयन्नुक्तं विवृणोति स्वभावजेति । स्वभावः संस्कारः तज्जन्येन स्वेन कर्मणा निबद्धोनियंत्रितः मोहात्कर्म कर्तुं नेच्छसि । अवशोऽपि तत्कर्म करिष्यसीत्येव ॥ ६० ॥

ईश्वरइच्छेस जीव नियमन करण्यास कारण स्वभावादिक दाखवून उक्त अर्थाचें विवरण करितात:—हे अर्जुना, जें कृत्य अज्ञानामुळें तूं करण्यास

इच्छित नाहींस, तें कृत्य. जन्मांतरींच्या संस्काररूप आपल्या कर्मानें बद्ध होऊन, तूं अस्वतंत्र आहेस ह्मणून, तें करशीलच. ॥ ६० ॥

**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ॥**
**भ्रामयन्सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया ॥६१॥**

नन्विच्छायाः प्रवर्तकत्वे ईश्वरः प्रवर्तकोऽपि न स्यादित्याशंकां ईश्वरस्वरूपं दर्शयन्नेव परिहरति । ईश्वरइति । सर्वेषांभूतानांहृद्देशे ईश्वरोनियंता । यंत्राणि शरीराण्यारूढानि सर्वाणि भूतानि जीवान् मायया स्वरूपभूतया स्वेच्छया भ्रामयन् कर्माणि प्रवर्तयन् तिष्ठति६१

ईश्वराची इच्छाच जर जीवाला प्रेरणा करिते तर, ईश्वर प्रवर्तक होणार नाहीं अशी शंका येईल तिचा परिहार, ईश्वराचें स्वरूप दाखवून करितातः—हे अर्जुना, सर्व प्राण्यांच्या हृदयांमध्यें अंतर्यामित्वानें जीवप्रेरक ईश्वर असतो; तो ईश्वर, शरीररूप यंत्रावर बसलेल्या प्राणिगणांस, आपल्या इच्छेप्रमाणें, कर्में करावयास लावतो. ( नियमन करितो. ) ॥६१॥

**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ॥**
**तत्प्रसादात्परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥**

यस्मादेवमीश्वरएव स्वतंत्रोजीवास्तदधीनास्तस्मादहंकारं परित्यज्य तमेव सर्वप्रकारेणाश्रयेत्याह । तमेवेति । सर्वोत्तमत्वविज्ञानपूर्वं तत्र मनः सदा । सर्वाधिकप्रेमयुक्तं सर्वस्यात्र समर्पणं । अखंडा त्रिविधा पूजा तद्दत्यैव स्वभावतः । रक्षतीत्येव विश्वासस्तदीयोहमिति स्मृतिः । शरणागतिरेषा स्याद्विष्णौ मोक्षफलप्रदेत्युक्ताशरणागतिः । तथा तस्येश्वरस्य प्रसादात् । परां शांतिं बुद्धेर्भगवन्निष्ठां शाश्वतं स्थानम् । श्रीरेव लोकरूपेण विष्णोस्तिष्ठति सर्वदा । अतोहि वैष्णवा लोका नित्यास्ते चेतना अपीत्यादिना नित्यत्वेन सिद्धं वैकुंठादिस्थानं प्राप्स्यसि । भगवतईश्वरत्वस्य निश्चितत्वान्मामेकं शरणं व्रजेति प्रत्यभिज्ञानाच्चेश्वरस्तिष्ठति तमेव शरणं गच्छ तत्प्रसादादिति परोक्षवचनम् । उक्तंच । निश्चितार्थः सतु ज्ञेयोयत्रात्मैव परोक्षतः । उच्यते विष्णुना यद्वत्तद्ब्रह्मेत्यादि कथ्यतइति ॥ ६२ ॥

ज्या करितां, पूर्वी सांगितल्याप्रमाणें ईश्वरच स्वतंत्र असून, जीव हे अस्वतंत्र व त्या ईश्वराचे आधीन आहेत, त्याकरितां अहंकार सोडून त्या परमात्म्याचाच सर्वप्रकारें आश्रय कर; ह्मणून सांगतातः—हे भारता, सर्वप्रकारें

त्या ईश्वराला शरण जा, त्याला शरण कसें जावें, असें ह्मणशील तर सांगतों ऐक; सर्वोत्तमत्व ज्ञानयुक्त होऊन, सर्वांपेक्षां त्याचेठायीं अधिक प्रीति ठेऊन, फलाची इच्छा न करितां, काया, वाचा, मनेंकरून त्या परमात्म्याची पूजा करून, तो माझें रक्षण करील, असा भरंवसा ठेऊन, त्याला शरण गेलास तर, त्याच्या कृपेनें शाश्वत असा जो वैकुंठलोक तो तुला प्राप्त होईल. सर्वोत्तमत्व विज्ञानपूर्वक परमात्म्याचेठायीं सर्वांपेक्षां अधिक प्रेमयुक्त असणें हीच सर्वसमर्पणरूप अखंड त्रिविधपूजा होय. अशा भक्तांचें रक्षण करण्याला त्या परमात्म्याला प्रयोजनाची अपेक्षा नसली तरी, तो श्रीहरी परमात्मा स्वभावतः आपलें रक्षण करील, असा विश्वास धरून आणि मी त्याच्या दासाचाही दास असून त्याच्या आधीन आहें, असें समजून शरण जाणेंच मुक्ती प्राप्त होण्यास साधन होतें. अशांला नित्य वैकुंठाची प्राप्ति होण्यास कारण इतकेंच कीं, भगवत्परिग्रहभूत चित्प्रकृति महालक्ष्मी आपल्या प्राणप्रिय परमात्म्याच्या संतोषाकरितां वैकुंठलोकरूपानें असते. ह्मणून, वैकुंठ लोक अचेतन असले तरी, ते नित्य आहेत; अशा त्या नित्य असणाऱ्या वैकुंठांत, परमात्म्याला एकनिष्ठेनें शरण गेलेले माझे भक्त जातात. श्रीभगवान् कृष्णाला ईश्वरत्व निश्चित असल्यामुळें " मामेकं शरणं व्रज " अशा प्रतिज्ञावाक्यानें ईश्वर तो मींच, त्या मलाच शरण जा, असें सांगून " तमेव शरणं गच्छ " या परोक्ष वचनानें ' त्याला शरण जा, त्याच्या प्रसादानें उत्तम शांतिरूप भगवन्निष्ठा, आणि शस्वत्स्थानभूत मुक्ति मिळेल. ' असें सांगण्याचा हेतु इतकाच कीं, परोक्षरूपानें आत्माच सांगितला आहे असा निश्चितार्थ समजावा. तसा विष्णुपरमात्मा परब्रह्म असून, जें ब्रह्म त्याला ( ह्मणजे मलाच ) शरण जा, असें सांगतात. मागीलप्रमाणेंच येथेंही ' तमेव शरणं गच्छ ' या परोक्ष वचनानें भगवान् श्रीकृष्ण मीच परमात्मा परब्रह्म असें सुचवितात, हें तात्पर्य समजावें. ॥ ६२ ॥

**इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ॥**
**विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥ ६३ ॥**

एवं भगवानर्जुनस्य गुह्यादप्यतिगुह्यतमं ज्ञानमाख्याय तदनुवादेनोपदेष्टुर्मम गुरुत्वान्मद्वचनोल्लंघनं विचार्यमाणे तवश्रेयस्करं न भवतीत्याक्षिपन्नाह । इतीति ॥ ६३ ॥

याप्रमाणें भगवान् श्रीकृष्ण अर्जुनास अति गुह्य असें परमात्मज्ञान सांगून, तदनुवादपूर्वक ज्ञानोपदेश करणारा गुरू मीं आहें ह्मणून, माझें बोलणें

अमान्य करण्याचें तूं मनांत आणशील तर, तुला तें श्रेयस्कर होणार नाहीं, ह्मणून सांगतात:-याप्रमाणें योगादिज्ञानापेक्षांहि अति गौप्य रहस्य ज्ञान मी तुला सांगितलें आहे तर, मी उपदेशिलेलें हें जें गीताशास्त्र त्याचें पूर्णपणें मनन करून, नंतर तुझ्या इच्छेस येईल तसें कर; या शास्त्राचें मनन केलें असतां, तुझें सर्व अज्ञान नाहींसें होईल. ॥ ६३ ॥

**सर्वगुह्यतमं भूयः श्रृणु मे परमं वचः ॥**
**इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ॥ ६४ ॥**

भगवान् भक्तानुकंपया द्वाविमौपुरुषावित्यत्र तत्वसारं निष्कृष्य दर्शितवान् । इदानीं साधनसारं निष्कृष्य सुखग्रहणार्थं दर्शयन्नाह । सर्वेति । त्वं मे दृढमतीवेष्टइति ततस्ते हितं वक्ष्यामि । तत्सर्वं गुह्यतमं परमं वचः श्रृणु मन्मनाइत्यादेः पूर्वमेवोक्तत्वाद्भूयइति ॥ ६४ ॥

भगवान् श्रीकृष्णानीं भक्तावर कृपाळू होऊन, " द्वाविमौ " ( अ. १५ श्लो. १६ ) या श्लोकांत तत्वाचें सार एकत्र दाखविलें. आतां सर्व साधनाचें सार काढून, लोकांनां अनायासें त्याचा बोध व्हावा ह्मणून सांगतात:- हे अर्जुना, सर्व गौप्यांमध्यें अति गौप्य व अति उत्तम असें माझें बोलणें पुनः तूं ऐक; तें पुन्हा सांगण्याचें कारण असें कीं, तूं मला फार प्रिय आहेस; ह्मणून जेणेंकरून तुझें हित होईल असें मी तुला सांगतों. ॥ ६४ ॥

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ॥**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥ ६५ ॥**

तदेव हितं वचोवक्ति । मन्मनाइति । मन्मनस्त्वादिसाधनेन मत्प्राप्तिरित्येतत्सत्यं नात्र संशयः । यतस्त्वं प्रियोऽसि अतः सत्यं प्रतिजाने ॥ ६५ ॥

तें हितवचन कोणतें ते सांगतात:-तूं माझेठिकाणीं मन ठेवून माझा भक्त हो; माझ्याकरितां यजन पूजा वगैरे कर; मलाच नमस्कार कर; याप्रमाणें केलेंस ह्मणजे, माझ्या कृपेनें तुला ज्ञानप्राप्ति होऊन, तूं मजप्रत पावशील; याविषयीं संशय धरूं नको. तूं माझा मित्र असल्यामुळें मी हें तुला प्रतिज्ञापूर्वक सांगतों. ॥ ६५ ॥

सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ॥
अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥६६॥

किं फलापेक्षया त्वन्मनस्त्वादिकं नेत्याह । सर्वधर्मानिति । तत्फलमुपलक्ष्यते । सर्वकर्मफलानि परित्यज्येत्यर्थः । नतु सर्वकर्मत्यागः । युद्धविधानात् यस्तु कर्मफलत्यागी इत्युक्तत्वाच्च मन्मना-इत्यादेर्व्याख्यानं मामेकंशरणंव्रजेत्यादि मदाश्रयणे । अहं त्वां सर्वेभ्यः पापेभ्यः अनादिजन्मकृतेभ्योमोक्षयिष्यामि । एतादृशस्य भगवत्प्रसादात्प्रीतिः स्यात्ते पापप्रसक्त्यभावात् । अतःसंसारभयात् मा शोकं कार्षीरित्यर्थः । अथवा किमन्य मनस्त्वादिना त्वन्मनस्त्वादिकं कार्यमिति नेत्याह । सर्वधर्मानिति । अवैष्णवधर्मान्परित्यज्येत्यर्थः । शेषं पूर्ववत् ॥ ६६ ॥

कोणत्या फळाची प्राप्ति व्हावी ह्मणून माझेठायीं मन ठेवावें व मला प्रिय असें यजनादिक करावें, त्याविषयीं सांगतात:—सर्व धर्मांच्या फलाची अपेक्षा सोडून सर्वांत श्रेष्ठ अशा मला शरण ये. ह्मणजे मीं तुला, तूं केलेल्या अनेक जन्मींच्या पापांपासून मुक्त करीन, या संसाराचें भय बाळगूं नको. ‘ येथें, सर्व या शब्दानें तदुपलक्षित फल घ्यावें ’ मी सर्व देव विलक्षण, व सर्वशक्तिमान् असल्यामुळें, माझ्याच प्रसादानें, धर्माचरण केल्यानें कांहीं पाप आलें असलें तरीं तें नाहींसें होईल हें तात्पर्य होय. किंवा, तुझ्या ठिकाणीं मन ठेवून तुला प्रिय असें यजनादिक केलें ह्मणजे पुरे, अथवा याविषयीं दुसऱ्या कोणाला शरण जावें लागेल ? अशी शंका येईल, तर याविषयीं असें सांगतात कीं, मलाच शरण आलें ह्मणजे झालें, दुसऱ्या कोणास शरण जाण्याची किंवा त्याची पूजा अथवा तत्प्रीत्यर्थ यजन वगैरे करण्याची आवश्यकता नाहीं, हें तात्पर्य. ॥ ६६ ॥

इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ॥
न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥६७॥

गीताशास्त्रेऽनधिकारिनिरासेनाधिकारिणं लक्षयति । इदमिति । इदं गीताशास्त्रं अतपस्काय न वाच्यम् । तस्मादप्यशुश्रूषवे विशेषतो न वाच्यम् । समुच्चये तथाधिक्ये न्यूनत्वेच प्रयुज्यतइत्यभिधानाच्च शब्देन दोषाधिक्यावगमात् । अशुश्रूषो रभक्ताय न च वाच्यं कदा-

नेत्युक्तेः। कदाचिदल्पतपसोऽल्पशुश्रूषोरपि भक्त्याधिक्येन वाच्यं भवतीति। कदाचनेति विशेषः। यो मामभ्यसूयति तस्मादभक्तादपि न वाच्यम्। अभक्तादपि पापः स्यादसूयुर्दोषदृग्यतइति वचनात् ६७

हें गीताशास्त्र ज्याला अधिकार नाहीं अशाला सांगूं नये ह्मणून सांगून अधिकाऱ्याचें लक्षण सांगतात:—हें गीताशास्त्र, जो मनुष्य स्वधर्मानुष्ठानरहित आहे, अशाला सांगूं नये. हें गीताशास्त्र ऐकण्याची ज्याची मनापासून इच्छा नाहीं, श्रद्धाहीन अशाला व परमात्म्याचेठायी, तो सर्वोत्तम आहे अशी ज्याची श्रद्धा नाहीं त्यालाही सांगूं नये. जो माझें अनंतगुणादैश्वर्य नाहीं असे ह्मणतो व जो अल्पज्ञ, दुःखी, बद्ध, अस्वतंत्र, अशा जीवांशीं ऐक्य आहे असें ह्मणतो व माझा द्वेष करितो, त्यालाही हें गीताशास्त्र कदापि सांगूं नये. एखादा अतपस्क इत्यादि प्रकारचा मनुष्य असून त्याच्या मनांत माझ्याविषयीं भक्ति उत्पन्न होईल तर त्याला हें गीताशास्त्र सांगण्यास कांहीं चिंता नाहीं, असें तात्पर्य. ॥ ६७ ॥

**य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ॥**
**भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥ ६८ ॥**

गीता व्याख्यानफलकथनेन प्रशंसति । य इदमित्यादिना। मयि परां भक्तिं कृत्वा भक्तिपूर्वकं मद्भक्तेषु मद्भक्तेभ्यः इदं ज्ञानं योऽभ्यधास्यति स मामेष्यति नात्र संशयः ॥ ६८ ॥

शेवटीं गीता व्याखानाचें फळ सांगतात:—जो अत्यंत गुप्त असें हें गीताशास्त्र माझ्या भक्तांना ऐकवितो, तो श्रेष्ठ भक्तीनें, परमात्मा जो मी, त्या माझ्याठिकाणीं प्राप्त होतो, यांत संशय नाहीं. ॥ ६८ ॥

**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ॥**
**भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥ ६९ ॥**

मनुष्येषु तस्माद्व्याख्यातुरन्यः कश्चिन्मे प्रियकृत्तमः अतिशयेन प्रियकारी नास्ति तस्मादन्यः प्रियतमो न भविता नास्त्येवेत्यर्थः ॥६९॥

माझ्या भक्तांस गीताशास्त्राचें व्याख्यान सांगणारापेक्षां, मला दुसरा कोणीही अति प्रिय होणारच नाहीं. मग गीतेचें व्याख्यान सांगणारापेक्षां, ..ला अधिक प्रियकर असा या भूमंडळावर होणार नाहींच नाहीं. ॥ ६९ ॥

**अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः ॥**
**ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥ ७० ॥**

आवयोस्तव मम च धर्म्यं संवादं योध्येष्यते पठिष्यति तेनाध्येत्रा ज्ञानयज्ञेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः निश्चयः ॥ ७० ॥

अर्जुना, आपणा उभयतांचा गीताशास्त्ररूप संवाद जो जपरूपानें पठण करितो, तो सर्व यज्ञांत श्रेष्ठ असा जो ज्ञानयज्ञ, त्यानें माझें यजन करितो असें मी निश्चयानें समजतों. ॥ ७० ॥

**श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः ॥**
**सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान् प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ॥ ७१ ॥**

योऽपि नरः श्रद्धयायुक्तो दोषदृष्टिरहितः शृणुयात् सोऽपि पापैर्मुक्तः पुण्यकर्मणां शुभान्लोकान् प्राप्नुयात् । अत्रसोऽपि मुक्तः नच तस्मान्मनुष्येष्वित्युक्तेश्च मुक्तौ महत्तारतम्यं ज्ञायते मनुष्येष्विति विशेषणात्तत्रापि देवानामाधिक्यं च । तदुक्तं । मुक्तिर्ज्ञात्वापि विष्णुं स्याच्छास्त्रं श्रुत्वा ततोऽधिकं । मुक्तौ सुखं तत्पठतस्ततोप्यऽधिक मिष्यते । व्याख्यातुः परमं मुक्तौ सुखं नान्यस्य कस्य चित् । ततोऽधिकं तु देवानां मुख्यव्याख्याकृतोयत इति ॥ ७१ ॥

गीताशास्त्राचे श्रवणानें महत्पुण्य प्राप्त होतें या प्रकारची आस्तिक्यबुद्धि ठेऊन दोषदृष्टिरहित होऊन दुसरा वाचीत असतांही जो श्रवण करितो, तो मुक्त होऊन पुण्यकर्म करणारे ज्या लोकांत जातात, त्या पुण्यकारक लोकांत जातो. हें गीताशास्त्र श्रवण केल्यावांचून केवळ गुरूच्या उपदेशानें जे मुक्त होतात, त्यापेक्षां, श्रवण करून मुक्त झालेल्यांस, मुक्तींत अधिक सुख मिळतें; श्रवणानें मुक्त झालेल्यापेक्षां, गीतेचा पाठ करून मुक्त झालेल्यांस सुख अधिक; पाठानें मुक्त झालेल्यापेक्षां, गीताव्याख्यानानें मुक्त झालेल्यांस सुख अधिक; व्याख्यानानें मुक्त झालेल्यापेक्षां, मुख्य व्याख्यान करून मुक्त झालेल्या देवांस मुक्तींत सुख अधिक आहे, असें समजावें. ॥ ७१ ॥

**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ॥**
**कच्चिदज्ञानसम्मोहः प्रनष्टस्ते धनञ्जय ॥ ७२ ॥**

उपदेशोऽयमरण्यरुदितवन्माभूदित्याशयवानाह । कच्चिदिति । अज्ञानोत्थः संमोहः ॥ ७२ ॥

आतांपर्यंत केलेला उपदेश अरण्यरुदनाप्रमाणें निष्फल होऊं नये, ह्मणून विचारितातः—हे **अर्जुना**, मी सांगितलेलें हें गीताशास्त्र, तूं एकाग्रचित्तानें ऐकिलेंस ना? हे **धनंजया**, तुला अज्ञानानें प्राप्त झालेला मोह नाहींसा झाला ना? ॥ ७२ ॥

अर्जुन उवाच.

**नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत ॥**
**स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ ७३ ॥**

नेदमरण्यरुदितं किंतु त्वदनुग्रहात् ममाज्ञानं विनष्टं बुद्धिर्जाता इदानीं संदेहं त्यक्त्वा युद्धार्थं व्यवस्थितोऽस्मीत्यर्जुनउवाच । नष्टइति । यथेच्छसि तत्कुर्वित्याक्षेपपरिहाराय भगवंतमनुसरति । करिष्येवचनंतवेति ॥ ७३ ॥

असा भगवंताचा प्रश्न ऐकून, तुह्मीं उपदेश केला तो अरण्यरुदनाप्रमाणें निष्फल न होतां, तुमच्या कृपेनें माझें अज्ञान नाहींसें होऊन, मला विमल अशी बुद्धि प्राप्त झाली व माझा सर्व संशय नाहींसा झाल्यामुळें मी युद्धाकरितां सिद्ध झालों आहें, ह्मणून अर्जुन बोलतोः—**अर्जुन** ह्मणतो, हे नाशरहिता भगवान् **श्रीकृष्णा**, तुझ्या अनुग्रहानें माझें सर्व अज्ञान नाहींसें झालें आणि त्यामुळें तूंच सर्वोत्तम आहेस अशी मला अनुसंधानरूप स्मृति झाली, या कारणामुळें युद्ध करण्याच्या इच्छेनें मी रणभूमींत तयार झालों आहें. तुझें बोलणें मी निःसंशय शिरसावंद्य करितों; "यथेच्छसि तथा कुरु" हा जो भगवंताचा आक्षेप होता, त्याचा परिहार करण्याकरितां "करिष्ये वचनं तव" याप्रमाणें बोलून, **अर्जुन श्रीकृष्णाच्या** मताप्रमाणें वागण्यास तयार झाला. ७३

संजय उवाच ।

**इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ॥**
**संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥ ७४ ॥**

तदेवं धृतराष्ट्रंप्रति श्रीकृष्णार्जुनसंवादमुक्त्वा प्रवृत्तां कथामनुसरन्संजयउवाच । इत्यहमित्यादिना । रोमहर्षणं रोमांचकरं संवादमश्रौषं श्रुतवानस्मि ॥ ७४ ॥

याप्रमाणें संजय, धृतराष्ट्राला कृष्णार्जुनाचा झालेला संवाद सांगून ह्मणतोः—**संजय** ह्मणतो हे **धृतराष्ट्रा**, महात्म्या भगवान् श्रीकृष्णाचा आणि

अर्जुनाचा आश्चर्यकारक आणि आनंदामुळें आंगावर रोमांच उभारणारा हा संवाद याप्रकारें मी ऐकिला ॥ ७४ ॥

**व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परम् ॥**
**योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥७५॥**

व्यासप्रसादादित्यनेनात्मनस्तच्छ्रवणेसंभावनादर्शिता ॥ व्यासेन हि दिव्यचक्षुः श्रोत्रादि तस्मै दत्तं । योग सामर्थ्यं स्वयमेव कथयतः कृष्णात्साक्षादव्यवधानेनैतद्गुह्यं श्रुतवान् ॥ ७५ ॥

हा संवाद श्रवण करण्याची मला योग्यता कशी आली तें सांगतो:— हें योगशास्त्र ( गीता ) सांगणाऱ्या योग्यांत श्रेष्ठ अशा श्रीकृष्णाच्या तोंडून, ज्यांत उत्तम रहस्य आहे असें शास्त्र, श्रीवेदव्यासांच्या अनुग्रहानें मी अंतःकरणपूर्वक ऐकिलें. ॥ ७५ ॥

**राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम् ॥**
**केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ ७६ ॥**

हे राजन् कृष्णार्जुनसंवादं स्मरतो मम हर्षोजायते ॥ ७६ ॥

हे राजा धृतराष्ट्रा, कृष्णार्जुनांचा हा आश्चर्ययुक्त व पुण्यकारक संवादरूप ( गीताशास्त्र ) याचें स्मरण करून, मी वारंवार हर्षित होतों आहें. ॥ ७६ ॥

**तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः ॥**
**विस्मयो मे महान्राजन् हृष्यामि च पुनःपुनः ॥७७॥**

विशेषतोविश्वरूपस्मरणेन हर्षो विस्मयश्च जायते ॥ ७७ ॥

हे धृतराष्ट्रा, आश्चर्यकारक अशा त्या श्रीकृष्णाच्या विश्वरूपाचें वारंवार स्मरण करून मला मोठें आश्चर्य वाटत आहे. शिवाय मला पुनः पुनः हर्षही होत आहें. ॥ ७७ ॥

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ॥**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ ७८ ॥**

# इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे संन्यासयोगोनामाष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

किंच यत्र येषां पक्षे योगस्याचिंत्यशक्तेरीश्वरः कृष्णोवर्तते । यत्र पार्थोगांडीवधन्वा तिष्ठति तत्र श्रीः राजलक्ष्मीः विजयोभूतिः उत्तरोत्तरवृद्धिः । नीतिर्न्यायः । ध्रुवा निश्चलेति सर्वत्र संबंधः इति मे मतिः अतस्त्वं सतनयः कृष्णं शरणमुपेत्यैव पांडवान्प्रसाद्य तेभ्यः सर्वस्वं दत्वा स्वपुत्रान् पालय इतिभावः ॥ ७८ ॥

इति श्रीमद्भगवद्गीताविवृतौ विद्याधिराजभट्टोपाध्याय विरचितायाम् श्रीमध्वमतानुवर्तिनी व्याख्योपेतायाम् अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

यतो विश्वस्य जन्मादि पूर्णशक्तेर्महात्मनः ॥
सोऽपराधं मम क्षन्तुं कृष्णोभक्तप्रियोऽर्हति ॥

याप्रमाणें कुरुक्षेत्रांत घडलेला इतिहास सांगून, ह्या युद्धाचा भावी परिणाम काय होणार तें सांगतों:—अचिंत्यशक्ति असा **श्रीकृष्ण** ज्या पक्षाला आहे, त्याप्रमाणेंच गांडीवधनुष्य धारण करणारा **अर्जुन**ही आहे, त्याच पक्षाकडे **राज्य, लक्ष्मी, विजय, नीति, भरभराट,** यांची उत्तरोत्तर वृद्धि होणार, असें मला वाटतें. याविषयीं तूं शंका धरूं नये. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें विचित्रशक्ति **श्रीकृष्णा**चेठायीं पांडवांची भक्ति असून, ते तदनुसार युद्ध करण्यास तयार झाले आहेत, आणि त्या पांडवांवरही **श्रीकृष्णाची** कृपा आहे; ह्मणून तुझ्या पुत्रांला—कौरवांला—जयप्राप्ति होणार नाहींच; असें समजून, त्या भगवान् परमात्म्याला शरण जाऊन, पांडवांस सर्वस्व दिलें तरी कांहीं चिंता नाहीं, परंतु, मूढ असे जे तुझे दुर्योधनादिक पुत्र त्यांचें रक्षण कर; ह्मणून संजय बोलला, हें याचें तात्पर्य होय. ॥ ७८ ॥

येथें श्रीमत् भगवद्गीतेवरील श्री विद्याधिराज भट्टोपाध्याय विरचित मध्वमतानुवर्ति **श्रीमदिंदिराकांततीर्थ श्रीपादकृत** महाराष्ट्रभाषाविवरण समाप्त झालें.

---

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ शुभं भवतु ॥

# गीतेंतील पारिभाषिक शब्दांचा कोश.

वर्णसंकर–अनेक जातींचें जें मिश्रण तो भ्रष्टाकार
विज्ञान–अपरोक्ष ज्ञान.
सत्यंभिदा–श्रुति.
आगमानुकूलभेद–ज्या भेदाला शास्त्रप्रामाण्य आहे.
असत्‌शब्दवाच्य–नसलेला पदार्थ.
सत्‌शब्दवाच्य–असलेला पदार्थ
अभिन्नांश रूप–जेथें भेद नाहीं तें रूप
सच्चिदानंदकरमूर्ति–ज्ञानानंदस्वरूप.
सद्देह–दोषरहित देह
सुखगंध–सुगंध
वीरस्वर्ग–युद्ध करण्यानें प्राप्त होणारा लोक
भगवत्ज्ञानयोग–ज्ञानरूप साधन
वैष्णवधर्म–विष्णुभक्ति करविणारा धर्म
असदृश–त्यासारिखें नव्हे जें तें
सामीप्यादिमोक्ष–वैकुंठप्राप्ति, चार प्रकारचा मोक्ष.
नित्यानित्यवस्तुविवेकज्ञान–नाशवंत व नाश न होणारे पदार्थांचा विचार करणें
स्रक्चंदनवनितादि विषय–गंध, पुष्प, माला व स्त्री इत्यादि सुख देणारे विषय
अलब्धलाभरूपयोग–न मिळालेलें मिळणें
लब्धक्षणरूपक्षेम–मिळाल्याचें रक्षण करणें
सालोक्य–एका लोकांत रहाणें
अंधतमरूप–अंधार असलेला लोक
ब्रह्मापरोक्षज्ञान–ईश्वरास प्रत्यक्ष पहाणें
विरोधाभास–वाक्यदोषापैकीं दोष
प्रज्ञा–विशेष ज्ञान.
रमाब्रह्म–लक्ष्मीचतुर्मुख.
तृणपाषाण–गवत, दगड.
प्रत्याहार–इंद्रियांला परतविणें.
अंतराय–विघ्न.
मनःप्रसाद–स्वच्छ मन.
चित्तनिरोध–मन निश्चल करणें.
यतिधर्म–संन्यासधर्म.
अकारवाच्यब्रह्म–विष्णु.
अनन्याधिन–स्वतंत्र.
स्वातंत्र्यकर्तृत्व–स्वतः करणें.
अन्याधिनकर्तृत्व–इतरांच्या अधीन होऊन करणें.
विकाररूप कर्तृत्व–पदार्थाकार होणें.
संसारपरपारदर्शी–संसाराचा अंत पाहणारा.
प्रकृष्टकारण–उत्तम कारण.
निवृत्तिकर्म–फलाच्या निरिच्छेनें कर्म करणें.
साकल्यानें–सर्व प्रकारानें.
त्रैविद्य–वेदोक्त कर्म करणारा.
प्राणवायु–हृदयांत असणारा वायु.
रेचक–श्वास बाहेर सोडणें.
पूरक–श्वास आंत घेणें.
अपानवायु–गुदस्थानीं असणारा वायु.
यदृच्छालाभ–अकस्मात् प्राप्ति.
आत्मसंयमन–इंद्रियांचें नियमन.
वृत्तिज्ञान–बाह्य इंद्रियानें होणारें ज्ञान.
निरग्निक–अग्निरहित.
संपूर्तिकाम–संपूर्ण होण्याची इच्छा.
योगारोह–ध्यान करणें.
कल्मष–पाप.
अवरत्वादि–कमीपणा वगैरे.
पातित्यदोष–जातिभ्रष्ट होणें.
कृच्छ्र–दुःख व प्रायश्चित्त.
चांद्रायण–प्रायश्चित्तांतील भेद.
जडप्रकृति–सर्व जड.
चित्प्रकृति–लक्ष्मी.
उपादानभूत–मिळून असलेलें कारण.
अभेदोपासना–ऐक्यचिंतन.

शश्वदेकप्रकार–सर्वदा एक प्रकार.
अभिव्यक्ति–स्पष्ट होणें.
दुर्गारूप शक्ति–लक्ष्मीचें एक रूप.
मिश्रितोपासना–किंचित् दोषयुक्त ध्यान.
अपरोक्षज्ञानी–प्रत्यक्ष पहाणारा.
ब्रह्माद्यशेषजीवजडादि–सर्व जगत्.
अर्चिरादि–त्या नांवाचा मार्ग.
कालाद्यभिमानी–देवता.
असूयादि—दोष.
जीवभेदादिक—जीवाचें ऐक्य
पार्षद—दूत.
वैलक्षण्यानें–भेदानें.
भगवद्भोगानिमित्तक–ईश्वराचा उपभोग.
भेरिताडणादि–नगारा वाजविणें.
सुखलेशविधुर–सुखरहित.
वक्ष्यमाण–पुढें सांगण्याचें.
सुरासुरतिर्यगादि जीवगण-देव, दैत्य, मनुष्य, पशु इत्यादि जीव.
षड्गुणैश्वर्यसंपन्न–समग्र ऐश्वर्य, समग्र धर्म, समग्र यश, समग्र श्री, समग्र ज्ञान आणि समग्र वैराग्य यांनीं युक्त.
क्षराक्षरोत्तम—जीव लक्ष्मीहूनही उत्तम.
अप्राकृत रूपें—नाश न होणारीं रूपें.
हर्षरोम—संतोषानें येणारे रोमांच.
प्रवृद्धस्वरूप—वाढलेलें रूप. [तें रूप.
अपरिच्छिन्न स्वरूप–ज्यास परिमिति नाहीं
भावाभावात्मक–असलेले व नसलेले पदार्थ.
शब्दवाच्यत्वमात्र—केवळ शब्दानें सांगितलेला.
भक्त्यातिशय—फार भक्ति.
क्रीडादिगुणविशिष्ट—गुणयुक्त.

परापर—दोन तत्वें.
सायुज्यमुक्ती—देवाच्या अंगांत प्रवेश.
अनन्यभक्ति—मुख्य भक्ति.
तत्परिग्रह—कुटुंबमाणसें.
अधमत्व—कनिष्टपणा.
आकाशाभिमानी–गणपति.
साम्यज्ञान—सारखें समजणें.
अविरुद्ध—शरण.
अष्टाक्षरादि—मंत्र
संसारासरिता—संसारास तुच्छ मानणें, निःसार मानणें.
अव्यक्तादि तत्वें–चोवीस तत्वें.
प्रतिज्ञात—प्रतिज्ञा केलेलें.
विकारांतर्गत–विकारामध्यें असलेलें.
अमानित्वादि–सद्गुणधर्म.
अनिर्वचनीय–सांगतां येत नाहीं तें.
आपाततः–बाहेरून दिसणारें.
तारतम्य–उच्चनीच समजणें.
सुविज्ञान–विशेष ज्ञान.
आत्महिंसक–आत्म्याचा नाश करणारा.
बाह्याभ्यंतरीं—आंत बाहेर.
परवृत्तिनिरोध–दुसऱ्यास प्रतिबंध करणें.
श्रुत्यध्ययन-वेदाध्ययनादिक. [ज्ञान.
परोक्षज्ञानविषयक–समक्ष न दिसणारें परंतु
प्रत्यवाय—दोष.
श्रौतस्मार्तविधि–वेदपुराणांतील आज्ञा.
अधिष्ठान–आश्रय.
कृष्णार्पण बुद्धि–ईश्वरार्पण करणें.
नैष्कर्म्यसिद्धि—मोक्ष.
अतपस्क—तप न करणारा.
अरण्यरोदन—व्यर्थ बडबड.
अचिंत्यशक्ति—ईश्वराची शक्ति.

# श्लोकांची वर्णानुक्रमणिका.

Printed at Dhananjaya press & published at Lokamitra office by
Dattatray Govind Sadekar—Khanapur--Belgaum.